करून जोडले. शिवाय स्वतःच्याहि अनुच्छिष्ठ कल्पनांची जोड दिली. अशा रीतीनें ग्रंथाच्या अपूर्वतेंत अपूर्वच भर पडली. रामायण आज अखिल हिंदी वाङ्मयाचें शिरोरत्न म्हणण्याची जी पद्धत पडली आहे त्याचें मुख्य कारण हेंच.

आतां विशेष सांगावयाचें हें कीं रामायण हा गुरु-शिष्य, पिता-पुत्र, स्त्री-पुरुष, राजा-प्रजा, समाज-नेता, इ. इ. ऐहिक संबंध शुद्ध पारमार्थिक करण्यास शिकविणारा सर्वांगसुंदर आणि सर्वोपयोगी असा एक शास्त्रीय भाषा-निबंध होय असें आमचें मत आहे. या ग्रंथाच्या पुढील भागांवरून हें निदर्शनास येईल.

शास्त्रदृष्ट्या रामायणाचा मोठा दोष हा कीं तें व्याकरणापासून फारच विभक्त राहिलें. परंतु त्या विभक्तीची जागा त्यानें भक्तीनें भरून काढल्यामुळें '**एकोहि दोषो**' ह्या कालिदासोक्ति प्रमाणें तो दोष दोषच भासत नाहीं.

# काव्यसमालोचन.

"नानापुराणनिगमागमसंमतं यद्रामायणे निगदितं क्वचिदन्यतोऽपि" हें ग्रंथारंभींचं अवतरणच तुलसीदासांच्या विद्वत्तेची साक्ष देते. रामचरित मानसाचें रूपक [म भा. पा. ४२-४८] त्यांच्या साहित्यादि शास्त्रांची अभिज्ञता सिद्ध करते. इतका दांडगा व्यासंग आणि त्यांत भागवताच्या प्रेमाची भर. म्हणूनच "तुलसी रघुनाथगाथाभाषानिबंधमतिमंजुलमातनोति" असें ठांसून बोलण्याचा आत्मविश्वास त्यांस होऊं शकला. आतां इतक्या आत्मविश्वासाची प्रतिज्ञा त्यांच्या कृतींत कितपत उतरली आहे हें या कांडवार काव्यसमालोचनेवरून पहावयाचें आहे.

व्यासांना, नारदांनीं भगवत्प्रेम उत्पन्न होऊन जीवांचा तरणोपाय सुलभ होईल असें भगवद्गुणवर्णन कर म्हणून आज्ञा दिली असा उपोद्घात भागवतारंभीं दिलेला आहे. हीच प्रसादपरंपरा 'सुमिरि सिवासिव पाइ पसाऊ। वरनउँ रामचरित चितचाऊ' (उमामहेशांचा प्रसाद झाल्यामुळें त्यांचें स्मरण करून चित्त शांत करणारें हें रामचरित्र मी वर्णन करितों.) या उक्तीवरून रामायणरचनेस कारणीभूत झाली हें स्पष्ट दिसतें. भागवत जसें 'येनात्मा संप्रसीदति' झालें आहे, तसेंच रामायण देखील खरोखरच 'चितचाऊ' (चित्तास प्रसन्नता देणारें) झालें आहे.

तुलसीदासांच्या रामायणाची कांडसंख्या अध्यात्म आणि वाल्मीकि रामायणाप्रमाणेंच आहे. हीं कांडें एकंदर सात आहेत. यांचें समालोचन त्यांच्या अनुक्रमाप्रमाणेंच केलें आहे.

## वालकांड.

सातहि कांडांत हेंच कांड मोठें आहे. या कांडाचे दोन समभाग पडतात. पूर्वार्ध उत्तरार्धाची शुद्ध प्रस्तावनाच म्हणतां येईल. रामचरित्राची खरी सुरुवात उत्तरार्धापासूनच आहे. पूर्वार्धांतल्या प्रस्तावनेंतले विषय असे आहेत.

(१) वंदना, (२) रामचरितमानसरूपक, (३) पार्वतिपरिणय, (४) शिवपार्वतिसंवाद, (५) रामावतारकारणें, आणि (६) रावणादिकांचें जन्म आणि अत्याचार.

सुरवातीचा भाग म्हणजे वंदना पूर्ण काव्यमय आहे. दक्षयज्ञविध्वंस-वर्णन भागवतांत चतुर्थ स्कंधाच्या प्रारंभीं फारच विस्तारानें (अ. २ ते ७) दिलेलें आहे. तुलसीदासांनीं त्याचा फारच संक्षेप केला आणि त्यास निरानिराळ्या कथा जोडिल्या. त्याकारणानें ही पार्वतिपरिणयकथा या रामायणांत फार सुट-सुटीत आणि खूपच चटकदार झालेली आहे. बाकीच्या भागांत देखील निरानिराळ्या कथा घातल्यानें त्यांस विलक्षणता आली आहे.

पूर्वार्धाच्या निरनिराळ्या भागांचे दुवे जोडण्यांत तुलसीदासांचें विलक्षण बुद्धिचातुर्य खरोखरच पाहण्यासारखें आहे.

## (१) संतसमाजप्रयागः— [म. भा. पा. ५]

खालील संतसमाजाचें रूपक ही कवीची स्वतंत्र कल्पना असून फार मनोहर आहेः—

चौ०–मुदमंगलमय संतसमाजू । जो जग जंगम तीरथराजू
रामभगति जहँ सुरसरिधारा । सरसइ ब्रम्हविचार प्रचारा
विधि-निषेध-मय कलिमलहरनी । करमकथा रविनंदिनिवरनी
हरिहरकथा विराजति वेनी । सुनत सकल मुदमंगल देनी
वटविस्वासु अचल निज धर्मा । तीरथराज समाज सुकर्मा
सवहिँ सुलभ सव दिन सव देसा । सेवत सादर कठिन कलेसा
अकथ अलौकिक तीरथराऊ । देइ सद्य फल प्रगट प्रभाऊ

अर्थ–संतसमाज हा जगांत जंगम आनंदमंगलमय तीर्थराज प्रयाग होय. संतसमाजरूप प्रयागांत रामभक्ति हाच गंगाप्रवाह असून ब्रम्हविचार हीच त्यांतील सरस्वतीची धार होय. विधिनिषेधात्मक कर्मकांडांची चर्चा हीच संतप्रयागतीर्थाची कलिसंबंधी पापांचें प्रक्षालन करणारी रविनंदिनी यमुना होय, असें वर्णन करण्यांत येत असतें. हरिहरांचा कथारूपी त्रिवेणीसंगम तेथें

विराजमान असून, त्यांच्या श्रवणमात्रेंकरून सर्वत्र आनंद आणि कल्याण यांची प्राप्ति होते. स्वधर्मनिष्ठा हाच त्या प्रयागांतील अक्षयवट होय. सदाचारसंपन्न लोक हेच त्या तीर्थराजांतील रहिवाशी होत. सर्वांसच हा तीर्थराज सर्वदां आणि सर्वच देशांत सुलभ आहे. त्याची श्रद्धापूर्वक सेवा केली असतां तो क्लेशनिवारण करितो. हा तीर्थराज अवर्णनीय आणि लोकोत्तर आहे. सद्यः फलदायक असा याचा महिमा आहे.

या रूपकाच्या शेवटल्या चौपाईतल्या '**सद्य**' शब्दांतून खालच्या भागवत-श्लोकार्थाचा ध्वनि निघतोः—

**न ह्यम्मयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयाः ।**
**ते पुनन्त्युरुकालेन दर्शनादेव साधवः ॥**

## [२] खलवर्णन [म. भा. पा. ७–८]

कवीची ती स्वतःचीच कल्पना दिसते. वर्णन मात्र फार मार्मिक आहे. तें विस्तृत असल्यामुळें येथें दिलें नाहीं.

## [३] श्रीधरस्वामींच्या व्युत्पत्तीचें अनुकरणः– [म. भा. पा. २८]

भागवत स्कं. ६ अ. २ श्लो. १४ त '**वैकुंठनामग्रहणं**' हें पद आहे. त्यावरील टीकेंत श्रीधरस्वामींनीं '**ग्रहणं**' हें पद निराळें काढून त्याची '**गृह्यते अनेन**' म्हणजे भगवंतास ओढून हृदयांत सांठविण्याचें भगवन्नाम हें साधन होय अशी व्युत्पत्ति लाविली आहे. '**सुमिरिय नाम रूप बिनु देखे । आवत हृदय सनेह बिसेखे**' ही चौपाई शुद्ध त्याच व्युत्पत्तीचें अत्यंत मार्मिक अनुकरण दिसतें. या चौपाईचा अर्थ असा कीं रूप न पाहतांहि जरी प्रेमपुरःसर नामस्मरण झालें तरी देखील हृदयांत रूपाचा आविर्भाव होतो.

## [४] रामापरीस नामच श्रेष्ठः— [म. भा. पा. २९–३२]

रामापेक्षां [ सगुण निर्गुण या दोहोंपेक्षां ] नामच श्रेष्ठ, हें सिद्ध करण्याची योजना फारच बहारीची साधिली आहे. हें वर्णन इतकें मार्मिक आहे कीं, त्याचें विवेचन करण्याची खरोखर जरूर आहे. परंतु विस्तरभयास्तव तसें कांहींहि

करणें शक्य नाहीं. फक्त आम्ही इतकेंच सुचवून ठेवितों कीं रामापेक्षां नामाचें महत्व ठरविणें ही वाह्यदृष्टि झाली. आमच्या मतानें, ह्या वर्णनानें विषय कसाहि गहन असला तरी शिक्षकानें आपल्या शिक्षणकलेनें तो चटकदार आणि चित्ताकर्षक कसा केला पाहिजे हें त्याजवरून शिकावयाचें आहे.

[५] शिवपार्वतिविवाह वर्णनः— [म. भा. पा. ४८-९७]

ह्यांत कितीतरी निरनिराळ्या ठिकाणच्या कथांचा भरणा आहे. परंतु त्या सगळ्या व्यवस्थित वसवून ती संपूर्ण एकच कथा आहे असें कोणासहि वाटल्या वांचून रहात नाहीं. फिरून त्या कथेस रामचरित्राची प्रस्तावना केलेली पाहून कवीच्या कौशल्याचें फार कौतुक वाटतें.

ही कथा तुलसीदासांच्या शंकरोपासनेचा सबळ पुरावा आहे असें खालील दोह्यावरून सिद्ध होईलः– [म. भा. पा. ९७]

दो०– प्रथमहिँ मैँ कहि सिवचरित बूझा मरमु तुम्हार ।
सुचि सेवक तुम्ह रामके रहित समस्त बिकार ॥

अर्थः– [याज्ञवल्क्य भरद्वाजास म्हणतात] मी प्रथमच शिवकथा सांगून तुझें मर्म ओळखिलें कीं तूं सर्व विकाररहित असून रामाचा पवित्र भक्त आहेस.

[६] भागवतानुकरणः– [म. भा. पा. १०४]

खालील भाग बहुतेक भागवताचें भाषांतरच दिसतोः–

चौ०-जिन्ह हरिकथा सुनी नहिँ काना। स्रवनरंध्र अहिभवन समाना
नयनन्हि संतदरस नहिँ देखा। लोचन मोरपंख कर लेखा
ते सिर कटुतुंबरि सम तूला। जे न नमत हरि-गुरु-पद-मूला
जिन्ह हरिभगति हृदय नहिँ आनी। जीवत सव समान ते प्रानी
जो नहिँ करइ रामगुन-गाना। जीह सो दादुर जीह समाना
कुलिसकठोर निठुर सोइ छाती। सुनि हरिचरित न जो बिलखाती

[ अर्थ–ज्या कानांनीं हरिकथा श्रवण केली नाहीं, ते कान वारुळाच्या छिद्राप्रमाणें होत. ज्या डोळ्यांनीं संतदर्शन घेतलें नाहीं, ते मयूरपिच्छावरील नेत्ररेषेसमान होत. जे हरि व गुरुजन यांच्या चरणीं नम्र होत नाहीं तें मस्तक कडू भोंपळ्याच्याच योग्यतेचें होय. ज्यांनीं हरिभक्ति हृदयांत आणिली नाहीं ते प्राणी जीवंत असूनहि प्रेतवत् होत. जी जिव्हा रामगुणाचें गान करीत नाहीं ती बेडकाच्या जिभेसारखीच समजावी. जी छाती रामचरित्रें ऐकून हर्षायमान होत नाहीं ती वज्रप्राय कठिण आणि निष्ठुर होय. ]

भाग. स्कं. २ अ. ४

बिले बतोरुक्रमविक्रमान्ये न शृण्वतः कर्णपुटे नरस्य
जिव्हासती दार्दुरिकेव सूत न चोपगायत्युरुगायगाथाः ॥ २० ॥
बर्हायिते ते नयने नराणां लिंगानि विष्णोर्न निरीक्षतो ये ॥ २२ ॥ '
जीवञ्छवो भागवतांघ्रिरेणुं न जातु मर्त्योऽभिलभेत यस्तु ॥ २३ ॥
तदश्मसारं हृदयं बतेदं यद्गृह्यमाणैर्हरिनामधेयैः
न विक्रियेताथ यदा विकारो नेत्रे जलं गात्ररुहेषु हर्षः ॥ २४ ॥

[७] रामजन्मोत्सववर्णनः– [ म. भा. पा. १६१ ]

हें वर्णन अध्यात्मांत किंवा वाल्मीकींत नाहीं. भागवतांतल्या कृष्णजन्मवर्णनाशीं त्याचें फार सादृश्य आहे. तें असें:—

'सीतलमंद सुरभि वह बाऊ'। = 'ववौ वायुःसुखस्पर्शःपुण्यगंधवहःशुचिः'
'हर्षित सुर संतन्ह मन चाऊ' ।='मनांस्यासन्प्रसन्नानि साधूनामसुरद्रुहाम्'
'बनकुसमित' = '——स्तवका वनराजयः'
'स्रवहिं सकल सरितामृत धारा' = 'नद्यः प्रसन्नसलिलाः'
'गगन विमल संकुल सुरयूथा। 'गावहिं गुन गंधर्व बरूथा ॥' } 'जगुः किन्नरगंधर्वास्तुष्टुवुः सिद्धचारणाः'
'वरषहिं सुमन सुअंजलि साजी'।='मुमुचुर्मुनयो देवाःसुमनांसि मुदान्विताः'
'गहगहि गगन दुंदुभी बाजी'। = 'नेदुर्दुन्दुभयो दिवि'

(८) अयोध्या-सायंकाल रूपक. (मं. भा. पा. १६४ ते १६५)

याची कल्पना नवीन असून सुंदर आहे. तें रूपक असें:—

चौ०–अवध पुरी सोहइ एहि भांती। प्रभुहि मिलन आई जनु राती
देखि भानु जनु मन सकुचानी। तदपि बनी संध्या अनुमानी

अर्थः– अयोध्या त्या वेळेस अशी दिसली कीं प्रभूंच्या भेटीसाठीं जणुंकाय रात्रच आली आहे. परंतु तिला सूर्य दिसल्यामुळें ती जणुंकाय मनांत ओशाळली. तथापि तिनें संध्येचें (संध्याकाळचें) रूप घेतलें आहे असें वाटे.

चौ०–अगरु-धूप बहु जनु अंधियारी। उडइ अबीर मनहुँ अरुनारी
मंदिर-मनि-समूह जनु तारा। नृप-गृह-कलस सो इंदु उदारा

अर्थः–अगरु धूप, हाच जणुंकाय तिन्हींसांजचा दाट अंधार दिसे. गुलाल उधळण्यानें संध्याकाळची लाली भासूं लागली. घरांवरील रत्नेंच जणुकाय तारांगणें असून राजवाड्यावरील सुवर्णकळस हाच शुद्ध लख्ख चंद्र भासला.

चौ०–भवन-वेद-धुनिअति मृदुबानी। जनु खग मुखर समय जनु सानी

अर्थः–घरोघरीं होत असलेला मंजुल वेदघोष हाच जणुंकाय त्या समयास उचित असा पक्ष्यांचा किलकिलाट वाटला.

(९) बाललीला वर्णनः— (म. भा. पा. १६९–१७१)

अध्यात्मानें बाललीलेस किंचित् तोंड तरी लाविलें आहे, परंतु वाल्मीकीनें तर त्या लीलेचें नांव देखील घेतलें नाहीं. अध्यात्मांतलें वर्णन आणि येथलें वर्णन ताडून पाहतां तुलसीदासांची रंग भरण्याची अपूर्व शैली येथें थोडक्यांत एकदम पटते.

अध्यात्म–(बा. कां. स. ३ श्लोक ४७ ते ४९)

'दृष्ट्वा दशरथो राजा कौसल्या मुमुदे तदा।
भोक्ष्यमाणो दशरथो राममेहीति चासकृत्॥

आव्हयत्यतिहर्षेण प्रेम्णा नायाति लीलया।
आनयेतिच कौसल्यामाह सा सस्मिता सुतम् ॥
धावत्यपि न शक्नोति स्प्रष्टुं योगिमनोगतिम्।
प्रहसन्स्वयमायाति कर्दमांकितपाणिना ॥

तुलसीदासः—

चौ०-भोजन करत बोल जब राजा। नहिँ आवत तजि बाल समाजा
कौसल्या जब बोलन जाई। ठुमुकि ठुमुकि प्रभु चलहिँ पराई
निगम नेति सिव अंत न पावा। ताहि धरइ जननी हठि धावा
धूसर धूरि भरे तनु आये। भूपति बिहँसि गोद बैठाये

दो०-भोजन करत चपलचित इत उत अवसरु पाइ।
भाजि चले किलकत वदन दधिओदन लपटाइ ॥

(वरील भाग फार सोपा आहे म्हणून संबंध अर्थ न देतां फक्त थोडी टिप्पणी देतों. तीच पुरे होईल.)

'बोल'=बोलावणें. 'पराई'=पळून जाणें. 'निगम नेति'=वेद नेति म्हणतो. 'हठिधावा'=हट्टानें धांवून. 'गोद'=मांडीवर. 'किलकत'= आरोळ्या मारून. लपटाई = माखलेलें.

## (१०) रामलक्ष्मणांचा जनकनगरदर्शनाचा प्रकार आणि नागरिकांचीं भाषणें (म. भा. पा. १८३-१८७)

अध्यात्मांत किंवा वाल्मीकांत हे प्रवेश नाहींत. तुलसीदासांनीं ती उणीव भरून काढण्याची कल्पना भागवतांतल्या श्रीकृष्णाच्या मथुराप्रवेशवर्णनावरून आणि विदर्भप्रवेशवर्णनावरून घेतलेली दिसते. परंतु भाषणांचे प्रकार भागवतापेक्षां देखील फार सरस आणि प्रेमळ वठले आहेत. (भाषणांचा विस्तार फार मोठा असल्यामुळें भाषणें देतां येत नाहींत). या प्रवेशाचा शेवट कवींनीं असा केलेला आहेः-[म. भा. पा. १८७]

दो०-सब सिसु एहि मिस प्रेमबस परसि मनोहर गात ।
तन पुलकहिँ अति हरष हिय देखि देखि दोउ भ्रात ॥

( अर्थः- त्या निमित्तानें सर्व मुलांनीं अत्यंत प्रेमानें त्या उभय बंधूंच्या मनोहर शरीरास स्पर्श करून त्यांना वारंवार न्याहाळून पाहावें. )

मुलांचें हें एकाएकीं जडलेलें प्रेम कवीनें दाखविणें यांतच या वर्णनाची खरी शोभा आहे.

हा प्रसंग जर वगळला असता तर रामाची सगळ्या जनक नगरावर या प्रसंगानें जी एक मनोहर छाया पसरलेली दिसत आहे ती फक्त धनुर्यज्ञमंडपापुरतीच राहिली असती.

## (११) सीतारामांचा पुष्पवाटिकाप्रवेशप्रसंग-(म. भा. पा. १८९-१९७)

हा अध्यात्मांत आणि वाल्मीकांत नाहीं. तो प्रसन्नराघव नाटकाच्या दुसऱ्या अंकांतून घेतला आहे. परंतु त्याचें तेथलें नाटकी स्वरूप काढून त्याला रामास शोभण्यासारखेंच गंभीर आणि उदात्त स्वरूप दिलें आहे. हा प्रवेश विनय आणि शृंगार या दोहोंच्या ललित मिश्रणानें या रामायणांत काव्यकौशल्याचा एक अपूर्वच मासला होऊन बसला आहे. हा प्रवेश आणि प्रसन्नराघवाचा अंक दोन्हीहि फार विस्तृत असल्यामुळें त्यांचा उल्लेख येथें करितां येत नाहीं.

## (१२) धनुर्यज्ञमंडपांतल्या रामाच्या आविर्भावाचें वर्णनः—

(म. भा. पा. २०० )

भागवतांतल्या '**मल्लानामशनिर्नृणां नरवरः**' (स्कं. १० अ. ४३ श्लो. १७ ) या श्लोकाचें बहुतेक रूपांतरच म्हणतां येईल.

परंतुः—(म. भा. पा. २०१ )

चौ०-रामहिँ चितव भाव जेहि सीया । सो सनेह सुख नहिँ कथनीया
उर अनुभवति न कहि सक सोऊ । कवन प्रकार कहइ कवि कोऊ

( अर्थः–परंतु रामास पाहून सीतेस जें प्रेम वाटलें तें मात्र अनिर्वचनीय आहे. तें प्रेम तिनें अनुभवून देखील तिला सांगतां येण्या सारखें नाहीं. मग कवीनें तें कोणत्या रीतीनें सांगावें बरें ? )

हें वर्णन प्रत्यक्ष दाखवितें कीं तुलसीदास नुसत्या उसन्या भांडवलावर उडणारे नसून त्यांची भावनिरीक्षणाच्या हातवटीची पुंजी इतकी जबर आहे कीं तिचा कविकुलप्रवीणांना देखील थांग लागणार नाहीं.

## [१३] सीतास्वयंवर– [म. भा. पा. १९९–२१५]

अध्यात्मातलें आणि वाल्मीकांतलें सीतास्वयंवरवर्णन म्हणजे एखाद्या गरीबाच्या घरच्या सीमांतपूजना सारखेंच आहे. तुलसीदासांनीं मात्र तें पूर्ण दरबारी थाटाचें बनविलें आहे. त्यांत त्यांनीं रावणबाणादिकांना आणून त्यांचा धिक्कार करविणें वगैरे वर्णन फार बहारीचें घातलें आहे. हा रंगाचा भरणा त्यांनीं प्रसन्नराघवादि नाटकांतून घेतलेला आहे. त्याची थोडीशीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

प्रसन्नराघव नाटक अंक १ श्लो. ३२

आद्वीपात्परतोऽप्यमी नृपतयः सर्वे समभ्यागताः ।
कन्येयं कलधौतकोमलरुचिः कीर्तिश्च लाभास्पदम् ॥
नाकृष्टं न च टात्कृतं न नमितं स्थानाच्च न त्याजितं ।
केनापीदमहो धनुः किमधुना निर्वीरमुर्वीतलम् ॥

( म. भा. पा. २०७ )

चौ०–दीप दीपके भूपति नाना । आये सुनि हम जो पन ठाना ।
देव दनुज धरि मनुजसरीरा । बिपुलवीर आये रनधीरा

दो०–कुअँरि मनोहर बिजय बड कीरति अति कमनीय ।
पावनिहार बिरंचि जनु रचेउ न धनुदमनीय ॥ २५४ ॥

चौ०–कहहु काहि यह लाभ न भावा । काहु न संकरचाप चढावा
रहउ चढाउब तोरब भाई । तिल भरि भूमि न सके छुडाई
अब जनि कोउ माखै भट मानी । वीर बिहीन मही मैं जानी

अर्थः—[जनक म्हणतो] मी जो पण मांडला आहे तो ऐकून द्वीपांतरींचे अनेक राजे येथें आले आहेत. ह्या मंडळींत देव आणि दैत्य देखील मनुष्य-रूपानें आले आहेत. रणशूर म्हणून गाजणारे असेहि अनेक वीर येथें जमले आहेत. या धनुष्याचा भंग करून मनोहर कुमारी, दिगंत विजय आणि अतुल कीर्ति यांना मिळविणारा जणुंकाय विधात्यानें कोणी निर्मिलेलाच नाहीं!. कोणाला हा लाभ वाटत नसेल तर तसें तरी सांगावें. शिवचाप एकास देखील चढवितां येऊं नये! चाप चढविणें आणि तोडणें तर असोच, पण तें जमिनीपासून तिळभर देखील उचलतां येऊं नये! इतःपर तरी कोणी स्वतःची वीर म्हणून प्रौढी मिरवूं नये. उर्वीतल निर्वीर झालें असेंच मी समजतों.

'मेर्वादीनपि भूधरान्न गणये' = 'सकउँ मेरु मूलक इव तोरी'
'जीर्णः पिनाकः कियान्' = 'का बापुरा पिनाक पुराना'
'अहह तात पणस्तव दारुणः' = अहह तात दारुन हठ ठानी'

हनु. नाटक अंक १ श्लो. २१

पृथ्वि स्थिरा भव भुजंगम धारयैनां। त्वं कूर्मराज तदिदं द्वितयं दधीथाः॥
दिक्कुंजराः कुरुत तत्त्रितये दिधीर्षां। रामः करोति हरकार्मुकमाततज्यम्॥

[म. भा. पा. २१३]

चौ०-दिसिकुंजरहु कमठ अहि कोला। धरहु धरनि धरि धीर नडोला
राम चहहिँ संकरधनु तोरा। होहु सजग सुनि आयसु मोरा

अर्थ—(लक्ष्मण म्हणतो) अहो दिग्गज-कच्छ-शेष-वराह हो! धीर धरून पृथ्वीला सांवरून धरा म्हणजे ती डळमळणार नाहीं. राम शंकरचाप तोडूं इच्छित आहेत. माझी आज्ञा ऐकून सिद्ध व्हा.

हनु. नाटक अं. १ श्लो. २६

त्रुट्यच्छीमधनुः कठोरनिनदस्तत्राकरोद्विस्मयं
त्रस्यद्वाजिरवेरमार्गगमनं शंभोःशिरःकंपनम् ॥
दिग्दन्तिस्खलनं कुलाद्रिचलनं सप्तार्णवोन्मेलनम्
[म. भा. पा. २१५]

छं०-भरे भुवन घोर कठोररव रविवाजि तजि मारग चले ।
चिक्करहिँ दिग्गज डोल महि अहि कोल कूरम कलमले ॥

अर्थः-तो भयंकर कठोर ध्वनि त्रिभुवनांत भरून सूर्यरथाचे घोडे आड-मार्गानें जाऊं लागले. दिग्गज चीत्कार करूं लागले; पृथ्वी हलूं लागली; शेष वराह आणि कूर्म यांना कळमळूं लागलें.

रंगांचा भरणा जरी वरील प्रमाणें घेतला तरी रंग भरण्याची खुबी खुद्द कवींचीच आहे. हें ज्यास पाहणें असेल त्यानें स्वयंवरवर्णन वाचूनच पाहिलें पाहिजे. जनकमहिषी, जानकी इत्यादिकांचीं भाषणें हे सर्व रंग स्वयंकल्पित आहेत.

रंग भरण्याची कला कवीला इतकी साधली आहे कीं तिला जोडच नाहीं. वीररस, करुणरस, आणि शृंगाररस यांचें मिश्रण सीतास्वयंवरवर्णनांत इतकें चित्ताकर्षक होण्याचें कारण नुसतें भाषालंकरणच नव्हे. कमालीचें भावनिरीक्षण आणि प्रबोधनशक्ति हींच त्याचीं खरीं कारणें होत. याचा एक लहानसा नमुना देतों. (म. भा. पा. २१४)

चौ०-देखी विपुल विकल वैदेही । निमिष विहात कलपसम तेही
तृषित वारि बिनु जो तनु त्यागा । मुये करइ का सुधातडागा
का बरषा जब कृषी सुखाने । समय चुके पुनि का पछिताने
अस जिय जानि जानकी देखी । प्रभु पुलके लखि प्रीति बिसेखी

अर्थः-रामांनीं जानकी इतकी विकल झालेली पाहिली कीं, तिला एक एक निमिष कल्पाप्रमाणें जात होतें. तान्हेला जर पाण्यावांचून मेला तर प्राण गेल्यावर अमृतसरोवराचा देखील काय उपयोग? शेत सुकल्यावर पाऊस पडला

तरी काय कामाचा? एकदां वेळ चुकली म्हणजे मग पश्चात्ताप करण्यांत तरी काय होणार? मनांत असा विचार करून प्रभूंनीं जानकीकडे पाहिलें; आणि तिचें विशेष प्रेम पाहून ते रोमांचित झाले.

सो०-संकरचाप जहाज सागर रघुवर बाहुबल।
बूड सो सकल समाज चढे जो प्रथमहिँ मोहबस॥
[म. भा. पा. २१५]

अर्थः—रघुपतिबाहुबलरूप समुद्रांतल्या शंकरचापरूप जहाजांत जे प्रथमच मोहवश होऊन चढले होते ते सर्वच बुडाले.

[१४] परशुरामगर्वहरणः— (म. भा. पा. २२०–२३३)

वाल्मीकि आणि अध्यात्म यांत हा प्रसंग रामाची वरात परततांना रस्त्यांतला आहे. प्रसन्नराघव नाटकानें तो लग्नाचे आधीं धनुर्यागमंडपांतच ठेविला आहे. तुलसीदासांनीं त्याचेंच अनुकरण केलें आहे. भाषासौष्ठव देखील बरेंचसें तेथलेंच घेतलें आहे [प्र. रा. ना. अं. ३ पहा] पण इतकें सांगितलें म्हणजे संपलें असें मात्र नाहीं.

आमच्या मतानें या प्रसंगास दिलेलें स्थलांतर कवीची असाधारण कल्पकता दाखविते. परशुरामासारख्या सगळ्या क्षात्रसमूहाला एकदोनदांच नव्हे एकामागून एक असें एकवीसदां 'त्राहि भगवान्' करून सोडणाऱ्या अत्यंत प्रखर व्यक्तीचें गर्वहरण एखाद्या विजन ठिकाणीं झालेलें कसें, आणि ज्यांची पाठ परशुरामांनीं मऊ केली खास त्यांच्याच डोळ्यांदेखत खुद्द परशुरामच मऊ झालेले कसे?

फिरून असेंहि पहा, रामाच्या धनुर्भंगानें सीता हातांतून निसटली म्हणून वस्तुहानी आणि मानहानी मानणारे सर्व राजे अगदीं बेफाम होऊन एकजुटीनें प्रत्यक्ष धनुर्यागमंडपांतच रामलक्ष्मणांच्या अंगावर जाऊन कोसळणार इतक्यांत परशुरामाचा आविर्भाव दाखविणें आणि त्यांचा रामलक्ष्मणाकडून सपशेल पाडाव

करविणें म्हणजे प्रधानमल्लनिवर्हणन्यायानें सर्व पृथ्वीच्या वीर्यशौर्यशाली क्षात्र वर्गाकडून त्यांस अजिंक्यपत्र समर्पण करविणें नव्हे काय? येथेंच कवीची ऊर्जित स्वयंस्फूर्ति दिसून येते.

भाषा, रस आणि भाव या दृष्टीनें देखील तुलसीरामायणांतलें परशुराम-गर्वहरण इतकें सुंदर वठलें आहे कीं त्यास दुसरी उपमाच नाहीं. भयंकर दुःख अनुभवून मग सुख झालें म्हणजे सुखाची खरी खरी योग्यता कळते. सीतारामांच्या विवाहास अक्षरशः हीच गोष्ट लागूं पडते. त्यांच्या विवाहाचा आनंद इतका उठावदार बनण्यास खरें पाहिलें असतां मुख्य कारण म्हणजे परशुरामगर्वहरण-प्रसंगच होय असें कोणीहि कबूल करील.

आमच्या मतानें परशुरामगर्वहरण प्रसंग हा रामजानकीपरिणय प्रसंगाची प्रस्तावनाच होय.

आणखी असेंहि वाटतें कीं परशुरामगर्वहरणप्रसंग अलीकडे ओढल्यानें रामाची बाजू जास्त सबळ झाली. नुसत्या धनुर्भंगानें रामाच्या शक्तीचा अदमास राजमंडळाच्या दृष्टींत योग्य प्रमाणानें भरला नव्हता. म्हणूनच धनुर्भंगा नंतर रामलक्ष्मणांवर हल्ला करण्याची त्यांस हांव उत्पन्न झाली. तेंच पुढें परशुराम गर्वहरण झाल्यानें रामलक्ष्मणांच्या शक्तीचा पूर्ण अदमास सर्व राजांना लागला. म्हणूनच परशुराम निघून जातांच सर्व राजे अगदीं शिथिल बनून निघून गेले. तसें नसतें तर त्यांनीं आपला हल्ला कायम ठेविला असता, आणि परशुराम जाण्या बरोबर जो शुकशुकाट झाला तो झाला नसता. म्हणून आम्ही म्हणतों कीं जी रामलक्ष्मणांच्या शक्तीची छाप नुसत्या धनुर्भंगानें बसावयाची राहिली होती तिची पूर्तता परशुरामगर्वहरणानें झाली.

## [१५] सीताराम विवाह वर्णनः— (म. भा. पा. २३५ ते २९५)

तुलसीदासांनीं विवाहोत्सव अध्यात्मांत किंवा वाल्मीकांत नसतांहि शास्त्र, व्यवहार, देशाचार आणि आनुकूल्य या सर्वांस अनुसरून फारच मार्मिक रीतीनें सहृदय आणि चतुर अशा कवीस शोभण्या सारखाच वर्णिला आहे. त्यावरून त्यांचें अगाध व्यवहारज्ञान, विद्वत्ता, कविकौशल्य आणि शिक्षणचातुर्य कोणास नाकारतां येईल?

विवाहवर्णनांतले विशेष महत्वाचे भाग आमच्या मतानें हे आहेत:—
दूतदशरथांचीं भाषणें आणि वशिष्ठांचे प्रेमोद्गार (म. भा. पा. २३६-२३९)
मैथिल प्रजेचा आनंदकल्लोळ (म. भा. पा. २५०–२५२)
रामास लग्नासाठीं घोड्यावरून जातांना पाहून देवांचा आनंद (म. भा. पा. २५६)
रामचरण प्रक्षालन करीत असलेला जनक (म. भा. पा. २६३-२६४)
जनकाचा दशरथादिकांशीं विनय (म. भा. पा. २६७-२६८)
गौरीहरपूजन (म. भा. पा. २६९-२७०)
राजमहिषींचा रामास निरोप (म. भा. पा. २७६-२७७)
जनकविकलता [म. भा. पा. २७८]
जनककृत रामस्तव [म. भा. पा. २८०-२८१]
कौसल्यादिकांचा आनंदोद्रेक (म. भा. पा. २८७)
दशरथाचें अंतपुरांत भाषण [म. भा. पा. २९०-२९१]
कौसल्येचे प्रेमोद्गार (२९१-२९२)

अध्यात्मांत वसिष्ठ आणि दशरथ मिथिलेस सस्त्रीक गेले आहेत (अ. रा. बा. का. स. ६ श्लो. ४४) तुलसीदासांचे वऱ्हाड सगळेंच निस्त्रीक गेलें. यास कारण पूर्वापर जातिव्यवहार किंवा तुलसीदासांची नवीन चाल घालण्याची इच्छा तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. मात्र त्यांच्या वेळच्या देशस्थितीवरून बायकांचा इतका लांबचा प्रवास सुरक्षित नव्हता हें अगदीं खरें आहे.

दुसरी गोष्ट, बायकांच्या पडद्याची चाल तुलसीदासांच्या वर्णनावरून दिसत नाहीं. बुरख्याच बाबतींत निश्चित जरी सांगतां येत नाहीं तरी तो असावा असें वर्णनावरून वाटतें.

(१) रामचरित मानसाचें रूपक (म. भा. पा. ४२–४८) आणि (२) प्रतापभानूची कथा [म. भा. पा. १३३—१४९] या भागांचा विस्तार कंटाळवाणा झाला आहे, आणि (३) परशुरामगर्वहरणवर्णन अप्रगल्भ झालें आहे असे आक्षेप पुष्कळदांच ऐकूं येतात. असले आक्षेप बहुधा प्रकृतिस्वभावानुसारच असतात. म्हणून पहिल्या दोन आक्षेपां संबंधानें समाधान

कारक कांहींहि निश्चित विधान करितां येण्यासारखें नाहीं. परंतु तिसऱ्या बद्दल मात्र आम्हांस बोलल्या वांचून राहवत नाहीं. मिश्रबंधूंनीं देखील त्यांच्या '**नवरत्नांत**' परशुरामगर्वहरणवर्णनावरून तुलसीदासांचा बराच खर्पूस समाचार घेऊन भाविक वाचकांच्या चित्तवृत्ति दुखविल्या आहेत. आतां त्या वर्णनाचा काव्यदृष्टीनें विचार पाहूं.

एकंदर वर्णनाचें खरें हृदय तुलसीदासांनीं एकाच चौपाईंत सांठविलें आहे तें असें:—

**चौ०–वहइ न हाथ दहइ रिस छाती। भा कुठार कुण्ठित नृपघाती**

[ म. भा. पा. २२९ ]

[ **अर्थः**–छाती तर क्रोधानें जळत आहे, आणि हात तर [ लक्ष्मणावर ] वाहत नाहीं ! अरे नृपहिंसका कुठारा ! तूंहि कुंठित झालास ! ] यावरून हें खास ठरलें कीं परशुरामास पराकाष्टेचा क्रोध भरून सूड उगविण्याची इच्छा अनावर झाली तरी देखील प्रत्यक्ष क्रिया करण्यास ते सर्वथैव असमर्थ झाले. या शक्तिऱ्हासाचें मर्म आक्षेपकांनीं प्रथम शोधले पाहिजे. तें न शोधतांच अप्रगल्भतेचा आरोप कवीवर करणें म्हणजे स्वतःसच परशुराम करून घेणें होय.

रामलक्ष्मण यःकश्चित् ब्राम्हणाचा देखील उपमर्द करणारे जर नव्हते तर परशुरामासारख्या ब्रम्हर्षिवर्याचा उपमर्द करण्याची भावना त्यांच्या चित्तास शिवूं शकेल काय ! '**हमरे कुल इन्ह पर न सुराई**' [ आमच्या कुळांत यांजवर [ ब्राम्हणांवर ] शौर्य नसते ] हा काय चारित्र पुरुषांचा नुसता वाग्जालच समजावयाचा ?

सभ्य आणि शिष्ट स्त्रीपुरुषांनीं चिकार भरलेल्या धनुर्यज्ञमंडपांत हिडिसवाणें कंदन माजवून आणि तेथील विछायत रक्तानें चिंब भिजवून झाल्यावर मग परशुरामास शुद्धीवर आणणें श्रेयस्कर आणि शोभास्पद झालें असतें काय ? जर नाहीं, तर परशुरामास शुद्धीवर आणण्यास अगदीं राजरोस मार्ग '**उष्णमुष्णेन शाम्यति**' या परता खात्रीचा असा इतर कोणता असूं शकणार ? खात्रीचा म्हणण्याचें कारण हें कीं परशुरामाचें अवतार कृत्य संपलें होतें, आणि रामाचें

सुरु झालें होतें या गोष्टीची परशुरामास विस्मृति झाली होती, परंतु रामास पूर्ण स्मृति होती.

वरील एकंदर स्थितीचा विचार होईल तरच परशुरामगर्वहरणप्रसंगाचें खरें इंगित कळून येईल. आमच्या मतानें हें वर्णन तुलसीदासांच्या राजनीतिनैपुण्याचा महत्कौतुक करण्यासारखा पुरावा आहे. लक्ष्मणाचा आत्म-विश्वास, निर्भयपणा, विनोद आणि उपहास यांच्या उष्णतेनें परशुरामाच्या साहसी अभिमानाचा पारा क्रमाक्रमानें पण अमर्याद कसा चढला, आणि रामानें उच्चारलेल्या '**विप्रवंसकी अस प्रभुताई**' [ विप्रवंशाचें प्रभुत्व हें असें असतें ] या चौपाईतल्या फक्त '**अस**' [ छातीवरील भृगुपदचिन्ह .हातानें दाखवून ] या एकाच शब्दानें तो खाडकन् कसा उतरविला हें दाखविणें कवीचें उद्दिष्ट होतें. म्हणून त्यांस जरा विशेष प्रखर रंगाची योजना करणें भाग झालें.

अशा उत्कृष्ट योजनेस अश्लीलता म्हणण्याचें साहस करणें योग्य होईल काय?

## अयोध्याकांड.

हें कांड नवरस, दृष्टांत, रूपक, व्यवहार, स्वभावोक्ति, रामभक्ति, गुरुभक्ति, स्वभावनिरीक्षण इत्यादि गुणांनीं पूर्ण भरलेलें आहे. या कांडाचा मननीय विशेष हा कीं लोकशिक्षणाच्या भागांची यांत चांगलीच गर्दी दिसून येते. तुलसीदासांची अष्टपैलू विद्वत्ता, व्यवहारज्ञता, अलोट प्रेम, लोकशिक्षणचातुर्य इत्यादि गुणांची साक्ष पटविण्यास हें एकच कांड पुरें आहे. हें कांड तुलसीरामायणाचा खरोखर आत्माच होय.

या कांडांत तुलसीदास '**क्वचिदन्यतोऽपि**' वर मुळींहि भिस्त घालून राहिले नाहींत असें म्हणण्यास बहुतेक कांहींच प्रत्यवाय नाहीं. यांत त्यांची जवळ जवळ सगळीच स्वयंस्फूर्ति दिसते. वास्तव या कांडाचें समालोचन यथार्थ आणि मनसोक्त केल्यास रामचरितमानसाहून देखील तें विस्तृत होईल. कारण तुलसीदासांनीं म्हटल्याप्रमाणें हें कांड '**अर्थ अमित अति आखर थोरे**' (शब्दांचा अत्यंत संक्षेप, परंतु अर्थ मात्र अमित) असेंच आहे. म्हणून या कांडाचें समालोचन आमच्या इच्छेप्रमाणें न होतां तें फारच संक्षिप्त होणार यास आमचा नाइलाज आहे.

[१] मंगलाचरणः—[म. भा. पा. २९८]

दो०—श्रीगुरुचरन-सरोज-रज निज-मनु-मुकुर सुधारि।
बरनउँ रघुवर-विमल-जसु जो दायकु फल चारि॥

(अर्थः—श्रीगुरुचणारविंदाच्या धूलीनें स्वतःचा मनोदर्पण स्वच्छ करून चतुःपुरुषार्थदायक रघुपुंगवाचें विमल यश मी वर्णन करितों.)

यांतला 'रघुवर' हा शब्द फारच खुबीदार आहे. यांत रामाचा आणि भरताचा सारखाच अंतर्भाव होतो. हा शब्द मुद्दामच वापरलेला दिसतो. याचें कारण या कांडाच्या पूर्वार्धांत रामाचा आणि उत्तरार्धांत भरताचा उत्कर्ष समसमान दाखविला आहे.

[२] सरस्वति-आवाहनः—[म. भा. पा. ३०५]

'सारद बोलि (आवाहन करून) विनय सुर करहीँ' या चौपाई पासून पा० ३०६ वरील अखेरच्या दोह्यापर्यंतचें वर्णन 'एतस्मिन्नंतरे देवा देवीं वाणिमचोदयन्' (अध्या. रा. अयो. कां. स. २ श्लो. ४४) या श्लोकार्धाचें विपुलीकरण आहे. हें प्रकरण वाल्मीकांत नाहीं. एकंदर वर्णन फार खुबीदार आहे.

[३] मंथराकैकयी संवादः—(म. भा. पा. ३०७–३१५)

हा संवाद कवीच्या व्यवहारनिरीक्षणाचा एक अजब मासला आहे. याचें तात्पर्य 'को न कुसंगति पाइ नसाई। रहइ न नीच मते चतराई' (दुष्ट संगतीनें कोण नष्ट झाला नाहीं? नीचांच्या बुद्धीनें वागण्यांत माणूसकीची खुबी निघून जाते.) हें कवीनेंच सांगून टाकलें आहे.

या संवादांतली मंथरा 'मुखं पद्मदलाकारं वाचश्चामृतशीतलाः। हृदयं क्षुरधाराभं स्त्रीणां को वेद चेष्टितम्॥ या श्लोकांतल्या कुटिल स्त्रींचाच नमुना आहे. अध्यात्मांतल्या आणि वाल्मीकांतल्या मंथरेंत इतका मार्मिकपणा नाहीं. तुलसीदासांना एक 'घरफोडी' म्हणजे दुसऱ्याच्या नांदत्या घराचा खेळखंडोबा करणारी अशी मंथरा दाखवावयाची होती, आणि त्यांनीं ती

हुबेहुब तशीच दांखविली. तिची मुद्रा, तिची भाषणशैली, तिचे तर्क आणि कोट्या, तिचा आविर्भाव वगैरे सर्व प्रसंग मूळ वाचल्याखेरीज लक्षांत भरावयाचे नाहींत.

तुलसीदासांची कैकयी मात्र बहुतेक अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या कैकयी-सारखीच आहे. विशेष या कैकयीच्या स्वभावांत जें काय दिसतें तें हें:—

(म. भा. पा. ३१३)

**अरिबस दैव जियावत जाही। मरनु नीक तेहि जीव न चाही**

( **अर्थः**-दैव ज्यास शत्रूच्या गुलामगिरींत आयुष्य कंठवीत आहे त्यानें मरणें बेहत्तर, परंतु जगण्याची चाड धरूं नये. )

या संवादावरून तुलसीदासांची आपल्या ध्येयानुरूप भूमिका तयार करण्याची धाटणी अपूर्व दिसून येते. याचें कारण मुख्यतः त्यांचें अतिसूक्ष्म कालनिरीक्षणच असलें पाहिजे.

**[४] रामायणोत्पत्तिः—** (म. भा. पा. ३०८)

**दो०—काने खोरे कूबरे कुटिल कुचाली जानि।**
**तिय विसेषि पुनि चेरि कहि भरतमातु मुसुकानि॥**

**अर्थः**-'तिरवे, लंगडे, व कुबडे लोक पक्के चहाटळ असतात तें मी जाणतों. विशेषतः स्त्रिया, आणि त्यांतहि तुझ्या सारख्या बटकी' इतकें बोलून (मंथरेस) कैकयी हंसली.

मयसभेंत दुर्योधन अगदींच बुचकळला. त्यास पाहून द्रौपदी हंसली. एका त्या हंसण्याचा परिणाम भारतीय युद्ध होय. म्हणजे द्रौपदीच्या एका हंसण्यांत सगळें भारत जन्मलें. बहुतेक हीच कल्पना घेऊन तुलसीदासांनीं कैकयीस हंसविलें असावें. '**योजकस्तत्रदुर्लभः**' म्हणतात तें उगीच नव्हे.

**[५] दशरथाचें स्त्रैणत्वः—** (म. भा. पा. ३१६)

**चौ०—कोप भवन सुनि सकुचे राऊ। भयबस अगहुड परइ न पाऊ**
**सुरपति बसइ बाहुबल जाके। नरपति सकल रहहिँ रुख ताके**

**सो सुनि तियरिस गयउ सुखाई । देखहु कामप्रताप बडाई**
**सूल कुलिस असि अँगवनिहारे । ते रतिनाथ सुमनसर मारे.**

अर्थः-कोपगृहाचें नांव ऐकतांच दशरथ दचकला. भीतीनें त्यास पुढें पाऊल फुटेना. प्रत्यक्ष इंद्र देखील ज्याच्या मनगटाच्या जोरावर निर्धास्त असे, सर्वच राजे ज्याची मर्जी सारखी झेलीत असत, तो 'स्त्रीरोष' इतकें ऐकण्यासरशीं अगदीं चिरमटून जावा ना! पहा तर हा मदनप्रतापाचा प्रभाव! खड्ग, त्रिशूल, वज्र हे देखील ज्यांच्या अंगवळणींस पडले आहेत ते देखील या कामदेवाच्या पुष्पशरानें मृतप्राय होतात!

या वर्णनांत कवींनीं दशरथास स्त्रीलंपट ठरविलें, परंतु तें किती मर्यादेनें, तें पाहण्यासारखें आहे.

## [६] दशरथ-कैकयी संवादः— (म. भा. पा. ३१७–३२६)

हा संवाद कविकौशल्याचा अपूर्व मासला आहे. तुलसीदासांनीं या संवादांत दशरथ आणि कैकयी ह्यांचें तुलनात्मक वैचित्र्य स्वमुखानेंच असें सांगितलें आहेः— (म. भा. पा. ३२७)

**चौ०–भूपप्रीति कैकइ निठुराई । उभयअवधि विधि रची बनाई**

(दशरथाचें प्रेम आणि कैकयीची निष्ठुरता ह्या दोन्हींचीहि सीमा विधात्यानें फार खुबीनें घडविली.)

कवीचा वरील प्रयत्न अगदीं पूर्णपणें यशस्वी झाला यांत कांहींहि शंका नाहीं. अजून देखील आम्हांस कैकयीच्या काळजाचा असा कोणीहि मिळाला नाहीं कीं हा संवाद वाचून ज्याच्या हृदयास पाझर फुटला नाहीं.

कैकयीच्या मुखांतून इतके मर्मभेदी आणि उपमर्दकारक शब्द निघाले, तरी दशरथाच्या जिव्हाग्रास कवींनीं अवाच्य शब्दाचा स्पर्श देखील होऊं दिला नाहीं. दशरथाच्या भूमिकेचा आणि कवीच्या लोकशिक्षणाचा आम्ही हाच खरा विशेष समजतों.

या संवादाचा शेवट किती हृदयभेदी झालेला आहे तें खालील वाक्यावरून सहज कळेलः— (म. भा पा. ३२६)

चौ०–फिरि पछितैहसि अंत अभागी। मारसि गाइ नहारुहि लागी

अर्थः-शेवटीं फिरून तुला पश्चात्तापच होईल. नुसत्या वादीसाठीं तूं प्रत्यक्ष गाय कापीत आहेस हेंच तुझें दुर्भाग्य.

[७] रामकैकयी संवादः—[म. भा. पा. ३२९–३३१]

तुलसीदासांनीं रामाचें भाषण अगदीं लौकिक रीतीचें पण पूर्ण शिक्षाप्रचुर असेंच दिलें आहे. हें भाषण त्यांच्या प्रतिज्ञे-प्रमाणें खरोखरच 'वाग्विभूषण' (वाग्देवीचा कुंकुमतिलक) असेंच झालें आहे.

ज्या वाङ्मयांत अशी उदात्त, तात्विक आणि प्रेमप्रसव भाषणें नाहींत तें वाङ्मय वस्तुतः तिलकहीनच होय यांत कांहीं देखील शंका नाहीं.

(८) कैकयीशांत्यर्थ स्त्रीमंडळाची शिष्टाईः–[म. भा. पा. ३३६-३३७]

शिष्टाईसाठीं ही स्त्रीप्रेषणकल्पना कवीची स्वतःचीच आहे असें आम्हांस वाटतें, कारण तसें वर्णन आम्हांस कोठेंहि आढळलें नाहीं. आमची ही कल्पना जर खरी असेल तर त्यांच्या स्वभावनिरीक्षणपाटवाचा आणि स्त्रीशिक्षणविषयक उच्च कल्पनेचा गौरवच करणें भाग आहे.

(९) कौसल्येचें रामवनप्रेषणः— [म. भा. पा. ३३८–३४३]

तुलसीदासांच्या कौसल्येचा परिचय पुढें भूमिकापरिचयांत होईलच. येथें आम्ही एवढेंच सांगून टेवतों कीं अमर्याद पुत्रप्रेम आणि अलोट पातिव्रत्य यांच्या पूर्ण कचाट्यांत सांपडून देखील जी पतिप्रेम पुत्रप्रेमापेक्षां अधिक मानते तीसच राममाता म्हणणें शोभेल असें व्याख्यान तुलसीदासांनीं केलेलें आहे. यावरून त्यांच्या स्त्रीशिक्षणाची दिशा सहज निश्चित होते.

अध्यात्मांत आणि वाल्मीकांत कौसल्येचें भाषण येथल्या भाषणाइतकें द्रावक नाहीं. येथलें भाषण हृदयस्फोट करणारें झालें आहे. करुणरसांत हृदय

इतकें तल्लीन राहून कवीच्या लेखणीस वर्णनाचा इतका आंवाका राहिला याचें कदाचित् कोणास आश्चर्य वाटेल. परंतु '**सो महेस मोहि पर अनुकूला। करहि कथा**' [म. भा. पा. २१:-तो महेश मजला अनुकूल आहे. तोच ही कथा करील] या चौपाईवरून आश्चर्याचें कांहींच कारण नाहीं.

वाल्मीकाच्या कौसल्येच्या '**ममास्ति मातृता तात न जह्यात् पुत्रता त्वया**' या परमप्रेमळ उक्तीचें हृदय तुलसीदासांनीं '**मानि मातुकर नात बलि सुरति बिसर जनि जाइ**' (आईचें नातें अलोट मानून तरी माझी आठवण विसरूं नकोस) या त्यांच्या कौसल्येच्या उक्तींत फार मार्मिकपणानें उतरविलें आहे. आमच्या विचारानें या उक्तींत भाव असा दिसतो कीं '**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति**' यांतल्या मातृहृदयाचा रामास वनास जा म्हणण्यानें कौसल्येकडून सपशेल खून झाला असें वाटून ती रामास म्हणाली कीं माझें हृदय जरी मातेचें नाहीं तरी माझें मातेचें नातें मात्र अलोट आहे, आणि त्या नात्यास स्मरून रामानें मजला विसरूं नये.

कौसल्याविलापाचा अखेर तुलसीदासांनीं असा केला आहे:---

(म. भा. पा. ३४३)

**चौ०-बहु बिधि बिलपि चरन लपटानी। परम अभागिनि आपुहि जानी**

(**अर्थः**-पुष्कळच प्रकारांनीं विलाप करून स्वतःस अत्यंत दुर्दैवी समजून कौसल्येनें रामचरणास मिठी मारिली.)

'**चरन लपटानी**' या शब्दांवरून कौसल्येस रामाच्या ईश्वरत्वाची ओळख होती असें ध्वनित करण्याची प्रणाली आहे. आमच्या मतानें तें रास्त नाहीं. त्यानें कारुण्याचें सारस्य कमी होतें. पुत्र वात्सल्याचाच भाव सर्व भाषणांत ओतप्रोत भरलेला आहे. त्यांत ईश्वरत्वाच्या जाणिवेची झांक कोठेंहि नाहीं. मग अशा रीतीनें रसशोष करण्यांत अर्थ काय?

'**ते तुम्ह मातु कहहु बन जाऊँ। मैं सुनि बचन बैठि पछिताऊँ**' (म. भा. पा. ३४२:- तो तूं '**माते, वनांत जाऊं?**' म्हणून विचारीत

आहेस आणि ते शब्द ऐकून मी बसल्याजागीं नुसता पश्चात्ताप मात्र करीत आहे!) या वाक्यावरून स्पष्ट दिसतें कीं रामवनगमन ऐकतांच मरणें बरें झालें असतें हा खरा भाव कौसल्येचा होता. पण तसें झालें नाहीं याबद्दल तीस खंत वाटून ती स्वतःच्या पुत्रप्रेमास लाजली. तीस वाटलें कीं तिचा प्रेम खरा पुत्रप्रेमच नव्हे. केवळ याच भावनेनें ती '**मानि मातुकर नात बलि**' इ० उद्गारली, आणि स्वतःस '**परम अभागिनि**' (रामाची माता होण्यास सर्वथैव अयोग्य) म्हणून धिःकारूं लागली. समोर पहात असलेल्या रामाची उत्कृष्टता आणि स्वतःची निकृष्टता या विचारानें ती गजबजून जाऊन आईलेंकराचें नातें सपशेल विसरली, आणि तिनें रामास न कवटाळतां त्यांचे पाय कवटाळले. यावरून '**चरन लपटानी**' हे शब्द नमस्कारार्थक नसून ते कौसल्येचीं पश्चात्तापानें सहज घडलेली क्रिया दाखवितात.

### (१०) कौसल्या-राम-सीता-संवादः— (म. भा. पा. ३४३ ते ३५१)

या संवादांत प्रत्येक भूमिका आपापल्या परीनें शिकस्त करून स्वमत स्थापित करीत आहे. सर्वांत आकर्षक आणि चारित्र्यपूर्ण असें सीतेचेंच भाषण आहे असा सर्वांस भास होतो. परंतु तुलसीदास लोकशिक्षणव्रतास वाहिलेले असल्या कारणानें त्यांना सीतेकडेस देखील तत्वदृष्टीनेंच पहावें लागलें. या पुढील विचार भूमिकापरिचयांत सीतेच्या भूमिकेंत पहावयास मिळेल.

### (११) रामलक्ष्मण संवादः — [म. भा. पा. ३५२–३५५]

या संवादांत रामलक्ष्मण वकीलासारखे आपापली बाजू सरसावीत आहेत. वरवर दृष्टीनें लक्ष्मणाचीच सरशी वाटते. जास्त विचार भूमिकापरिचयांत लक्ष्मणाच्या भूमिकेंत केलेला आढळेल.

### १२ लक्ष्मण-सुमित्रा-संवादः--[म. भा. पा. ३५५–३५७]

कविकला, लोकशिक्षण आणि परमार्थ या दृष्टीनें हा संवाद तुलसीरामायणां-तल्या सर्व संवादांचा तिलक आहे.

हा संवाद आणि रामकौसल्यासंवाद यांची तुलना केली असतां कौसल्ये-पेक्षां देखील सुमित्रा जास्त उदात्त दिसते. सुमित्रेनें लक्ष्मणाविषयींचा पुत्रप्रेम अजीवात हृदयांतून काढून तिनें आपलें सर्व हृदयच रामचरणीं वाहिलें. आमच्या मतानें सर्व रामायणांत इतक्या उज्वल रामप्रेमाची स्त्रीभूमिका दुसरी नाहीं. तुलसीदासांनीं आपल्या स्त्रीशिक्षणाची सर्व तत्वें इच्याच पायीं वाहिलीं आहेत.

या संवादाचें सौंदर्य इतकें आहे कीं तें येथें सांगतां येणें शक्य नाहीं. फक्त त्या संबंधानें विचार करण्याची आमची दिशा आम्ही येथें दाखवितों.

वाल्मीकांत '**रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम्**' असा क्रम आहे. तो तुलसीदासांनीं बदलून '**तात तुम्हार मात वैदेही**' (बाळ! तुझी आई सीता) असा केला आहे. आमच्या मतानें या संवादाची मुख्य किल्ली ती हीच.

लक्ष्मणास '**माँगहु विदा मातुसन जाई**' [जाऊन मातेची आज्ञा घे.] ही रामाज्ञा होती. त्याप्रमाणें सुमित्रेस भेटून '**लषण कही सब कथा बिसेखी**' (लक्ष्मणानें सर्व सविस्तर वृत्त सांगितलें). त्यावरून सुमित्रेस लक्ष्मणाच्या घोरप्रघोर चुकाच दिसल्या. त्या ह्याः--

[१] लक्ष्मणास त्याची आई कोण हेंच कळलें नाहीं.

[२] रामास सोडून तिला भेटण्यास येण्याचें त्यास कारणच नव्हतें.

[३] लक्ष्मणास परमार्थाची दृष्टि उपजलीच नाहीं.

पहिल्या चुकीमुळें सुमित्रेस खेद वाटला, आणि दुसरी बद्दल तीस चीड आली. या मनोवृत्तींच्या झटापटींत ती आपल्या भाषणाची प्रस्तावना खालील प्रमाणें करून गेलीः- [म. भा. पा. ३५६]

**चौ०-तात तुम्हार मातु वैदेही। पिता रामु सब भाँति सनेही**
**अवध तहाँ जहँ रामनिवासू। तहइँ दिवस जहँ भानु प्रकासू**
**जौं पै सीयराम बन जाहीं। अवध तुम्हार काज कछु नाहीं**

( अर्थः- मुला ! तुझी आई जानकी, आणि वडील राम. तेच सर्वतोपरी तुजवर प्रेम करणारे आहेत. जेथें सूर्याचा प्रकाश तेथेंच दिवस. तसेंच जेथें रामाचा वास तेथेंच अयोध्या. जर खचितच सीताराम वनास जात आहेत तर या अयोध्येंत तुझें कांहींच प्रयोजन नाहीं. )

पण लगेच तीस लक्ष्मणाच्या अज्ञानाची कींव आली आणि शुद्ध उपासनेचें बीज तिनें खालील प्रमाणें विशद केलें:— [म. भा. पा. ३५६]

**चौ०—गुरु पितु मातु बंधु सुर साईं । सेइअहि सकल प्रान की नाईं**
**राम प्रानप्रिय जीवन जी के । स्वारथ रहित सखा सबही के**
**पूजनीय प्रिय परम जहाँते । सब मानिअहि राम के नाते**
**अस जिय जानि संग बन जाहू । लेहु तात जगजीवन लाहू**

अर्थः- गुरु, पिता, माता, बंधु, देव, स्वामी हे सर्व प्राणासारखे सेवनीय होत. राम प्राणांचेहि प्राण, जीवांचेहि जीवन, आणि सर्वांचे निरपेक्ष मित्र होत. त्यांना जेवढे म्हणून प्रिय पूज्य अथवा श्रेष्ठ असतील, ते सर्व रामाच्याच नात्यानें लेखले पाहिजेत. मनाचा असा निग्रह करून, मुला ! त्यांजबरोबर तूंहि वनास जा, आणि जगांत जगण्याचें सार्थक मिळीव.

त्यानंतर तिनें लक्ष्मणास गोंजारून आळविलें आणि रामसेवेसंबंधानें कळकळीचा उपदेश केला.

विशेष पाहण्यासारखें या सुमित्रेंत हें कीं एक क्षणभर देखील पुत्रप्रेमाचा तिनें आपल्या हृदयास स्पर्श होऊं दिला नाहीं, आणि म्हणूनच लक्ष्मणास जातांना तिनें उराशीं देखील धरिलें नाहीं.

सुमित्रेची अशी जाज्वल्य मात्रा पोंचल्यावर लक्ष्मण लगेच तिला नमस्कार करून '**चले तुरत संकित हृदय**' (साशंक मनानें चालता झाला). त्यास ही शंका झाली कीं रामप्रेमाची लाट निचरून जर पुत्रप्रेमाची लाट उसळली तर त्यास विलंब होईल, आणि तितक्यांत राम निघूनहि जातील.

माता आणि पुत्र दोघेहि खरे खंबीर.

[१३] गुह-राम-संवादः— (म. भा. पा. ३७५-३७७)

क्षालयामि तव पादपंकजम् । नाथ दारुदृषदोः किमंतरं ।
मानुषीकरणचूर्णमस्ति ते । पादयोरिति कथा प्रथीयसी ॥
पादांबुजं ते विमलं हि कृत्वा । पश्चात्परंतीरमहं नयामि ।
नोचेत्तरी सद्युवती मलेन । स्याच्चेद्विभो विद्धि कुटुंबहानिः ॥

[अध्या. रा. बाल. का. स. ६ श्लो. ३,४]

नाविकाची ही वरील उक्ति राम मिथिलेस जाते वेळची आहे. तुलसीदासांनीं ती गुहाकडून येथें वदविली आहे. तिच्यांत जास्त भाषणाची भर घालून त्यांनीं अप्रतिम रस उत्पन्न केला आहे. कविपाटव आणि विनोदीप्रेम यांचें या संवादांत अत्यंत मोहक मिश्रण झालें आहे. '**चितइ जानकी लषण तन**' (रामानें सीतालक्ष्मणाकडेस नजर फेंकली) यांतला ध्वनि देखील अप्रतिम साधला आहे. '**पदनख निरखि देवसरि हरषी । सुनि प्रभुवचन मोह मति करषी**' (प्रभुपदनख पाहून गंगेस हर्ष झाला होता. परंतु रामाचे शब्द ऐकून तिची मति मोहाकृष्ट झाली.) या चौपाईतली स्वभावोक्ति देखील फार खुबीदार आहे. '**पद पखारि जल**' इ. या दोह्यांतला सहोक्त्यलंकारहि उत्कृष्ट आहे.

[१४] रामवनप्रवासः— (म. भा. पा. ३८२-३९२)

भारद्वाजाश्रमापासून वाल्मिकाश्रमापर्यंतचें रामाच्या प्रवासाचें वर्णन अध्यात्मांत किंवा वाल्मीकांत असें नाहीं. या वर्णनांतलें प्रेम फारच हृदयंगम आणि द्रावक आहे. हनुमन्नाटकाच्या अंक ३ श्लो. १५ ची किंचित् छटा '**बहुरि बदन बिधु**' या वर्णनावर दिसते. पण खरें पाहिलें तर तें सर्व कवीच्या प्रतिभात्मक कल्पनेचेंच कार्य आहे.

[१५] प्रयागवर्णनः— (म. भा. पा. ३७९)

हें रूपक फारच बहारीचें आहे. यांतली राज्यविषयक कल्पना देखील नवीनच वाटते.

## [१६] वाल्मीकि-राम-संवादः— (म. भा. पा. ३९४-३९८)

हा संवाद अध्यात्माप्रमाणेंच आहे. पण माधुर्य यांतच जास्त आहे. या संवादांतला उपासनेचा उपन्यास फार सरल आणि सोपा झाल्यामुळें संवादास जास्त माधुर्य आलें अशी आमची समजूत आहे.

## (१७) रामाचा चित्रकूटनिवासः-- (म. भा. पा. ३९९-४०६ ).

या प्रकरणांत विविध विषय आलेले आहेत. त्यांपैकीं वन्यजनांची रामाशीं अकृत्रिम प्रेमळ वागणूक, आणि सीता, लक्ष्मण आणि राम यांची परस्पराशीं वर्तणूक, हीं वर्णनें अप्रतिम हृद्विकासी आहेत. अध्यात्मांत आणि वाल्मिकांत यांचा ठावठिकाणहि नाहीं. आम्हांस ती कवीची स्वयंकल्पना दिसते.

## [१८] सुमंताचा मार्गांत विलापः— [म. भा. पा. ४०६-४०९]

हा भाग फारच हृदयस्फोट करणारा आहे. यांतला करुणरस रामायणांत अन्यत्र कोणत्याहि स्थळीं सांपडत नाहीं. तो वांचून हृदय द्रवणार नाहीं '**स वै मुक्तोऽथवा पशुः**' असेंच आम्ही म्हणूं. करुणरसाचें कंकण बांधणाऱ्या **भवभूतीस** देखील या करुणरसाचें कौतुकच वाटलें असतें असें आम्हांस वाटतें.

या विलापवर्णनांत दोन दृष्टांत चमत्कारिक आढळतात ते हेः—

**[१] दो०--विप्र बिवेकी बेदबिद संमत साधु सुजाति।**
**जिमि धोके मदपान कर सचिव सोच तेहि भाँति॥**

**अर्थः**-विवेकी, वेदवित्, सन्मत, साधु आणि कुलीन अशा विप्रास धोक्यानें मद्यपान घडलें असतां त्यास जसा उद्वेग होतो, त्याप्रमाणें सुमंतास झालें.

**[२] चौ०-जिमि कुलीन तिय साधु सयानी। पतिदेवता करम-मन-बानी**
**रहइ करमबस परिहरि नाहू। सचिवहृदय तिमि दारुनदाहू**

**अर्थः**-जशी एखादी कुलीन, साध्वी, सुज्ञ, कर्म-मन-वाक्-पूर्वक पातिव्रत्य आचरणारी स्त्री प्रारब्धगतीनें पतीनें त्यागिली असतां दारुण हृत्ताप भोगीत असते, तद्वतच सुमंताची अवस्था झाली.

'कुलीनातिय' इ. वर्णनावरून स्वतःच्या पत्नीची कीर्ति अजरामर करण्याच्या उद्देशानें म्हणा, किंवा स्वतःच्या पश्चात्तापामुळें म्हणा, कवीनीं स्वपत्नीचें चित्र या वर्णनांत काढलें आहे असें म्हणतां येईल. परंतु 'विप्रविवेकी' इ. दोह्यांतल्या दृष्टांताचें प्रयोजकत्वासंबंधानें मात्र कांहींच अनुमान करतां येत नाहीं.

## (१९) लक्ष्मणाची कटूक्तिः— (म. भा. पा. ४१४)

'लषन कहे कछु [कांहीं] वचन कठोरा'

वाल्मीकांत दिलें आहे कीं बायकोच्या नादीं लागून रामास वनांत पाठविणाऱ्या दशरथास 'महाराजे पितृत्वन्नोपलक्षये' (मी बापच समजत नाहीं) असें लक्ष्मण बोलला. हें भाषण रागीट बिनधोरणी मुलाचें पितृनिंदा-व्यंजक स्पष्टच आहे. असें भाषण लोकशिक्षणास केवळ निरुपयोगीच नसून घातक आहे असें समजून तुलसीदासांनीं तें अगदींच वगळून येथें त्या संबंधानें फक्त कटूक्ति एवढा तरी शेरा मारला परंतु या पूर्वींचें (वनवासास निघाल्याच्या वेळचें] लक्ष्मणाचें अध्यात्म आणि वाल्मीकि यांतलें भाषण अतिशयच प्रखर आणि अनन्वित असल्याकारणानें त्याचा त्यांनीं मुळींदेखील उल्लेख केला नाहीं.

## (२०) सुमंताची भूमिकाः— (म. भा. पा. ४११-४१४)

हीं भूमिका जशी वाल्मीकादिकांत आहे तशीच ती तुलसीदासांनींहि ठेविली आहे.

आमच्या मतानें ही भूमिका मूळचीच फार विसंगत आहे. सुमंत राजमंत्री म्हणवून अक्षम्य चुका त्याजकडून झाल्या आहेत याचें नवल वाटतें. प्रथम तर त्यानें दशरथाच्या इच्छेप्रमाणें त्यास चित्रकूटावर रामाकडेस न्यावयाचें होतें. तें त्यानें केलें नाहीं. हीच त्याची पहिली भयंकर चूक झाली. पुढें त्यानें दशरथास ज्ञानोपदेश करण्याचा आविर्भाव आणला तोही चुकीचाच होता. कारण त्यानें स्वतःच्या स्थितीचा मुळीं देखील विचार केला नाहीं. तिसरें, मुत्सद्दीपणास तो अगदींच मुकला. 'न्हाइ रहे जलपान करि' [स्नानानंतर नुसत्या जल-पानावरच रामादिक राहिले], 'वट छीरु मंगावा। जटामुकुट बनावा'

(वटक्षीर मागवून जटा वळल्या) इ. इ. गोष्टी दशरथास त्यानें त्या वेळेस सांगावयाच्या नव्हत्या. शेवटीं इतकें करून तरी त्यानें स्वतःस सांवरावयाचें होतें. पण तेंहि तो करूं शकला नाहीं. एकंदर भाषणाचें पर्यवसान त्यानें 'जियत फिरेउ लेइ राम संदेसू' [मी रामाचा निरोप घेऊन जीवंतच परतलों] अशा दुःखातिरेकांत केलें. त्याचा परिणाम 'सचिव वचन सुनतहि नरनाहू। परेउ धरनि उर दारुन दाहू॥' (सुमंताचा प्रस्ताव ऐकतांच राजा दारुणदुःखाच्या दाहानें धरणीवर चीत झाला) अशा रीतीनें असह्य होऊन दसरथास मरणोन्मुख करण्यांत झाला.

तुलसीदासांना अशी भूमिका खपावयाची नाहीं. परंतु मूळ इतिहासाप्रमाणें त्यांस दसरथासच खपविणें भाग झाल्यामुळें त्यांस पूर्वपीठिकेचाच सुमंत पसंत करण्यापरतां गत्यंतरच उरलें नाहीं.

**[२१] दशरथनिधनकालीन कौसल्येचें भाषणः– (म. मा. पा. ४१५)**

या भाषणा संबंधानें कौसल्येच्या भूमिकेंत आह्मी विचार केला आहे.

**(२२) भरताची अयोध्येस येण्याची तयारीः– (म. भा. पा. ४१७)**

वाल्मीकींत भरतास दुःस्वप्नें पडलीं, त्या योगानें तो घावरून गेला; आणि त्याला गायनवादनादिक विलास न सुचून दूतांवरोवर तो लगेच अयोध्येस आला असें वर्णन आहे. अध्यात्मांत तर इतकेंहि नाहीं.

तुलसीदासांनीं भरतास दुःस्वप्नें पडलीं आणि त्यांच्या शांत्यर्थ त्यानें शिवाभिषेक, ब्राह्मणभोजनें वगैरे करून कुटुंबांतल्या सर्व माणसांचें कुशल असावें अशी देवास प्रार्थना केली, आणि दूतांकडून गुरुजींची आज्ञा ऐकतांच तो गणपतिस्मरण करून निघाला, अशा रीतीचें भरताचें वर्णन केलें आहे.

हें वर्णन केवळ स्वयंकल्पित आहे. या वरून तुलसीदासांची स्वभावोक्ति आणि व्यवहारशिक्षण यांजकडे किती लक्ष आहे हें सहज लक्षांत येईल.

**(२३) शत्रुघ्नाचें मंथराताडनः– (म. भा. पा. ४२२)**

मंथरेस शत्रुघ्नानें मारलेलें वाल्मिकांत आहे, अध्यात्मांत नाहीं.

[२४] भरताशीं कौसल्येचें वर्तनः- [ म. भा. पा. ४२३ ]

हा भाग कौसल्येच्या भूमिकेंत येणार आहे.

(२५) भरताचें शपथप्रमाणः- ( म. भा. पा. ४२५ )

अध्यात्मांत वसिष्ठहत्येचीच शपथ घेऊन भरत मोकळा झाला आहे. वाल्मिकांत त्यानें पुष्कळच शपथा घेतल्या आहेत. त्यांतून कांहीं ठळक अशा तुलसीदासांनीं नेंचून त्यांत कांहीं आपल्या पदरच्याहि घातल्या आहेत.

'जे नहिं साधुसंग अनुरागे' या चार चौपायांतलें शपथ-वर्णन तत्कालीन पातकांची स्थिति पाहून तुलसीदासांनीं तीच दिलेली दिसते.

[२६] पतिसहगमनः- ( म. भा. पा. ४२७ )

दशरथा बरोबर त्याच्या स्त्रियांची सहगमनाची इच्छा, भरताकडून त्यांस निषेध, आणि केवळ रामदर्शनाच्या इच्छेनें त्यांचें परत फिरणें हें वर्णन अध्यातमांत आणि वाल्मीकांत नाहीं. या वरून हें सर्व वर्णन कविकल्पनेचेंच आहे.

स्त्रियांच्या सहगमनाच्या निवारणावरून त्यांची गमनेच्छा आणि तयारी प्रथम दर्शवून मग केवळ रामदर्शना करितांच स्त्रियांचें मागें फिरणें ही योजना फारच प्रौढ आणि गंभीर आहे.

भूमिकांच्या आचारांत पूर्वापर विरोध न येण्याविषयीं तुलसीदास किती काळजी घेतात हें वरील वर्णनावरून सहज कळेल. हेंच खऱ्या उत्कृष्ट कवीचें लक्षण.

(२७) वसिष्ठांचें भरताशीं भाषणः- [ म. भा. पा. ४२७-४३१ ]

या भाषणाची ठेवण खरोखरच फार मोहक आहे. यांतली कारण-परंपरा जितकी सरळ आणि साधी आहे तितकीच ती परिणामकारकहि आहे. हें भाषण ऐकून सर्वच सभासदानां तें 'गुरु आयसु' म्हणजे गुरुजींचें आज्ञा-पत्रच वाटलें. भाषण खरोखरच आज्ञात्मक आहे काय हाच येथें प्रश्न आहे.

भाषण जर आज्ञात्मक असतें तर तें भरतानें आपल्या विचारांनीं खोडून काढिलें असतें काय ? काढलेंच असतें तर वसिष्ठांनां तो उपमर्द सहन झाला असता काय ? जर सहन झाला नसता तर त्याचा परिणाम भरतास नडला नसता काय ? इ. इ. विचार घेतले म्हणजे भाषणाच्या आज्ञापरत्वाची खरोखरच शंका वाटते.

या खेरीज असेंहि वाटतें कीं जर वसिष्ठांस स्वतःच्या आज्ञेचा भरताकडून भंग झाला असें वाटलें असतें तर ते भरताबरोबर वनांत गेले नसते, आणि रामासमोर भरताची प्रशंसाहि न करते.

वरील कारणांवरून आम्हांस वाटतें कीं वसिष्ठाचें भाषण केवळ लोक-रंजनार्थक होतें. त्यांच्या मनांतून भरताची परीक्षा पहावयाची होती कीं हा खरोखर कैकयीच्या कटांत शामिल आहे कीं काय. जर शामिल असेल तर तो त्यांच्या रसभरित भाषणाचा आधार घेऊन राज्य करील, आणि शामिल नसेल तर त्याचा बेत काय आहे तो तरी त्याच्या मुखातून बाहेर पडेल.

आम्ही या भाषणाचें असें यथार्थ प्रयोजन समजतों, आणि वसिष्ठांस खरे मुत्सद्दी ( व्यवहारपटु ) मानितों.

## [२८] भरताचें प्रत्युत्तरः— ( म. भा. पा. ४३२-४३७ )

भरताच्या या भाषणाचा आरंभ, मध्य, आणि समाप्ति किती चातुर्याची आहेत तें लक्षांत आलें म्हणजे तुलसीदास कोणत्या दर्जाचे मुत्सद्दी होते तें समजून येतें.

भरताच्या भाषणाचा मुख्य मुद्दा तो हाः—

‘ एहि ते जानहु मोर हित कै आपन बड काज ’ [ या योगानें आपण आपलें एक महत्कार्य साधणार किंवा माझें हित करणार ? ]. या मुद्यानें त्यानें सर्वांनाच अगदीं आपल्या पेचांत आणून धरलें. ह्या पकडीनें त्यानें सर्वांवरच मात केली. फार काय पण वसिष्ठांना देखील या पेचाची तोड सुचली नाहीं, आणि म्हणूनच ते गप बसले. अखेर या भाषणावर कोणाचीच मात्रा चालेनाशी होऊन सर्वच निमूटपणें भरताच्या कासेस लागले.

अखेर वरील मुद्याच्या प्रश्नांचा निकाल भरतानें असा लाविलाः—

जाउँ राम पहिँ आयसु देहू । एकहि आँक मोर हित एहू
मोहि नृप करि आपनभल चहहू । सोउ सनेह जडतावस कहहू

[ अर्थः-मी रामाकडेच जाणार. आपण मजला आज्ञा द्यावी. ही एकच गोष्ट, आणि हेंच माझें हित. मला राजा करून तुम्ही आपली पोळी शिजवूं पहात आहां. परंतु तुमच्या मजवरील प्रेमामुळें तुमची ती अप्रबुद्धता होत आहे. ]

ही बाजू सर्वांवरच अशी कांहीं बिनतोड उलटली की जर कोणी जरा देखील विरोध केला असता तर त्याचा कैकयीच्या कटाशीं एकदम संबंध जुळवला गेला असता. भरत किती उच्च दर्जाचा मुत्सद्दी आहे तें आतां पुरतें पाहून घ्यावें.

याला म्हणतात शेरास सव्वाशेर. जेथें कांहीं तरी पाणी मुरतें तेथें पोकळी असावयाचीच. जेथें कांहींच नाहीं तेच भरतासारखे रामापर्यंत उड्डाण घेऊं शकतील.

[२९] गुहाचें त्याच्या सैनिकांस प्रोत्साहनः- [ म. भा. पा. ४४२ ]

चौ०-समर मरन पुनि सुरसरितीरा । रामकाज छनभंगु सरीरा
भरत भाइ नृप मैं जन नीचू । बडे भाग अस पाइय मीचू
स्वामिकाज करिहउँ रन रारी । जस धवलिहउँ भुवन दसचारी
तजउँ प्रान रघुनाथ निहोरे । दुहूँ हाथ मुदमोदक मोरे
साधुसमाज न जाकर लेखा । राम भगतमहँ जासु न रेखा
जाय जियत जग सो महिभारू । जननी-जौवन-बिटप-कुठारू

[ अर्थ-युद्धांत मरण, तेंहि फिरून गंगातटाकीं, रामाचें कार्य, क्षणभंगुर शरीर, रामबंधु-राजा भरत आणि मी यःकश्चित् पामर! असल्या मरणाचा योगायोग महद्भाग्यानेंच प्राप्त होत असतो. स्वामिकार्यासाठीं रणांत धुमश्चक्री माजवून आणि चतुर्दश भुवनें आपल्या यशानें धवलित करून हे माझे प्राण मी माझ्या राघवाप्रीत्यर्थ खर्चा घालणार. माझ्या दोन्ही हातीं आनंदाचेच मोदक

येणार. साधुसमाजांत ज्याची गणना नाहीं आणि रामभक्तांत जो मोडला जात नाहीं, तो जगांत जन्मून जीवंत राहिल्यास पृथ्वीस केवळ भारभूतच होय. तो आपल्या मातेच्या यौवनरूपी वृक्षास कुठारभूतच जाणावा.)

यांत भर्तृहरीच्या वैराग्यशतकांतल्या खालील श्लोकांतल्या कल्पनेंतली पारमार्थिक छटा घेऊन कवीनें स्वतःचीच कल्पना केलेली आहे.

'न ध्यातं पदमीश्वरस्य विधिवत्संसारविच्छित्तये ।
स्वर्गद्वारकपाटपाटनपटुर्धर्मोऽपि नोपार्जितः ॥
× × × ×
मातुः केवलमेव यौवनवनच्छेदे कुठाराः वयं ॥

अत्यंत रामप्रेमपुष्ट आणि वीररसोद्दीपक हें वर्णन झालें आहे. स्वयंसैनिक आणि त्यांचे पुढारी यांनीं, किंबहुना सर्व हिंदुस्थानच्या लोकांनीं, वरील वर्णन उपयोगी होत असल्यास पहावें.

[३०] गुहास शकुनः— (म. भा. पा. ४४४)

चौ०-इतना कहत छीक भइ बायँ । कहेउ सगुनिअन्ह खेत सुहाये

(अर्थः-गुह इतकें बोलल्यानंतर त्याच्या डावीकडेस शिंक झाली. शकुनज्ञानीं शेत चांगलेंच पिकेल (म्हणजे शुभशकुन) म्हणून सांगितलें.)

येथलें स्वभावनिरीक्षण बहारीचें आहे. असल्या मंडळांत देखील तुलसीदास शिरकत होते असें दिसतें.

[३१] तुलसीदासांची प्रेमलहरः— (म. भा. पा. ४४५)

चौ०- भेंटत भरत ताहि अतिप्रीती । लोग सिहाहिँ प्रेम कै रीती
धन्य धन्य धुनि मंगलमूला । सुर सराहिँ तेहि बरसहिँ फूला

भरत गुहाशीं अतिप्रेमानें भेटत असतां त्याच्या प्रेमाचा प्रकार लोक वाखाणूं लागले. 'धन्य' 'धन्य' अशा घोषानें देव, भरताची प्रशंसा करून त्याजवर पुष्पवृष्टि करूं लागले.

लोक वेद सब भाँतिहिँ नीचा। जासु छाहँ छुइ लेइय सींचा
तेहि भरि अंक रामलघुभ्राता। मिलत पुलकपरिपूरित गाता॥

तात्विक, व्यावहारिक वगैरे सर्वच रीतींनीं जो नीच, ज्याच्या छायेचा स्पर्श होतांच मार्जन केलेंच पाहिजे, त्यास रामाचा धाकटा बंधु जो भरत तो पुलकप्रपूरितगात्र होत्साता कडकडून भेटला !

राम राम कहि जे जमुहाहीँ। तिन्हहिँ न पाप पुंज समुहाहीँ
एहि तौ राम लाइ उर लीन्हा। कुलसमेत जग पावन कीन्हा

'राम राम' म्हणत जे जांभई देतात त्यांचे पापांचे पर्वत देखील नष्ट होतात. ह्याला तर प्रत्यक्ष रामांनीं उचलून हृदयाशीं कवटाळिलें आणि त्यांच्या कुळासकट त्यास जगांत पावन केलें.

करमनास-जल सुरसरि परई। तेहि को कहहु सीस नहिँ धरई
उलटा नाम जपत जग जाना। बालमीकि भये ब्रम्हसमाना

कर्मनाशा नदीचें पाणी गंगेंत मिळाल्यावर त्यास मस्तकावर कोण घेणार नाहीं ? रामनाम उलटें जपूनहि वाल्मीकि ब्रम्हरूप झाले ह्यास सर्व जग साक्ष आहे.

दो०-स्वपच सवर खस जमन जड पाँवर कोल किरात।
राम कहत पावन परम होत भुवन विख्यात॥

चांडाल, शबर, कसाई, यवन, कोळी, किरात इत्यादि नीच दुरात्मे देखील परम पवित्र अशा रामनामोच्चारानें त्रैलोक्यविख्यात होतात.

चौ०-नहिँ अचरज जुग जुग चलि आई। केहि न दीन्ह रघुबीर बडाई

हें आश्चर्य नव्हें. हें असें अनादिकालापासूनच चालत आलें आहे. रघुवीरानें कोणास उच्चता दिली नाहीं ?

या वर्णनाचें महत्व नुसत्या प्रेमलहरीपर्यंतच नाहीं. तुलसीदासांचें धर्मतत्व समजण्यास हें वर्णन अत्यंत उपयुक्त आहे. हेंच या वर्णनाचें खरें महत्व होय.

## (३२) भरताचा भरद्वाजकृत सत्कारः– (म. भा. पा. ४५४-४६२)

या प्रसंगाची रमणीयता अगदीं विलक्षण आहे. भरद्वाजा करून रामाचा देखील असा सत्कार झाला नाहीं.

भरता संबंधानें भरद्वाजाकडून जीं प्रशंसावाक्यें निघालीं आहेत त्यांची रमणीयता '**यतो वाचो निवर्तंते**' अशीच आहे. ज्यांस हें आमचें म्हणणें अतिशयोक्तीचें वाटेल त्यांच्यासाठीं आम्ही खालील उतारा देतों.

(म. भा. पा. ४५७-४५९)

**सुनहु भरत हम झूठ न कहहीं। उदासीन तापस वन रहहीं**
**सब साधन कर सुफल सुहावा। लषन राम सिय दरसन पावा**
**तेहि फल कर फल दरस तुम्हारा। सहित प्रयाग सुभाग हमारा**
**भरत धन्य तुम्ह जग जस जयऊ। कहि अस प्रेम मगन मुनि भयऊ**

('भरता ऐक आम्ही उदासीन, तपस्वी आणि वनवासी आहों. असत्य भाषण आम्ही करीतच नाहीं. सर्व साधनांचें अपूर्व फळ म्हणजे सीताराम-लक्ष्मणांचें दर्शन; आणि तें आम्हांस मिळालें. त्या फलाचें फल हें तुझें दर्शन होय. प्रयागासह आम्ही आज मोठे भाग्यवान् झालों. भरता! तूंच धन्य आहेस. जगांत यश तूंच गाजविलेंस.' इतकें म्हणून मुनि प्रेमांत निमग्न झाले).

भरताच्या स्तवानें भरद्वाजासारख्यास जेथें प्रेमसमाधि लागतो तेथें '**यतो वाचो निवर्तंते**' म्हणावयाचें नाहीं तर म्हणावें तरी काय?

भरद्वाजांच्या भाषणांतलें भरताच्या कीर्तिचंद्राचें रूपक अत्यंत उत्कृष्ट आहे. '**कीरति बिधु तुम्ह कीन्ह अनूपा। जहँ बस राम प्रेम मृगरूपा**' (तुझा कीर्तिचंद्र अद्वितीय आहे. त्यांत रामचंद्र प्रेमरूप मृगाच्या रूपानें वास करितात) हें त्या रूपकाचें हृदय आहे. भरतास चंद्र करून रामास मृग केल्यानें रामकीर्ति गौण आणि भरतकीर्ति अर्थांतच श्रेष्ठ झाली.

या रूपकाचा भाव असा दिसतो कीं दशरथादिकांच्या यशचंद्रा पासून रामचंद्र निराळाच राहतो. परंतु भरताच्या यशचंद्रा पासून मात्र रामचंद्र विभक्त

राहूं शकत नाहीं. तो त्यांत इतका निमग्न झाला आहे कीं त्यास आतां बाहेर येणेंच शक्य नाहीं. फिरून विशेष हें कीं तो त्याच्या समोर अगदीं फिकाहि पडला.

रामभरद्वाजसंवाद आणि भरतभरद्वाज-संवाद यांची तुलना करून निघणारे सिद्धांत फार बोधप्रद आहेत म्हणून ते आम्ही येथें देतोंः—

(१) भरद्वाजांस रामांनीं भक्तिवर दिला. परंतु ती भक्ति त्यांस राम शिकवूं शकले नाहींत. ती शिकविणारा त्यांचा गुरु तो हा भरत.

(२) ईश्वराची कृपा येथवरच समजावयाची कीं तिच्यामुळें गुरु अथवा संत यांची भेट होणें. या पलीकडे तिचें कार्य चालत नाहीं. पुढें भक्ति ही फक्त संत अथवा गुरु यांच्याच देणगीनें मिळेल. ईश्वर ती या द्वारा खेरीज स्वतः देत नाहीं.

(३) रामदर्शनापेक्षां संतदर्शनच श्रेष्ठ आहे. कारण चित्तशुद्धि सत्संगा-खेरीज व्हावयाची नाहीं हा सिद्धांत आहे.

या संवादांत तुलसीदासांनीं खालील वाक्य दिलें आहेः—

**चौ०–'रामभगत अब अमिय अघाहू । कीन्हेहु सुलभ सुधा बसु-धाहू'**

[अर्थः-आतां मात्र रामभक्त (भरत प्रेमाच्या) अमृतानें तृप्त होतील कारण हें अमृत पृथ्वीवर तूं [भरतानें] सुलभ केलें आहे.

वरील 'अब' शद्बानें तत्पूर्वकालीं अमृताचा अभाव निदर्शित झाला. हा अभाव वाल्मीकिरामायणांत स्पष्टच दिसतो. म्हणून या 'अब' शद्बांत आम्हास असा ध्वनि वाटतो कीं वाल्मीकच तुलसीदास होऊन त्यांनी त्यांच्या पहिल्या रामायणांतल्या भक्तीची उणीव या दुसऱ्या रामायणानें भरून काढिली. (कविपारंचिय लेख १ पहा.)

[३३] राम आणि भरत यांच्या महात्म्याची तुलनाः—

[म. भा. पा. ४६२–४६३]

दो०ः—किये जाहिँ छाया जलद सुखद वहत बरबात।
तस मगु भयउ न राम कहँ जस भा भरतहिँ जात॥

भरतास प्रसन्न करण्या साठीं मेघ छाया करूं लागले व सुखकारक वारा वाहूं लागला. एकंदरीत भरत जात असतां त्यास जसा मार्ग (सुखकर) लाधला तसा रामांनाहि लाधला नव्हता.

चौ०ः–जडचेतन मग जीव घनेरे। जे चितये प्रभु जिन्ह प्रभु हेरे
ते सब भये परमपदजोगू। भरतदरस मेटा भवरोगू

मार्गांतील पुष्कळसेच स्थावर जंगम जीव, ज्यांनीं प्रभूंना पाहिले होतें आणि प्रभूंनीं ज्यांना पाहिलें होतें, ते सर्वच परमपदाचे अधिकारी झाले होते. तरी भरताच्या दर्शनानें ह्यांचा भवरोगच हरविला.

यह बडि बात भरतकी नाहीँ। सुमिरत जिनहिँ राम मन माहीँ
बारेक राम कहत जग जेऊ। होत तरन तारन नर तेऊ

खुद्द रामच मनांत ज्याचें स्मरण करितात त्या भरता संबंधानें ही गोष्ट ह्मणजे फारशी आश्चर्यकारक नव्हे. जगांत जो कोणी रामाचें नांव नुसतें एकवेळ जरी उच्चारील तरी तो देखील स्वतःस उद्धरून दुसऱ्याचा उद्धार करील.

भरत रामप्रिय पुनि लघुभ्राता। कस न होइ मगु मंगलदाता
सिद्ध साधु मुनिवर अस कहहीँ। भरतहिँ निरखि हरष हिय लहहीँ

" भरत आधींच रामास प्रिय, त्यांतून त्यांचा तो कनिष्ठ बंधु, तेव्हां त्यास मार्ग मंगलप्रद कसा होणार नाहीं? ह्या प्रमाणें सिद्ध, साधु, आणि मुनिवर ह्मणत असत आणि भरताचे दर्शन घेऊन हृदयांत हर्षभरित होत असत.

या वर्णनांत राम आणि भरत यांच्या महात्म्याची तुलसीदासांनीं तुलना करून भरतासच श्रेष्ठत्व दिलें आहे. हें वर्णन फारच मार्मिक आहे. यांत रामापेक्षां भरतच श्रेष्ठ ( ह्मणजे देवा पेक्षां संतच मोठे ) ठरविला आहे.

या तुलनेंतला भाव असा दिसतो कीं जीवाला रामदर्शन परमपदास पात्र करितें, पण त्याची संसारयात्रा संपल्याखेरीज त्यास परमपदप्राप्ति शक्य होत नाहीं. परंतु संतदर्शन ( किंवा गुरुदर्शन ) जीवाचा संसारच संपवून टाकते. म्हणजे संतकृपा अशी आहे कीं तिच्या योगानें संसारच परमपद होतो. हेंच मुकुंदराजांच्या भाषेंत बोलावयाचें ह्मणजे '**याचि देहीं याचि डोळा । भोगूं मुक्तीचा सोहळा** ,॥ अथवा गीतेच्या भाषेंत सांगावयाचें ह्मणजे '**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः**' ।

## (३४) देवांना गुरूपदेशः– पा. ( ४६४–४६५ )

या वर्णनांत भरताची खरी योग्यता दाखविली आहे. हें वर्णन फार आल्हादकारक आहे. '**भरतसरिस को रामसनेही । जगु जप राम राम जप जेहीं**' ]भरतासारखा रामप्रिय कोण आहे ? जग रामाचा जप करितें, पण राम भरताचा जप करितात ] हा या वर्णनाचा आत्मा होय. '**अगुन अलेख अमान एक रस । राम सगुन भये भगतप्रेमबस** ( अगुण, अलक्ष्य, मानरहित, एकरस, असा जो राम तोच भक्ताच्या प्रेमास्तव सगुण झाला ) हा त्याचा देह होय. '**करम प्रधान विस्व करि राखा । जो जस करइ सो तस फल चाखा**' ( जशी कृति तदनुसार फलभोग या कर्मप्रधान तत्वावर सृष्टीची रचना झाली आहे. ) हा त्या देहाचा व्यवहार होय. '**तदपि करहिँ सम विषम विहारा । भगत अभगत हृदय अनुहारा**' ( तरी देखील भक्ता भक्तांच्या भावनानुरुप भगवंताचे विहार समविषम होतात.) हें त्या देहाचें हृदय होय. आणि '**राम सदा सेवक रुचि राखी**' [राम निरंतर सेवकाचीच मर्जी संभाळतात] हे त्याचे प्रिय विलास होत.

[३५] भरत-प्रेम-प्रभावः-पा. ४६५

**जबहिं राम कहि लेहिं उसासा । उमगत प्रेम मनहुँ चहुँ पासा**
**द्रवहिं बचन सुनि कुलिस पखाना ॥**

अर्थः-' राम ' ह्मणून जेव्हां भरत उसासे टाकी तेव्हां प्रेम चोहोंबाजूंनीं उचंबळून आलें आहे असें वाटे. त्याचे प्रेमोद्गार ऐकून कुलिशपाषाणांना देखील पाझर फुटे.

भरताच्या प्रेमाचा प्रभाव यांत कवीनें दाखविला आहे. यास जे कोणी अतिशयोक्ति समजतील त्यांस भक्तीची कल्पनाच नाहीं आणि त्यांस भारतवर्षाची हवा मानवत नाहीं असेंच म्हणावें लागेल.

[३६] सीतेचें स्वप्नः— [ म. भा. पा. ४७० ]

या स्वप्नांत सीतेस सर्व राममाता विधवा दिसल्या, आणि भरत मंडळी सहवर्तमान रामाकडेस येत आहे असें दिसलें. अध्यात्म आणि वाल्मींकि यांत हें स्वप्न नाहीं. तें कविकल्पनेंतलेंच आहे असें दिसतें. परंतु लक्ष्मणाच्या कोपाची प्रस्तावना या दृष्टीनें त्यास जास्त महत्व येतें, आणि त्याबरोबरच कवीच्या कल्पकतेची तें चांगलीच उच्चता दाखवितें.

[३७] लक्ष्मणक्रोधाभिनिवेशः-- ( म. भा. पा. ४७१-४७४ )

ही लक्ष्मणकोपोक्ति तुलसीदासांनीं खुपच रंगविली आहे. लक्ष्मणाचा स्वभाव या उक्तींत चांगलाच निर्दिष्ठ होतो. हें वर्णन लक्ष्मणाच्या विकारवशतेच्या कविनिरीक्षणाचा विचार करण्यासारखा नमूना आहे. अशा स्वभावाच्या व्यक्तीकडून दुसऱ्याच्या चांगुलपणाचें कांहींहि कारण नसतां एका क्षणांत कसें मोतेरें होतें तें कवींनीं फार मार्मिक रीतीनें दाखविलें आहे. लक्ष्मण क्रोधाविष्ट होण्यापूर्वी त्यास भरत किती तरी चांगला दिसत होता. परंतु तोच भरत क्रोधाच्या लहरींत लक्ष्मणास '**भरत हमहिँ उपचार न थोरा**' ( भरतानें आमची कांहीं थोडीथोडकी संभावना केलेली नाहीं. ) इतका विद्रूप दिसूं लागला.

हें वर्णन अध्यात्मांत आणि वाल्मीकींत इतकें मार्मिक नाहीं.

[३८] आकाशवाणीः— [म. भा. पा. ४७४]

ही आकाशवाणी अध्यात्मादिकांत कोठेंहि प्रगटलेली नाहीं. ती कवींच्या हृदयाकाशांत प्रथमच प्रगटलेली दिसते. परंतु संविधानक या दृष्टीनें तिची किंमत फार आहे. कवींनीं या वाणीच्या योगानें लक्ष्मणाच्या त्वेषाचा भडका रामास देखील अनावर वाटला हें दाखविलें. ही आकाशवाणीची योजना कवींच्या सप्रभ कल्पनेची जोरदार साक्ष आहे.

[३९] भरतप्रेमप्रभाववर्णनः— [म. भा. पा. ४७४-४७७]

तुलसीदासांच्या भरताची भूमिका किती प्रेममय आहे तें या वर्णनांत अगदीं स्पष्ट दिसतें. रामाच्या भरतप्रशंसेचा आणि भरताच्या भक्तीचा इतका उत्कर्ष या वर्णनांत दाखविल्यानें भरताच्या चित्रकूटावरील चरित्रावर फार मननीय प्रकाश पडतो.

[४०] रामलक्ष्मणसीता यांचें वनचित्रः– (म. भा. पा. ४७९)

चौ०:-ए तरु सरितसमीप गुसाँई । रघुवर परनकुटी जहँ छाई
तुलसी तरुवर विविध सुहाये। कहुँ कहुँ सिय कहुँ लषन लगाये
बटछाया बेदिका बनाई। सिय निजपानिसरोज सुहाई

दो०:- जहाँ वैठि मुनिगनसहित नित सिय राम सुजान
सुनहिँ कथा इतिहास सब आगम निगम पुरान॥

[ अर्थः- ( गुह टेंकडी वर उभा राहून खालीं असलेल्या भरतास सांगतो ) महाराज ! हे वृक्ष बहुतेक नदीच्या [ मंदाकिनीच्या ) कांठींच असून

तेथेंच ती रघुवराची पर्णकुटी उभारली आहे. नानाप्रकारें तुळशीचीं झाडेंहि सुरेखशीं कोठें कोठें सीतेनें आणि कोठें लक्ष्मणानें लाविलीं आहेत. वटछायेंत सीतेनें स्वहस्तकमलांनीं सुंदर पार देखील बांधला आहे. त्यावर मुनिगणांसह बसून सर्वज्ञ सीतारामचंद्र नित्य वेदांत, शास्त्र, पुराणें, इतिहास वगैरेची चर्चा करीत असतात.)

सीता-रामलक्ष्मणाचें हें वनचित्र येथेंच डोळाभर पाहून घ्यावें. फिरून तें तसें कोठेंहि दिसणार नाहीं.

[४१] रामभरतभेटीचा पूर्वरंगः— (म. भा. पा. ४८१)

चौ०-सानुज सखा समेत मगन मन। बिसरे हरष-सोक-सुख-दुख-गन

पाहि नाथ कहि पाहि गुसाईं। भूतल परे लकुट की नाईं

बंधु आणि गुह यांच्या सह भरताचें मन तल्लीन होऊन तो हर्षशोक, सुखदुःख सर्वच विसरून गेला. 'हे नाथ!' 'हे स्वामिन!' 'पाहिमाम्' 'मां पाहि' असें म्हणत भरत शुष्क काष्ठाप्रमाणें भूतला वर पडला.

बचन सप्रेम लषन पहिचाने। करत प्रनाम भरत जिय जाने
बंधु सनेह सरस एहि ओरा। इत साहिब सेवा बरजोरा
मिलि न जाइ नहिं गुदरत बनई। सुकवि लषनमनकी गति भनई

ते प्रेमोद्गार लक्ष्मणानें ओळखिले आणि हा भरतच प्रणाम करीत आहे अशी त्याची खात्री झाली. परंतु एकीकडे सरस बंधुप्रेम आणि दुसरीकडे खडतर स्वामिसेवा, अशा स्थितींत लक्ष्मणास त्यास भेटण्यासहि जाववेना आणि न जावें तर राहवेना अशी त्याची स्थिति झाली. लक्ष्मणाच्या मनाची ती स्थिति एका सन्मान्य कवीनें (?) वर्णन केली आहे ती अशीः--

रहे राखि सेवा पर भारू। चढी चंग जनु खैंच खिलारू

उंच आकाशांत गेलेल्या वावडीची जशी उडविणारा ओढताण करितो तद्वत् लक्ष्मणाची गत झाली. परंतु अखेरीस सेवेवरच भिस्त ठेवून तो तसाच राहिला.

**कहत सप्रेम नाइ महि माथा। भरत प्रनाम करत रघुनाथा**
**उठे राम सुनि प्रेम अधीरा। कहुँ पट कहुँ निषंग धनु तीरा**

लक्ष्मण जमीनीस डोकें टेंकून सप्रेम म्हणालाः– "राघवा! भरत प्रमाण करीत आहे." तें ऐकतांच राम प्रेमानें अगदींच उतावीळ होऊन उठले. (ते लगबगीनें जात असतां) कोठें त्यांचें वस्त्र पडलें, तर कोठें भाते आणि धनुष्यबाण गळाले.

या वर्णनांतला भाव अत्यंत चमत्कारिक आहे. कांहीं वेळ भरत पालथा पडलेलाच राहिला, तरी देखील रामांनीं हूं कीं चूं केलें नाहीं. जणुंकाय त्याचे **'पाहि नाथ, पाहि गुसाईं'** हे काकलुतीनें मोठ्यानें उच्चारलेले शब्द त्यांनीं ऐकिलेच नाहींत. लक्ष्मण फारच गडबडला, पण रामाची मर्यादा (सेवाधर्म) त्यास जागेवरून चकचकूं देईना. कांहीं वेळानें त्यानें संधी पाहून रामास भरताची वर्दी दिली, तेव्हां कोठें रामाची दृष्टी भरतावर गेली आणि त्यांस त्याच्या भेटीची तळमळ झाली. असा हा भरत भेटीचा पूर्वरंग अध्यात्म किंवा वाल्मीकि यांत नाहीं. तुलसीदासांनींच हा असा कां दाखवावा हा प्रश्न आहे.

लक्ष्मणास भरताची शरणागती ऐकूं आली आणि रामास ती ऐकूंच आली नाहीं हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. आमच्या मतानें रामांनीं हें सगळें नाटक मुद्दाम केलें. त्यांना लक्ष्मणाचे क्रोधावेशांतले शब्द त्याच्याच घशांत कोंबावयाचे होते. म्हणून त्यांनीं लक्ष्मणास त्याच्या भरतविषयक दुरुक्ति खऱ्याखोट्या करून घेण्यास मुद्दाम अवसर दिला. अखेर जेव्हां भरताच्या शुद्धतेबद्दल त्यास खात्री होऊन तो पश्चातापानें गहिंवरून रामाच्या समोर जमीनीवर डोकें टेंकून आणि अगदीं दीन होऊन काकलुत करूं लागला तेव्हां राम उठले. ही शिष्ट, मार्मिक आणि तत्काळ परिणामकारक शिक्षणपद्धति विशेष लक्षांत घेण्यालायक आहे.

[४२] गुह-वसिष्ठ-भेटः— (म. भा. पा. ४८४)

**प्रेम पुलकि केवट कहि नामू। कीन्ह दूरि तें दंड प्रनामू**
**राम सखा रिषि बरबस भेटे। जनु महि लुटत सनेह समेटे**

प्रेमपुलकित होऊन आणि स्वनामोच्चार करून गुहानें लांबूनच दंडप्रणाम केला. रामसखा म्हणून वसिष्ठ त्यास बळेंच भेटले. जणुंकाय जमीनीवर लोळणारें प्रेमच त्यांनीं गोळा केलें.

**रघुपति भगति सुमंगल मूला। नभ सराहिँ सुर बरिषहिँ फूला**
**एहि सम निपट नीच कोउ नाहीँ। बड बसिष्ठसम को जग माहीँ**

गुहावर देव आकाशांतून पुष्पवृष्टि करून त्यास धन्यवाद देऊं लागले. (ते म्हणत) रघुपतींची भक्ति सुमंगलांची आदिमाता होय. जगांत गुहासारखा अत्यंत नीच कोणीच नसून वसिष्ठासारखा श्रेष्ठ तरी कोण आहे?

वास्तविक पाहतां गुह भरतवसिष्ठांच्या मंडळींतलाच असल्यामुळें गुह-वसिष्ठ-भेटीची जरूर नव्हती. मग या निष्प्रयोजन भेटींचें प्रयोजन काय?

वसिष्ठ गुहास पहिल्या भेटींत दुरूनच आणि ओझरतेच भेटले होते. भरत मात्र त्यास रथाखालीं उतरून कडकडून भेटला होता. पुढें गुह स्वारी-बरोबरच राहिला. या सहवासामुळें त्याची रामनिष्ठा वसिष्ठांस अनायासेंच दिसून आली. या वेळेस तो खुद्द रामाबरोबर आलेला पाहून आणि त्याच्या नमस्काराचा प्रकार पाहून त्यांस पहिल्या भेटीची आठवण होऊन पोटांत भडभडून आलें असावें. म्हणूनच ते त्यास '**बरबस**' (जबरदस्तीनें) भेटले.

वसिष्ठासारख्यानां देखील आपल्या शिक्षणपरंपरेंत खेंचण्याची तुलसीदासांची खरोखरच तारीफ आहे.

तुलसीदासांचें खरें धर्ममत अवगत होण्यास हा प्रसंग फारच उपयुक्त आहे. या वर्णनाचें खरें महत्व याच गोष्टींत आहे असें आमचें मत आहे.

## [४३] भरताच्या मंडळीचा वन्यजनांकडून आदरः—

(म. भा. पा. ४८९–४९०)

लोकशिक्षणाचा हा एक अमोल भाग आहे. रामासारख्या चारित्र्यवान् पुरुषाच्या दर्शनानें हिंस्र-पशु-सारख्या मानवांवर देखील कसे उत्तम परिणाम होतात हें दाखविणारा हा भाग आहे. 'सत्संगाद्भवतिहि साधुता खलानां' किंवा 'सठ सुधरहिँ सत संगति पाई। पारस परसि कुधातु सुहाई' हें सिद्ध करण्यासाठीं या भागाचा फार उत्कृष्ट उपयोग होईल. अह्मांस तर वाटतें कीं चारित्र्यवान् पुरुषांच्या चारित्र्याच्या कसोटी साठींच हा असला हीन मानववर्ग ईश्वरानें उत्पन्न केला असावा.

या वर्णनांत स्वभावोक्तीची कमाल आहे, परंतु विस्तरभयामुळें तें देतां येत नाहीं.

## [४४] भरतवसिष्ठादिकांचें खलवतः— (म. भा. पा. ४९२-४९५)

हें खलवत रामभरताच्या भावी खलवताचा पूर्वरंगच समजलें पाहिजे. यांत वसिष्ठ भरताच्या रामप्रेमाची कसोटी पहात आहेत. पहिल्या भरतवसिष्ठ-संवादांत [म्हणजे अयोध्येंतल्या दरबारांत] वसिष्ठ राजकीय (Political) मुत्सदी होते. येथें ते पारमार्थिक मुत्सदी बनले आहेत. परंतु येथेंहि पहिल्या सारखेंच भरतासमोर त्यांस हात टेकावे लागले, आणि अखेर भरताची सरशी त्यांस कबूलच करावी लागली. येथें पाहण्या सारखी गोष्ट ही कीं त्यांस त्यांच्या हारीचा जितका आनंद झाला तितका त्यांची जर जीत झाली असती तर कदापि न होता. इतकेंच नाहीं, पण उलट त्यांस त्यांच्या जीतीचेंच वाईट वाटलें असते. देवानें गुरुत्व जर दिलेंच तर तें वसिष्ठा सारखें द्यावें असेंच या प्रसंगा वरून कोणासहि वाटेल. भरताच्या रामप्रेमाची परीक्षा पाहणारा वसिष्ठ लगेच महदानंदानें आणि खऱ्या कळवळ्यानें भरताचा रामा समोर वकील होतो या पेक्षां जास्त गुरुपणास शोभणाऱ्या मनमोकळेपणास आणि औदार्यास सीमाच राहूं शकत नाहीं. आमच्या या प्रशंसेची सत्यता पाहणारानीं लगतच्या वसिष्ठ-शिष्ठाईच्या सदरांत ती अगदीं कसून पाहून घ्यावी.

[४५] वसिष्ठशिष्टाई:— (म. भा. पा. ४९६)

कह मुनि राम सत्य तुम्ह भाखा। भरत सनेह विचार न राखा
तेहि तें कहउँ बहोरि बहोरी। भरत भगति भइ मम मति भोरी
मोरे जान भरतरुचि राखी। जो कीजिय सो सुभ सिव साखी'

(पा. ४९५-९६)

अर्थः-रामा! तुझें बोलणें जरी अगदीं खरें आहे तरी भरताच्या प्रेमाचा विचार मात्र त्यांत झालेला नाहीं. एवढ्या साठीं मी तुला वारंवार सांगतों कीं भरताच्या भक्तीनें माझी बुद्धि अगदीं भारली गेली आहे. मी तुला शंकरांचीच शपथ घेऊन सांगतों कीं आतां मात्र भरताची मर्जी संभाळूनच जे कांहीं तुला करितां येईल तेंच माझ्या मतानें श्रेयस्कर होईल.

योगवासिष्ठ सांगून रामास अविकारी आणि अक्रिय ब्रह्म बनविणारा वसिष्ठ तुलसीदासांच्या संसर्गानें रामास कसा सविकारी आणि सक्रिय बनवून राहिला आहे आणि पूर्वीच्या ब्रम्हज्ञानांतली जाणविणारी शुष्कता कशी भरून काढीत आहे हें येथें प्रत्यक्ष पाहून घ्यावें. आमचें हें बोलणें ('सुनि आचरज करइ जनि कोई') ऐकून कोणासहि आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. ('सत-संगति-महिमा नहिँ गोई') सत्संगाचा महिमा कधींच झांकला जावयाचा नाहीं.

वसिष्ठा संबंधानें वरील व्याख्यान त्यांची भूमिका (भूमिकापरिचय पहा) समजण्यास फारच उपयोगी होईल.

वसिष्ठांच्या शिष्टाईचा रामावर काय परिणाम झाला तो रामाच्या ह्या एकाच वाक्यांत दिसून येतोः—

'भरत कहहिँ सोइ किये भलाई। अस कहि राम रहे अरगाई'

(अर्थः-'भरतवाक्यच करणें इष्ट' इतकें बोलून राम स्तब्ध झाले.) 'द्विर्नाभिभाषते' असा राम तुलसीदासांच्या भक्तिभावनेस पटला

नाहीं हें येथें अगदीं स्पष्ट दिसतें. तुलसीदासांनीं आपल्या लोकशिक्षणाकरितां भक्ताराधक रामच पसंत केला, आणि त्या रामाची मनोभूमिका तयार करण्यास साहित्य श्रीशुकाचार्यांच्या खालील श्लोकांतून घेतलें असें कोणासहि वाटेलः--

[ भाग. स्कं. ३, अ, १६. ]

× × ×

**सोहं भवद्भ्य उपलब्धसुतीर्थकीर्तिश्छिंद्यां स्वबाहुमपि वः प्रतिकूलवृत्तिम् ॥ ६ ॥**

## [४६] भरताचें भाषण, आणि रामाचें त्यास उत्तरः—

[ म. भा. पा. ४९७ ते ५०० ]

कोणत्याहि दृष्टीनें पाहिल्यास भरताच्या या भाषणांतले बहुतेक सगळे विचार अगदींच सामान्य आहेत. परंतु एका प्रेमाच्या ओलीनें तेच बोल अतिशय खोल वाटतात. हीच या भाषणाची खरी खुबी आहे, आणि तेवढ्यामुळें हें भाषण फार गहन झालें आहे.

या भाषणांत जर खरोखरच कांहीं गहन नसतें तर रामांनीं आपल्या भाषणांत भरताच्या प्रशंसेचा अगदीं कळस केला नसता. सगळ्या रामायणांत इतर कोणाचीहि अशी प्रशंसा रामांनीं केलेली आढळत नाहीं.

अशा सामान्य विचारांत इतक्या गहनतेचा भाग तरी कोणता असा स्वाभाविकच प्रश्न उत्पन्न होतो. आमच्या मतानें तो भाग भरताच्या **कृतज्ञतेच्या** भावनेचा होय. कारणें अगदींच क्षुद्र असतांहि भव्य आणि भरपूर **कृतज्ञता** हेंच भरताच्या भाषणांत (केव्हांहि झालें तरी) मुख्य पहावयाचें असतें. केवळ ह्या **कृतज्ञताबुद्धीनेंच** तुलसीदासांचा भरत रामाला प्रिय आणि त्रैलोक्यास आदरपात्र झाला आहे.

भरत आणि राम यांचीं भाषणें प्रत्यक्ष वाचल्या खेरीज वरील विचारांचें सारस्य समजणें शक्य नाहीं. हीं भाषणें प्रत्यक्ष मूळांतून वाचण्याची आम्हीं मुद्दाम शिफारस करितों. त्याचें कारण अयोध्याकांडाच्या शेष भागाचा तीं पाया आहेत. रामभरतांच्या यां भाषणांतलें परस्पर व्यवहारांचें तत्व ( म्हणजे **परस्परांविषयीं कृतज्ञता**) कळलें म्हणजे तुलसीदासांच्या रामभरतांचे सर्वच व्यवहार समजण्यास मुळींच अडचण पडत नाहीं.

## [४७] भरताचें दुसरें भाषणः— (पा. ५०१ ते ५०४)

भरताचा मुख्य भाव जो या त्याच्या भाषणास कारणीभूत झाला तो हाः-

**चौ०-निजपन तजि राखेउ पन मोरा। छोह सनेह कीन्ह नहिं थोरा**

**दो०-कीन्ह अनुग्रह अमित अति सब विधि सीता नाथ।**

× × ×

(**अर्थः**-आपला पण बाजूस सारून रामांनीं माझाच पण कायम ठेविला हें त्यांचें कृत्य कांहीं थोड्या थोडक्या प्रेमाचें आणि लडिवाळाचें नव्हे. या योगानें सीतानाथानें मजवर सर्वच प्रकारें अत्यंत अमित अनुग्रह केला आहे.)

भरतास कोठेंहि पहा **कृतज्ञता** हा जो त्याचा विशेष आहे तो त्यास केव्हांहि सोडीत नाहीं. त्याचे सर्व व्यवहार मृदु आणि मनोहर होण्यास कारण केवळ हा एकच विशेष होय असें आम्हांस वाटतें. ह्याच एका विशेषाच्या जोरावर तो रामांनीं म्हटल्या प्रमाणें त्रैलोक्यविजयी, त्रैलोक्यपावन आणि त्रैलोक्यगुरु झाला आहे. [म. भा. पा. ४९९ वरील रामाचें भाषण पहा.]

वरील सूचना समोर ठेवून भरताचें भाषण वाचून पहावें म्हणजे लगेच दिसतें कीं त्याच्या प्रेमाचा पूर कितीं तरी अतोनात चढतो.

[४८] जनकप्रवेशः— (पा. ५०४ ते ५१०)

चित्रकूट-स्थलीन जनकप्रवेश हा अध्यात्मांतहि नाहीं आणि वाल्मीकांतहि नाहीं. तो नसण्यानें व्यवहार फारच शून्य दिसतो. ती उणीव तुलसीदासांनीं आपल्या सूक्ष्म निरीक्षणानें पाहिली आणि भरून काढिली. म्हणूनच तुलसीदासांचा जनक अत्यंत व्यवहारचतुर झाला आहे. जनकानें तुलसीदासांची दीक्षा घेतली त्याचा हा प्रभाव असेंच येथें म्हणावें लागतें.

या प्रवेशानें अयोध्याकांडाचा अखेरचा भाग फार गोड आणि उठावदार झाला आहे हें तो प्रवेश वाचल्यानें तावडतोब लक्षांत येईल.

तुलसीदासांचा जनक 'सोह न राम प्रेम बिनु ज्ञाना' [म्हणजे भगवतांतल्या– 'नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनम्'] या तत्वाचा आहे. म्हणूनच तो चित्रकूटशिखरदर्शन होण्या बरोबर 'करि प्रनाम रथ त्यागेउ तबहीं' रथ सोडून दंडवत घालणारा झाला आहे. वरील तत्वच या प्रवेशांतला मुख्य विशेष होय.

जनक प्रवेशाच्या पूर्वींचीं आणि पश्चातचीं लोकस्थलादिवर्णनें या प्रवेशाच्या उठावदारपणास बरींच सहायक झालीं आहेत असेंहि दिसून येतें.

[४९] राजस्त्रियांची बैठकः— [५१२ ते ५१६]

राजस्त्रियांची बैठक हा एक नाटकी नमुना कवींनीं घातला आहे. परंतु काव्यदृष्ट्या त्याची किंमत फार आहे. ही बैठक जर तुलसीदासांनीं जमविली नसती तर चित्रकूटावर राजस्त्रियांनीं येण्याचा त्रास कशा करितां घेतला असेंच म्हणण्याची पाळी आली असती. लोकशिक्षण, व्यवहार आणि कविकला या दृष्टींनीं या राजस्त्रियांच्या बैठकीस अत्यंत महत्व आलें आहे हें त्या बैठकीचें वर्णन वाचतांक्षणींच लक्षांत येईल. त्याचें निराळें उद्घाटन करण्याची अवश्यकता नाहीं. हें वर्णन वाचतांना प्रत्येक भूमिकेचा स्वभाव एकदम डोळ्यांत भरतो ही त्या वर्णनाची चमत्कारिक खुबी आहे.

### (५०) जनक आणि सुनयना ( जनकमहिषी ) यांचा संवादः—
[ म, भा. पा. ५१७ ते ५१९ ]

हा संवाद चित्रकूटावरील कथनाकाचें जणुंकाय जीवनच आहे. या प्रवेशांतल्या जनककृत जानकीप्रशंसेनें वाचकांचा आत्मा एकदम विकसित होतो, आणि भरतप्रशंसेनें तो एकदम प्रशांत होतो.

हा प्रवेश वाचतांच अशी कल्पना होते कीं जर जनक रामदर्शनास न येता तर मात्र वाचकांचें अनन्वित नुकसान झालें असतें. कारण भरताच्या पारमार्थिकतत्त्वाचें तत्वतः उद्‌घाटन, भरताच्या आणि रामाच्या विशेषांचें तुलनात्मक निदर्शन आणि भरताच्या पारमार्थिक योग्यतेचें आविष्करण अधिकारनिविष्टेतेनें आणि निःपक्षपातानें चित्रकूटाच्या रंगभूमीवर जसें जनकानें केलें आहे तसें क्दाचित् कोणींहि केलें नसतें.

तुलसीदासांच्या जनकाचे आपण सर्वच अत्यंत ऋणी आहोंत यांत शंकाच नाहीं. परंतु त्याबद्दल आपण आभार मात्र तुलसीदासांचेच मानावयाचे, कारण त्याचा ( जनकाचा ) देखील संतोष त्याच योगानें होईल.

### [५१] राम आणि वसिष्ठ यांचा एकांतः— (भ. भा. पा. ५१९-५२०)

हा एकांत वरील संवादा इतकाच औपकारिक आहे. फरक एवढाच कीं जनकानें भरता संबधानें ज्ञान करून दिल्यानें जगतावर त्याचे प्रत्यक्ष उपकार झाले आहेत, आणि वसिष्ठांनीं स्वतःच्याच ज्ञानास रामप्रेमाची पुरवणी जोडल्यानें लोकांवर त्यांचें अप्रत्यक्ष उपकार झाले आहेत.

### ( ५२ ) देव-शारदा-प्रवेशः— [ भ. भा. पा. ५२३ ]

अयोध्या कांडाच्या आरंभीं अशा प्रकारचा एक प्रवेश गेला आहे. ( नं. २ 'सरस्वति आवाहन' पहा ) त्या वेळेस देव शारदेस फितवूं शकले. त्यामुळें त्यांना जणुं संवयच लागल्या सारखी झाली. म्हणून त्यांनीं फिरून तिचे आवाहन केलें. पण तिनें या वेळेस देवांच्या डोळयांत चांगलेंच चुरचुरीत अंजन घातलें आणि ती चालती झाली.

या प्रवेशाच्या रूपानें भरताचे गुणानुवाद गाण्यास शारदेस तुलसीदासच सहायक झाले. त्या बद्दल त्यांचे उपकार मानून ते फेडण्यासाठींच कीं काय ती तुलसीदासांच्या जिव्हेवर आसन घालून बसली अशी साहजिक कल्पना होते. कारण तिचा प्रसाद असल्या खेरीज तुलसीदासांची वाणी इतकी स्फुरद्रूप आणि प्रभावशाली कशी होणार ?

( ५३ ) **आमदरबारः—** [ प्र. भा. पा. ५२४ ते ५३३ ]

या दरबारांत प्रथम भरताचें आणि नंतर रामाचें अशीं दोन भाषणें मुख्य आहेत. हीं दोन्हीहि भाषणें सगळया अयोध्याकांडातच काय पण सगळ्या रामायणांत देखील पहिल्या प्रतीचीं आहेत. रामाचें भाषण इतकें लांबलचक आणि मनमोकळेपणाचें सगळया रामायणांत तें एकच आहे. हीं दोन्हीहि भाषणें दिसण्यांत अगदीं स्वतंत्र दिसतात. परंतु विचारा अंतीं हेंच ठरतें कीं या दोन्हींचाहि सामान्य विशेष अगदीं एक आहे. हा सामान्य विशेष म्हटला म्हणजे परस्परां विषयीं **कृतज्ञता** हा होय.

हीं भाषणें इतकीं चमत्कारिक आहेत कीं यांचा तरतमभाव पाहणारा स्वतःच गोंधळांत पडतो. आम्ही इतकेंच म्हणूं शकूं कीं भरताचें भाषण सेवाधर्माचा एक अप्रतिम नमुना आहे, आणि रामाचें भाषण स्वामीधर्माचा अनुपम मासला आहे; दोन्हींहि भाषणांत सामान्य विशेष एकच असल्यानें प्रेमाचे प्रवाह दोन्हींतूनहि सारख्याच प्रमाणानें वाहतात; आणि लोकशिक्षणदृष्टीनें दोन्हींचीहि योग्यता अगदीं सारखी आहे. स्वामिसेवकांच्या हृदयांचें ज्यांत एकीकरण झालेलें आहे असे आदर्शभूत प्रसंग तुलसीदासांच्या रामायणांत फक्त अयोध्याकांड आणि सुंदरकांड यांतच जास्त दिसतील. तरी इतक्या दृढ एकीकरणाचा प्रसंग आमच्या मतानें हा एकच आहे. म्हणून तर या प्रसंगावर कवीकडून

**'सेवक कर' पद नयन से मुख सो साहिब होइ'**

( **अर्थ**-सेवक कर, पद, नयन असे असून स्वामी हें मुख होय ) हा छाप अखेर मारण्यांत आला आहे.

या दोन भाषणांची योग्यता तुलसीदासांच्याच शद्वांनीं दाखवून आम्ही हें व्याख्यान संपवितों:—

| चौः- | चौः— |
| --- | --- |
| 'भरत सुभाउ न सुगम निगमहू | ' सिथिल समाज सनेह समाधी ' |
| [ भरताचा सद्भाव वेदांना देखील अगम्य आहे. ] | [ रामाच्या प्रेमानें सर्व समाज प्रेमसमाधीनें शिथिल झाला. ] |

## [ ५४ ] भरताची पंचक्रोशीः— ( म. भा. पा. ५३३-५३७ )

तीर्थयात्रा कोणत्या भावनेनें आणि कशा रीतीनें करण्यांत यावी हें या प्रसंगावरून समजावून घ्यावयाचें आहे.

संक्षेपाच्या मानानें या वर्णनाचें माधुर्य खरोखरच फार जास्त आहे. परंतु हा वर्णनसंक्षेप देखील आमच्या या मानसहंसाच्या देहाच्या [ विस्ताराच्या ] मानानें भयजनक आहे. म्हणून खालील अवतरणच केवळ सूत्ररूप समजून वाचकांनीं संतोष मानावाः—

**चौः—प्रभुपद अंकित अवनि बिसेखी। आयसु होइ त आवउँ देखी**

अर्थः—प्रभूची आज्ञा असल्यास प्रभुपदांकित विशिष्ट स्थलें पाहून येईन.

## [ ५५ ] शेवटची बैठकः—[ म. भा. पा. ५३७ ते ५३९ ]

हा प्रवेश वाचतानांच अगदीं उदास वाटतो. वरात गेल्यावर मांडवांत जशी सामसूम वाटते तसेंच या प्रसंगा पासून कांडाच्या समाप्ती पर्यंत एकसारखें वाटत असतें. हा भाग वाचतांना तर मुळींच उल्हास रहात नाहीं. हें कर्वीच्या मानासिक स्थितीचेंच निदर्शक समजलें पाहिजे.

## [ ५६ ] भरताचा अयोध्या निवास आणि राज्य व्यवस्था.

म. भा.पा. ५४५ ५४८

हें प्रकरण फार उदात्त आणि बोधप्रचुर आहे. तें अवश्य वाचण्या सारखें आहे. फार विस्तृत म्हणून तें येथें देतां येत नाहीं. आमच्या मतानें त्याचें ह्रदय हें:-

तेहि पुर बसत भरत बिनु रागा। चंचरीक जिमि चंपक बागा॥

[ भ्रमर जसा चंपकवनांत राहतो तद्वत् त्या अयोध्या नगरांत अनासक्त होत्साता भरत राहूं लागला. ]

## कांडोपसंहार.

वाल्मीकांनीं आपल्या रामायणांत भरताच्या प्रेमाचें वास्तविक स्वरूप दर्शविलें नव्हतें हें त्यांस बोंचत असावें. म्हणूनच यदृच्छेनें आलेल्या प्रसंगाचा [ कविपरिचय लेख १ पहा ] फायदा घेऊन भरताच्या भूमिकेची दुरुस्ती करण्याचें त्यांनीं योजिलें असावें.

परंतु तें काम त्यांस फार अघटित वाटलें असावें. तसें नसतें तर गुरूचें मंगल त्यांनीं प्रारंभास केलेंच नसतें. ग्रंथारंभास जसें मंगल असतें अशांतलें हें मंगल आहे. पुढच्या इतर कोणत्याहि कांडारंभास त्यांचें असें मंगल नाहीं ही गोष्ट लक्ष्यांत घेण्या सारखी आहे.

अयोध्याकांड वाचून कोणाहि भाविकास सहज वाटतें कीं गुरुप्रसादा खेरीज वाणींत इतका प्रसाद खात्रीनें यावयाचा नाहीं.

या कांडांत वाल्मीकि आणि अध्यात्म यांतील मुख्य मुख्य कथानक आणि पात्रें घेतलेलीं आहेत. बाकी बहुतेक कवींच्या कल्पनेचाच भरणा दिसतो. चित्रकूटावरचा जनकाचा सपत्निक प्रवेश दाखविल्यानें तर कविकल्पनेची परमावधिच झाली असें म्हणण्यास खरोखर कांहींच हरकत नाहीं. एकंदर वर्णना वरून अशीच खात्री वाटते कीं भरताचा उत्कट प्रेम दाखविण्यास व्यवहार आणि लोकशिक्षण या दोहों परतां कोणताहि निर्बंध कवीनें स्वतःवर लादून घेतलेला नाहीं.

तुलसीदासांचे राम आणि भरत यानां कोणत्या तरी रामायणांत समानशील जोड आढळेल ही फार आशा होती, परंतु अखेर

आमची निराशाच झाली. अयोध्याकांड ( तुलसीरामायणाचें ) सर्वांत जास्त वेधक झालें याचें मुख्य कारण ही रामभरताची अद्वितीय जोडीच होय.

सर्व रामायणांनीं आमची निराशा केली, परंतु भागवतानें मात्र आमची आशा पुरविली. त्यानें भीष्म आणि भगवान् ( श्रीकृष्ण ) ही जोडि आम्हांस दाखविली. येथें भरत जसें **'निजप्रन तजि राखेउ प्रन मोरा'** ( आपला पण बाजूस सारून माझाच पण कायम केला ) रामास म्हणतो तसेंच **'स्वनिगममपहाय मत्प्रतिज्ञामृतमधिकर्तुमवप्लुतो रथस्थः'** (भाग. स्क. १, अ ९ श्लोक ३७ ) असें भीष्म म्हणाले आहेत. यावरून अनुमान करण्यास जागा आहे कीं रामभरतांची जोडी श्रीकृष्णभीष्म या जोडीवरून तुलसीदासांनीं कदाचित् प्रस्थापित केली असावी. असें असल्यास त्यांच्या बुद्धिमत्तेची प्रशंसा केली तितकी खरोखर शोभण्या सारखीच आहे.

वाल्मीकाच्या किंवा अध्यात्माच्या युद्धकांडाचें नांव बदलून तुलसीदासांनीं त्यास जसें लंकाकांड हे नांव दिलें, तसेंच या कांडाचें **'अयोध्याकांड'** हें नांव बदलून जर त्यास **'प्रेमकांड'** हें नांव योजिलें असतें तर तें अगदीं योग्य होतें. **'पुरनर-भरत-प्रीति मैं गाई। मति अनुरूप अनूप सुहाई'** (अयोध्येच्या प्रजेचें आणि भरताचें **प्रेम मी यथामति अनुपम सुंदर गाईलें** ) असें अरण्यकांडाच्या अगदीं आरंभास तुलसीदासांनीं म्हटलें आहे. यावरून त्यांना देखील आमच्या प्रमाणेंच कल्पना आली असावी असें दिसतें.

भरताच्या भूमिकेसंबंधानें आम्हीं कांहीं सांगावें तर खुद्द तुलसीदासांनीं इतकें कांहीं अगाऊच सांगून ठेविलें आहे कीं त्याहून जास्त सांगणें कोणा-सहि अशक्य आहे. याचें कारण त्यांस या भूमिकेचा लागलेला बेहद्द छंद होय यास प्रमाण त्यांचाच हा छंद पहाः—

**सियराम-प्रेम-पियूष पूर होत जनम न भरत को।**
**मुनिमन अगम जम नियम सम दम विषम व्रत आचरत को ।।**

**दुख दाह दारिद दंभ दूसन सुजस मिस अपहरत को ।**
**कलिकाल तुलसीसे सठहिँ हठि राम सनमुख करत को॥**

अर्थ–सीतारामांच्या प्रेमामृतानें परिपूर्ण अशा भरताचा जन्मच जर झाला नसता तर मुनींच्या मनाला देखील अगम्य अशीं यम, नियम, शम दम, इत्यादि दुर्धर व्रतें कोण आचरण करता! दुःखाग्नि, दारिद्र्य, दंभ इत्यादि दोषांचें आपल्या सद्यशाच्या मिषानें कोणीं निवारण केलें असतें! आणि ह्या कलिकालांत तुलसीदासासारख्या शठांना वळजबरीनें रामासमोर कोणीं नेऊन उभें केलें असतें!

सर्वच रीतींनें भूमिका वर्णनाची शिकस्त झाली.

अखेर फक्त फलश्रुतिसंबंधानें थोडा विचार करून हें समालोचन समाप्त करूं.

खालीं दिल्याप्रमाणें या कांडाची फलश्रुति आहेः—

**सो०—भरतचरित करि नेम तुलसी जे सादर सुनहिँ ।**
**सीयरामपद प्रेम अवसि होइ भवरस विरति ॥**

तुलसीदास म्हणतातः—भरताचें चरित्र नियमपूर्वक जो कोणी आदर-भावानें श्रवण करील तो भवरसापासून विरक्त होऊन अवश्यमेव सीतारामचरणीं प्रेम करील.

वरील सोरठ्यांतले '**अवसि**' आणि '**भवरसविरति**' हे शब्द फार महत्वाचे आहेत.

पहिल्यांतला आत्मविश्वास आणि दुसऱ्यांतलें वैराग्य तुलसीरामायणांतल्या कोणत्याहि कांडांच्या फलश्रुतींत आढळत नाहींत ही गोष्ट विशेष चिंत्य आहे. या कांडाच्या प्रारंभीं केलेल्या गुरुचरणाच्या मंगलास वास्तविक हीच फल-श्रुति ( वैराग्य आणि रामभक्ति ) समर्पक होय.

विशेष गोष्ट आणखी एक अशी कीं इतर प्रत्येक कांडाच्या फलश्रुतींत कोणत्या तरी तऱ्हेनें रामाचें माहात्म्य प्रामुख्यानें दर्शविलें आहे. येथें तसें नाहीं. या कांडाच्या फलश्रुतींत एकट्या भरताचेंच माहात्म्य दाखविलें आहे.

वरील प्रकारावरून सहजच प्रश्न उद्भवतो कीं या कांडाचा नायक कोण–**भरत कीं राम ?** वरील सोरठ्याच्या शब्दरचनेवरून तुलसीदासांना देखील हा प्रश्न स्फुरला असावा. नाहींतर त्यांनीं **'भरतचरित'** हें पद मुद्दाम न घालतां नेहमीं प्रमाणें **'रामचरित'** हें पद घातलें असतें. **'भरतचरित'** हें पद घातल्यानें भरतचरित्राचा नायक अर्थातच भरत ठरला. म्हणजे अयोध्याकांडाच्या उत्तरार्धाचा नायक भरत, आणि पूर्वार्धाचा नायक राम अशी त्यांनीं वरील प्रश्नाची व्यवस्था लाविलेली दिसते.

श्रीमद्भागवतांत जसा दशमस्कंध तसेंच तुलसीरामायणांत हें अयोध्याकांड होय.

## अरण्यकांड.

तुलसीदासांनीं अयोध्याकांडाची समाप्ति भरताकडून अयोध्येच्या राज्यासनावर रामपादुकांची स्थापना करवून केली, आणि हें कांड रामाच्या चित्रकूटनिवास सोडण्याच्या तयारी पासून सुरू केलें. अध्यात्मांत आणि वाल्मीकांत या कांडाची सुरवात विराधवधापासून होते. अर्थाचा प्रमाणें कांडाचा नामनिर्देश असावा असा कवीचा आशय दिसतो. ही व्यवस्था कोणासहि सयुक्तिक आणि मार्मिकच वाटेल.

### [१] जयंतकथाः— (म. भा. पा. ५५०–५५२)

या कांडाचा प्रारंभ जयंतकथेपासून होतो. ही कथा अध्यात्मांत आणि वाल्मीकांत सीतामारुति संवादांत म्हणजे सुंदरकांडांत आहे. ज्या अर्थी जयंताख्यान चित्रकूटावर घडलेलें आहे त्या अर्थी तें याच कांडांत असणें चांगलें

अध्यात्मांत आणि वाल्मीकांत जयंत कोणाच्या सांगण्यावरून रामास शरण गेला हें दिलेलें नाहीं. त्यामुळें मन थोडेसें चुकचुकल्यासारखें होतें. त

ओळखून तुलसीदासांनीं नारदासारख्या महनीय व्यक्तीस मध्यें आणून संविधानक जुळविलें, आणि त्रुटि भरून काढिली. या योगानें त्यांच्या गाढ निरीक्षणाची, मार्मिक कल्पकतेची आणि प्रौढ व्यवहाराची सहज कल्पना करितां येते.

परंतु त्याहिपेक्षां जास्त त्यांच्या प्रसादाचा उत्कर्ष पाहण्यासारखा आहे. तो '**नारद देखा बिकल जयंता। लागि दया कोमलचित संता**' (जयंतास विकल पाहून नारदास दया आली. कारण संत मनाचे मृदुच असतात.) या चौपाईंत पाहण्यास मिळतो.

## [२] राम आणि अत्रि यांची भेटः— (म. भा. पा. ५५२-५५४)

यांतली अत्रिकृत रामस्तुति फारच प्रेमळ आहे. जास्त लांबलचक म्हणून ती देतां येत नाहीं. या स्तुतीच्या छंदास नगस्वरूपिणी किंवा प्रमाणिका म्हणतात. हा छंदच फार मोहक असल्यामुळें स्तुतिसाठीं त्याची योजना फार सुंदर झाली आहे.

हा अत्रिस्तव अध्यात्मांत किंवा वाल्मीकांत नाहीं. या वरून त्यांतले अत्रि पराकाष्ठेचे अध्यात्मिक असण्याचा भास होतो. तुलसीदास त्यांस अध्यात्मिक ठेवून प्रेमळ बनवितात. त्यामुळें त्यांची अत्रिऋषीची भूमिका जास्त चित्ताकर्षक झाली आहे.

## [३] अनुसूयासीताभेटः— (म. भा. पा. ५५४-५५५)

ही भेट आणि सीतेस अनुसूयेचा उपदेश अध्यात्मांत आणि वाल्मीकांत आहे. परंतु तेथल्या उपदेशांत तुलसीदासांनीं दिलेलें पतिव्रतांचें चातुर्विध्य नाहीं. या चातुर्विध्यानें विचार करण्याची नवीनच परंतु फार मार्मिक अशी रीत तुलसीदासांनीं शिकविली आहे. (पुढें लोकशिक्षणांत स्त्रीशिक्षण या सदराखालीं हें चातुर्विध्य येणार आहे. म्हणून तें येथें दिलें नाहीं.)

## [४] रामसुतीक्ष्णसंवादः— [म. भा. पा. ५५९-५६४]

हा संवाद सर्वच रामायणांत आहे, परंतु तो येथल्या सारखा प्रेमळ आणि आल्हादकारक इतरत्र नाहीं. काव्यदृष्टीनें देखील तो कविकौशल्याचा अप्रतिम नमुना आहे.

आदर, विनय, विनोद आणि प्रेम या गुणसमुच्चयानें समान अशा भूमिका रामायणांत गुह आणि सुतीक्ष्ण ह्या दोनच आहेत. तरी गुह प्रेमानें सुतीक्ष्णा इतका मतवाला बनलेला नाहीं. या दृष्टीनें पाहिल्यास सुतीक्ष्णाची भूमिका सगळ्या रामायणांत अद्वितीय आहे. हा सुतीक्ष्ण तुलसीदासांचीच प्रतिमा असावी कीं काय येथवर देखील वाटण्याची मजल येते.

## [५] लक्ष्मणास रामाचा ज्ञानोपदेशः— [ म. भा. पा. ५६७-५६९ ]

अध्यात्मांत हा उपदेश अर. कां. स. ४ श्लो. १७ पासून सुरूं होतो. त्यांत माया, ज्ञानाची साधनें, विज्ञानसंयुतज्ञान आणि परमात्मा इतक्या संबंधानें व्याख्यान आहे.

त्याचाच आधार घेऊन तुलसीदासांनीं हा ज्ञानोपदेशप्रसंग येथें घातला आहे. परंतु मूळातलें त्याचें शुद्ध अध्यात्मिक स्वरूप बदलून येथें तें भक्तिप्रधान केलेलें आहे. म्हणून येथला उपदेश बराच सोपा झालेला आहे. लोकशिक्षणास विशेष उपयुक्त असा वास्तविक हाच.

## [६] शूर्पणखाः— ( म. भा. पा. ५६९-५७० )

तुलसीदासांच्या शूर्पणखेच्या तुलनेस अध्यात्म आणि वाल्मीकि यांची शूर्पणखा बरीच भाबडी वाटते. तुलसीदासांची शूर्पणखा अकबराच्या कारकीर्दीतली असल्यामुळें स्वाभाविकच ती महा चवचाल, छटेल आणि कारस्थानी झाली आहे. म्हणूनच ती '**अबलगि रही कुमारी**' ( आजवर मी '**कुमारीच**' राहिली) असें म्हणण्याचें धाडस करूं शकली. परंतु त्यामुळें त्यांच्या रामास देखील '**सीतहि चितइ कही प्रभु बाता। अहइ कुमार मोर लघु भ्राता**' (सीतेकडेस पाहून रामानें गोष्ट बनविली. ते म्हणाले हा माझा कनिष्ठ बंधू देखील '**कुमार**'-च आहे. भाव हा कीं तूं जर '**कुमारी**' आहेस तर हाहि एक चांगला '**कुमार**'-च आहे.) अशा रीतीनें तितक्या पुरतें तरी रंगेल बनावें लागलें.

कार्यगौरवानुसार पात्रें सजविण्याची हातोटी कवीस किती साधली आहे तें या वर्णनावरून उत्कृष्ट दिसतें.

[७] रामजटायुसंवादः— (म. भा. पा. ५८८)

चौ०— .... .... .... .... । तात कर्म निज तें गति पाई

[ अर्थः-आपल्या कर्मानुसार तूं गति मिळविलीच आहे. ]

दो०—सीताहरन तात जनि कहेहु पिता सन जाइ ।
जौं मैं राम त कुल सहित कहिहि दसानन आइ ॥

[ अर्थः-हे तात! तूं जाऊन सीताहरणाची वार्ता मात्र पित्याला (दशरथाला) सांगूं नकोस. जर मी खराच राम असेन तर रावणाला सकुल मारिल्यावर तो स्वतःच जाऊन त्यांना ती सांगेल. ]

वरील चौपाई आणि दोहा खालील श्लोकाचें रूपांतर आहेः—

तात त्वं निजतेजसैव गमितः स्वर्गं व्रज स्वस्ति ते
ब्रूमस्त्वेकमिमां वधूहृतिकथां तातान्तिके मा कृथाः।
रामोऽहं यदि तद्दिनैः कतिपयैर्व्रीडानमत्कंधरः
सार्धं बंधुजनेन सेन्द्रविजयी वक्ता स्वयं रावणः ॥

[ हनु. ना. अं. ५ श्लो. १६ ]

[८] रामकबंधसंवादः— (म. भा. पा. ५९०)

चौ०—सापत ताडत परुष कहंता । बिप्र पूज्य अस गावहिं संता
पूजिय बिप्र सील-गुन-हीना । सूद्र न गुन-गन-ग्यान-प्रबीना

[ अर्थः-शापणारा, ताडणारा, परुषभाषी असा देखील ब्राम्हण पूज्यच आहे असें संत सांगतात. शीलहीन, गुणहीन असा देखील ब्राम्हण पूज्यच होय. परंतु गुणगणमंडित आणि ज्ञानप्रवीण असा शूद्र पूजार्ह नव्हे. ]

वरील चौपाया भागवतांतल्या खालील श्लोकाचें विपुलीकरण दिसतेंः—

विप्रं कृतागसमपि नैव द्रुह्यत मामकाः ।
घ्नन्तं बहुशपन्तं वा नमस्कुरुत नित्यशः ॥

[ भाग. स्कं. १० अ. ६४ श्लो. ४१ ]

(९) रामनारदसंवादः– [ म. भा. पा. ५९८ ते ६०१ ]

तुलसीदासांनीं या कांडाची समाप्ति रामनारदसंवादानें केली आहे. हा संवाद अध्यात्म किंवा वाल्मीकि यांत नाहीं. तो त्यानीं कोठून घेतला तें निश्चित सांगतां येत नाहीं. तुलसीरामायणांतल्या रामावतारकारणांत दिलेल्या ( म. भा. पा. ११३-१२४पहा) नारदमोहकथेशीं या संवादाचा संबंध आहे हें मात्र निश्चित.

या कांडाचा कथानुक्रम बहुधा अध्यात्मासारखाच आहे, परंतु वर्णनें मात्र भिन्न धर्तीचीं आहेत. अध्यात्मांतलीं स्तवनें अध्यात्मप्रचुर आहेत. तीं तुलसीदासांनीं सोपीं, सरळ आणि भक्तिप्रचुर केलेलीं आहेत. प्रायः लोकशिक्षणाच्या दृष्टीचे हे परिणाम होत असेंच म्हणावें लागतें.

नारदरामसंवादांत **'राम सकल नामन्हतें अधिका'** म्हणजे ईश्वराच्या इतर सर्वच नामांपेक्षां राम हेंच नाम श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. याचा आधार घेऊन तुलसीदासांकडेस एकदेशीयत्वाचा अपवाद लावण्यांत येत असतो. आमच्या मतानें ही भक्तिनिष्ठा होय. एकदेशीयत्व किंवा अंधप्रेम यास म्हणतां येत नाहीं.

रावणाच्या सीताहरणासंबंधानें आमचे विचार पुढें रावणाच्या भूमिकेंत पाहण्यास मिळतील.

## किष्किंधाकांड.

या कांडांतल्या कथा आणि त्यांचा अनुक्रम अध्यात्माशीं बहुतेक जुळते आहेत. यांतलीं ऋतुवर्णनें मात्र भागवताच्या स्कंध १० अध्याय २० चा थोडाबहुत अनुवाद दिसतात. कवीनें **'स्वांतःसुखाच्या'** कल्पना मध्यें मध्यें अशा मार्मिक रीतीनें गुंफिलेल्या आहेत कीं त्या एकंदर वर्णनास सुश्राव्य आणि सुचिंत्य अशा बोधाचें सुंदर स्वरुप आलें आहे.

[१] या कांडांत **'मित्र'** या विषयावर सुश्राव्य आणि सुबोध व्याख्यान आहे तें खालीं देतों:–( म. भा. पा. ६०९ )

चौः–जे न मित्रदुख होहिं दुखारी। तिन्हहिं बिलोकत पातक भारी
निज दुख गिरिसम रज करि जाना। मित्रक दुख रज मेरुसमाना
जिन्ह के असि मति सहज न आई। ते सठ हठि कत करत मिताई

अर्थः—जे मित्राच्या दुःखानें दुःखी होत नाहींत, त्यांच्या दर्शनानें देखील पाप लागेल. आपलें पर्वतप्राय दुःख रजाप्रमाणें समजून मित्राचें रजा एवढें दुःख मेरूप्रमाणें समजण्याची ज्यांच्या बुद्धीची सहज प्रवृत्ति नाहीं असले शठ हट्टानें देखील कसली मैत्री करणार !

चौ.–कुपथ निवारि सुपंथ चलावा। गुन प्रगटइ अवगुनन्हि दुरावा
देत लेत मन संक न धरई। बल अनुमान सदा हित करई
बिपति काल कर सतगुन नेहा। स्रुति कह संत मित्र गुन एहा

अर्थः—वाईट मार्गापासून परावृत्त करून सन्मार्गाला लावणें, अवगुण झांकून गुण प्रकट करणें, देण्याघेण्यांत मनांत शंका न घेणें; यथाशक्ति सदा हितच करणें; आणि संकटकालीं शतपट प्रेम करणें हीं सन्मित्राचीं लक्षणें श्रुति-प्रतिपादित आहेत.

चौ.—आगे कह मृदुवचन बनाई। पाछे अनहित मन कुटिलाई
जा कर चित अहि-गति-सम भाई। अस कुमित्र परिहरेहि भलाई

अर्थ.— तोंडावर मिष्ट आणि मृदु भाषण आणि पश्चात् मात्र मनःपूर्वक कपट आणि अनहित अशा प्रकारचें सर्पप्राय ज्यांचें चित्त असेल त्या कुमित्राचा त्याग करणेंच बरें.

चौ.—सेवक सठ नृप कृपिन कुनारी। कपटी मित्र सूलसम चारी
दुष्ट सेवक, कृपण राजा, दुर्वृत्त स्त्री आणि कपटी मित्र हे चवघेहि शूला सारखे होत.

[२] वालीवधः— [ म. भा. पा. ६१०–६१४ ]

या कांडांतला मुख्य महत्वाचा भाग म्हणजे वालीवध होय. रामावर वालीवधानें कपटाचा शिंतोडा घालण्याचा प्रस्तुत एक सवयीचा विषय

झाला आहे. त्यास आधार म्हणून मूळांतलीं '**विटप ओट**' [ झाडाच्या आड ] आणि '**व्याधकी नाँई**' ( व्याधा प्रमाणें ) हीं पदें दाखविलीं जातात. आतां या बद्दल थोडा विचार करूं.

रामावर कपटाचा आरोप अगदीं प्रथम वालीनेंच केला होता. त्या वेळेस वाली चीत झाला होता, पण त्याचा अहंकार मात्र चीत झाला नव्हता. या गोष्टीस पुरावा '**मोहि जानि अति अभिमानवस**' [ मला अति अभिमानवश समजून ] या वालीच्याच कबूलीचा आहे. त्या अभिमानाच्या झोंकांत '**धर्महेतु अवतरेउ गुसाईं। मारेहु मोहिं व्याधकी नाईं**' [ धर्मासाठीं आपला अवतार, आणि व्याधा प्रमाणें मजला आपण मारावें ] हा वालीनें रामास प्रश्न केला. या प्रश्नांत कांहीं तथ्य आहे, किंवा '**गुणाः पदं न कुर्वंति ततो निंदां प्रवर्तते**' अशांतला हा प्रश्न आहे तें पाहिलें पाहिजे.

पूर्वीं सांगितल्या प्रमाणें '**तरु ओट**' आणि '**व्याधकी नाईं**' या पदांवर आक्षेपाची सर्व भिस्त आहे. हीं दोन्हीहि पदें मूळांत आहेत तें आम्हांस मान्य आहे. पहिल्या पदाचा म्हणजे '**तरु ओट**' याचा '**झाडाच्या आडून**' हा अर्थ देखील आम्हांस कबूल आहे. परंतु नुसतें झाडाच्या आड राहिल्यानें रामाच्या पदरीं कपट पडलें हें मात्र आम्हांस संमत नाहीं.

आतां दुसरें पद '**व्याधकी नाईं**' आहे. त्याचा अर्थ '**व्याधा प्रमाणें**' इतकाच होतो. आक्षेपक पक्ष '**व्याध**' या शद्वाचा अर्थ कपट करितो.

कपटाची व्याख्या साधरणतः अशी आहे. ज्या व्यवहारासंबंधानें ज्या विशेष गोष्टीचें प्रकाशन करणें अत्यवश्यक आणि अपरिहार्य असतें त्या व्यवहारा-संबंधानें त्या विशेष गोष्टीचें स्वार्थापेक्षेनें जेव्हां जाणूनबुजून गोपन केलें जातें तेव्हां ती क्रिया कपट म्हणविते. या व्याख्ये प्रमाणें रामांनीं जर स्वतःस मुद्दाम छपवून वालीवर बाण घातला असेल तर कपटाचा आरोप रामावर वाजवी रीतीनें सिद्ध होईल.

परंतु ग्रंथच स्पष्ट सांगतो कीं वाली रणभूमि धरून प्रत्यक्ष समोर उभा असतानांच रामानीं '**एकरूप तुम्ह भ्राता दोऊ तेहि भ्रमतें**

नहिँ मारेउँ सोऊ' ( भ. भा पा. ६११—तुम्ही दोघेहि बंधु एकरूप असल्यामुळें मी चुकलों. म्हणून मी त्यास ( वालीस ) मारिलें नाहीं. ) असें म्हणून एकदम ( 'कर परसा सुग्रीव सरीरा' ) सुग्रीवाच्या शरीरावरून हात फिरविला, आणि [ मेली कंठ सुमन कै माला। पठवा पुनि बल देइ बिसाला' ] त्याच्या [ सुग्रीवाच्या ] गळ्यांत पुष्पमाला अडकवून, आणि त्यास भरपूर शक्ति देऊन फिरून वालीवर पाठविलें. या वर्णनावरून वालीची दृष्टि स्वतःवर ओढून घेण्याचा रामांनीं मुद्दाम आणि अगदीं ठळक असा प्रयत्न केलेला होता हें पूर्णपणें सिद्ध होतें.

यावर असा एक वाद घेतात कीं रामानें जें कांहीं केलें तें वालीनें पाहिलेंच नसावें. परंतु या म्हणण्यांत मुळींच तथ्य नाहीं. कारण वाली डोळे झांकून उभा होता, अथवा तो झोंपेंत किंवा समाधींत लढत होता असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. शिवाय वालीनें पाहिलें नाहीं असें म्हट-ल्यानें बेपरवाईची चूक वालीवरच लादली जाते हें विसरतां कामां नये.

वास्तविक पाहतां व्याधकर्म निश्चयानें निर्घृणपणाचें असतें, परंतु तें नियमानें कपटाचें असतेंच असें मात्र म्हणतां येणार नाहीं. म्हणून 'व्याध'—शब्द-केवळ निर्घृणत्वाचा द्योतक आहे असेंच म्हणावें लागेल. त्यांत कपटाचा अंत-र्भाव करणें योग्य होणार नाहीं.

वरील विचारांवरून 'व्याध'—शब्दानें रामावर कपटाचा आरोप सिद्ध होतो असें म्हणण्याचें धाडस आमच्यानें करवत नाहीं.

रामाचा दुसरा दोष अंगदास सोडून सुग्रीवास राज्य देण्यावद्दल दाखविला जातो. आमच्या मतानें वालीचें जर नैसर्गिक मरण झालें असतें तर धर्म-शास्त्राचा विचार करणें योग्य होतें. परंतु तो रामाच्या हातानें रणांत मेला. म्हणून जेता या नात्यानें वालीचें राज्य रामाचें झालें. तें राज्य कोणासहि देणें केवळ त्यांच्या मर्जीवर होतें.

## सुंदरकांड.

रामायणांत कांडाचा नामनिर्देश नायकाच्या (रामाच्या) अवस्था, स्थल आणि क्रिया यांवरून केलेला दिसतो. या पद्धतिप्रमाणें या कांडास '**सीताशुद्धि कांड**' असें कांहीं तरी नांव असावयाचें होतें. पहिल्या प्रथमच वाल्मीकीनें त्यास '**सुंदरकांड**' म्हटलें आणि त्याच नांवाचा प्रचार सार्वत्रिक झाला.

वास्तविक पाहतां या नांवानें '**एका म्हणतां भलें । दुजें सहजचि निंदिलें**' असें होतें. असें असून देखील या कांडासच **सुंदरकांड** कां म्हणावें अशी सहजच शंका येते.

असाध्य वस्तु साध्य होण्याची साधनें आकस्मिक योगानें प्राप्त झालीं अशी जेव्हां खात्री होते तेव्हां भावी आनंदाची प्रभा एकदम चित्तावर झळकूं लागते. रावणाच्या कुलक्षयाचें सीताशुद्धि हें मुख्य साधन होय. तें साधन मारुतीच्या द्वारानें रामाच्या हातीं अकस्मात् पडल्यानें त्यांस एकदम आनंदाचा पूर लोटला. ही आनंदाची अवस्था फारच सुंदर असते. त्या अवस्थेचें निदर्शक म्हणून '**सुंदर**' हें नांव या कांडास देण्यांत आलें असल्यास तें योग्यच होय.

दुसरी एक कल्पना अशीहि आहे. वाल्मीकि आणि अध्यात्म यांचें सुंदरकांड सीताशुद्धि, आणि राम व मारुती यांची भेट आणि परस्परांचा प्रेमानंद येथवरच आहे. या राममारुतींच्या समरसतेचा परिणाम सर्वश्रेष्ठ उपासक वाल्मीकि आणि शंकर यानां देखील समरस करण्यांत झाला असला पाहिजे. असें वाटण्यास कारण ती समरसतेची स्थिति तुलसीदासांची देखील झाली होती हें त्यांच्याच खालील उद्गारावरून ध्वनित होतेः— (म. भा. पा. ५५८)

**दो०—सुनि प्रभुवचन बिलोकि मुख गात हर्षि हनुमंत ।**
**चरन परेउ प्रेमाकुल त्राहि त्राहि भगवंत ॥**

**चौ०—बारबार प्रभु चहहिं उठावा । प्रेममगन तेहि उठब न भावा**
**प्रभुकरपंकज कपिकै सीसा । सुमिरि सो दसा मगन गौरीसा**
**सावधान मन कर पुनि संकर । लागे कहन कथा अतिसुंदर**

(अर्थः- प्रभूंचें तें भाषण ऐकल्यावर हर्षानें त्यांच्या देहाकडे आणि आणि मुखाकडे पाहून हनुमंतानें प्रेमाकुलतेनें प्रभुचरणावर 'भगवन् त्राहि त्राहि' म्हणून मस्तक ठेविलें. प्रभु वारंवार त्यास उठवूं पहात, परंतु प्रेमांत मग्न झाल्यामुळें तो उठेना. मारुतीचें मस्तक आणि त्याजवर प्रभूंचा हस्तकमल अश्या त्या देखाव्याच्या कल्पनेनें शंकरांस प्रेमसमाधि लागला. कांहीं वेळानें मन स्थिर करून शंकर पुढील कथानुक्रमास लागले.)

या समरसतेची जाणीव म्हणा किंवा उपलक्षण म्हणा या कांडास पूर्वोक्त कवींनीं सुंदर हें नांव देऊन विशेषप्रेमांकित अशा नाम-निर्देशानें गौरविलें असल्यास तें फारच मार्मिक आणि योग्य होय.

आमचा अभिप्राय हा कीं कांडांच्या काव्यगुणांच्या दृष्टीनें तरतमभाव मनांत घेऊन या कांडाचें सुंदरकांड हें नांव ठेवण्यांत आलेलें नाहीं. तें नांव नायकाच्या (रामाच्या), उपनायकाच्या (मारुतीच्या) किंवा कवींच्या (वाल्मीकि आणि शंकर) यांच्या निर्भर प्रेमाविष्कारावरून दिलें असावें अशी आमची भावना आहे.

(१) लंकावर्णनः- (म. भा. पा. ६३५-६३६)

हें वर्णन फारच अनुष्टुप् आहे. परंतु तें जितकें मजेदार आहे तितकेंच मार्मिकहि आहे. अध्यात्म आणि वाल्मीकि यांत खालील प्रकारचें वर्णन नाहींः-

छं०- .... .... .... .... ....

नर-नाग-सुर-गंधर्व-कन्यारूप मुनिमन मोहहीं ॥
कहुँ मालदेह विसाल सैलसमान अतिवल गर्जहीं
नाना अखारन्ह भिरहिं वहुविधि एक एकन्हि तर्जहीं ॥

(अर्थः- नर, नाग, देव, गंधर्व यांच्या कन्या आपल्या रूपानें मुनिमनास देखील मोहित करीत होत्या. कोठें कोठें अति बलाढ्य पर्वतप्राय देहधारी मल्ल (पैलवान) गर्जत होते व आखाड्यामध्यें परोपरीनें कुस्ती करून एकमेकांस जेरीस आणीत होते.)

तुलसीदासांनीं मल्ल आणि आखाडे लंकेंत दाखविले आहेत. अयोध्या किंवा मिथिला यांत त्यांचा मागमुसहि नाहीं. यावरून वाटतें कीं मल्लपेशा आणि आखाडे यांच्या संबंधानें तुलसीदासांचें मत अनुकूल नव्हतें.

[२] मारुतीलंकिनीसंवादः— (म. भा. पा. ६३७)

दो०–तात स्वर्ग-अपवर्ग-सुख धरिय तुला एक अंग ।
तूल न ताहि सकल मिलि जो सुख लव सत्संग ॥

(अर्थः-हे तात ! तराजूच्या एका पारड्यांत स्वर्ग आणि मोक्ष यांचें सर्व सौख्य घातलें तरी तें दुसऱ्या पारड्यांतल्या सतसंगजन्य क्षणैक सुखाची देखील बरोबरी करणार नाहीं.) हा दोहा खालील भागवतीय श्लोकाचें भाषांतर आहे:-

'तुलयाम लवेनापि न स्वर्गं ना पुनर्भवम् । भगवत्संगिसंगस्य …'

(भाग स्कं. १ अ. १८ श्लोक १३)

[३] हनुमद्विभीषणसंवादः- (म. भा. पा. ६३७-६३९)

मारुती आणि बिभीषण यांची भेट आणि संवाद अध्यात्म आणि वाल्मीकि या दोहोंतहि नाहींत. नाटकें आणि चंपू यांतहि ते आढळले नाहींत. एखाद्या पुराणांत कोठें असल्यास सांगवत नाहीं.

येथें दोन प्रश्न उद्भवतात ते असेः— (१) या भेटीस आणि संवादास आधार काय? आणि (२) त्यांचें प्रयोजन काय? हे प्रश्न आतां याच अनुक्रमानें घेऊं.

(१) वाल्मीकिरामायणांत विभीषण शरणागतीचे वेळीं बिभीषणाच्या स्वीकारास राम आणि लक्ष्मण वगळून इतर सर्व मंडळी प्रतिकूल असतांहि मारुतीनें बिभीषणाच्या तर्फेनें रामासमोर फार कळकळीची शिफारस केली ती अशीः—

राज्यं प्रार्थयमानस्तु बुद्धिपूर्वमिहागतः ।
एतावत्तु पुरस्कृत्य विद्यते तस्य संग्रहः ॥
(वाल्मी. रा. युद्धकां. स. १७ श्लो. ६७)

त्याच्या आधीं लंकादाहप्रसंगीं '**विभीषणगृहं त्यक्त्वा सर्वं भस्मीकृतं पुरम्** (वा. रा. सुं. का. स. ४ श्लो. ४४) असेंहि लिहिलें आहे.

या दोन प्रमाणांवरून सामान्य निदान निघूं शकतें कीं विभीषणाबद्दल मारुतीस बरीच माहिती असली पाहिजे. परंतु लंकेंत मारुतीनें ज्या स्थितींत प्रवेश केला त्या स्थितींत इतर कोणापासून ती माहिती त्यास मिळणें शक्य नसल्या कारणानें त्या दोघांची भेट झाली असलीच पाहिजे असें अनुमान सहजच होतें.

रावणाच्या सभेंत मारुतीच्या प्राणावरचें विघ्न विभीषणाच्या शिफारशीमुळें टळलें म्हणून रामासमोर मारुतीनें विभीषणाची तरफदारी केली असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. परंतु एवढ्यावरूनच मारुतीस विभीषणाचें घर माहित होतें या गोष्टीची उपपत्ति लागणार नाहीं. म्हणून त्या दोघांची भेट प्रथम झाली असावी हेंच संभवनीय आहे.

(२) आतां यांच्या **भेटीचें प्रयोजन काय** तें पाहूं.

मारुतीच्या मुखांतल्या वरील श्लोकांतून विभीषण राज्यकांक्षी होता हें दिसलेंच आहे. रामानेंहि त्यास तसेंच म्हटलें आहे.

**न वयं तत्कुलीनाश्च राज्यकांक्षी च राक्षसः।**
**पंडिता हि भविष्यंति तस्माद्ग्राह्यो बिभीषणः॥**

[ वाल्मी. रा. यु. कां. स. १८ श्लो. १३ ]

तुलसीदासांनींहि त्याची तीच कबूली अशी घेतली आहे- '**उरकछु प्रथम बासना रही**' [प्रथम मनांत कांहीं एक इच्छा होती], आणि तीच इच्छा रामानीं राज्याभिषेक रूपानें सांगून सवरून तत्काळ पुरविली. एवंच विभीषण लंकेच्या राज्याची इच्छा करणारा होता हें स्पष्ट झालें.

शिवाय तो राजनीतिनिपुण होता हें खालील आधारांवरून स्पष्ट होतें:—
'**कही बिभीषण नीति बखानी**' [विभीषणानें राजनीति स्पष्ट करून सांगितली-म. भा. पा. ६६५

बिभीषण म्ह०:- '**जद्यपि तदपि नीति अस गाई**' [तरी देखील राजनीति असें म्हणते-म. भा. पा. ६७२]

अध्यात्मकार आणि वाल्मीकि यांनीं विभीषणासारख्या शहाण्या, राजकारणी पण लोभी पुरुषास त्याच्या ध्यानींमनीं नसतांहि अगदीं अकल्पित रीतीनें त्याच्या भावाच्या प्रत्यक्ष शत्रूच्या पायांवर नेऊन लोळविणें दुरापास्त नव्हे काय? काहीं ना काहीं सारादोरा दाखविल्या खेरीज अशा गोष्टी अगदीं वरवर दृष्टीस देखील असंभवनीय दिसतात.

तुलसीदासांना हा अस्वाभाविक प्रकार खपला नाहीं. म्हणून हनुमद्विभीषणसंवादाचा एक दुवा त्यांनीं युक्तिबुद्धिपुरःसर जोडला. त्यामुळें कथानकांतला विस्कळितपणा पार नाहींसा झाला. आमच्या मतानें या भेटीचें प्रयोजन हेंच असावें. शिवाय आमच्या दृष्टीनें हा संवाद विभीषणशरणागतीची प्रस्तावनाच होय. विभीषणशरणागती या प्रस्तावनेमुळेंच या रामायणांत विशेष रमणीय झाली आहे.

वरील कारणास्तव मारुतीविभीषणसंवाद तुलसीदासांच्या अनुपम कल्पनाचातुर्याचा निदर्शक असा एक अमोलिक भाग आहे असेंच कोणासहि म्हणणें भाग आहे.

**[४] नाटकानुवादः—** [म. भा. पा. ६४१]

**प्रसन्नराघवन** अं. ६ श्लो. ३०

**रघुपतिभुजदंडादुत्पलश्यामकांतेर्दशमुख भवदीयान्निष्कृपाद्वा कृपाणात्।**

याचें खालील दोन चौपाया भाषांतरच दिसतेः—

**चौ०-स्याम सरोज-दाम-सम सुंदर। प्रभुभुज करि-कर-सम दसकंधर**
**सो भुज कंठ कि तव असि घोरा। सुनु सठ अस प्रमान पन मोरा**

[अर्थः-[सीता म्हणाली] दुष्टा दशकंधरा! एक तर नीलकमलनालाप्रमाणें सुंदर आणि गजशुंडेप्रमाणें असलेला प्रभूंचा भुज माझ्या कंठावर बसेल,

किंवा तुझें तीक्ष्ण खड्ग तरी बसेल असा माझा पण आहे हें पक्कें लक्षांत ठेव.

**चौ०- चंद्रहास हर मम परितापं । रघुपति-विरह-अनल-संजातं**

**'चंद्रहास हर मे परितापं रामचंद्रविरहानलजातं'**

[ प्र. रा. ना. अं. ६ श्लो. ३३ ]

**[५] सीतेची अग्नियाचनाः—** [ म. भा. पा. ६४२ ]

त्रिजटा आणि सीता यांच्या संवादांत सीतेनें स्वतःस जाळून घेण्यासाठीं त्रिजटेपाशीं अग्नियाचना केली आहे. हें वर्णन अध्यात्मांत आणि वाल्मीकींत नाहीं. तें प्र. रा. ना. अं. ६ मधलें आहे. परंतु तुलसीदासांनीं तें जास्त मार्मिक करून आपलें कविकलानैपुण्य दर्शविलें आहे.

**[६] मारुतीद्वारा सीतेस रामाचा निरोपः—** [ म. भा. पा. ६४५ ]

**चौ०-कहेउ राम वियोग तव सीता । मोकहँ सकल भये विपरीता**
**नवतरुकिसलय मनहुँ कृसानू । कालनिसासम निसि ससि भानू**
**कुवलयविपिन कुंतवन सरिसा । बारिद तपततेल जनु बरिसा**
**जेहि तरु रहे करत तेइ पीरा । उरगस्वाससम त्रिविध समीरा**
**कहेहु ते कछु दुख घटि होई । काहि कहउँ यह जान न कोई**

( अर्थः-( मारुती म्हणतो ) राम म्हणाले, हे सीते ! तुझ्या वियोगामुळें मला सर्वच विपरीत भासत आहे. नूतनतरुपल्लव मला अग्नीप्रमाणें वाटत असून रात्र ही कालरात्रीप्रमाणें वाटते. चंद्र सूर्यासारखा वाटून कमलवन भाल्यांच्या समूहाप्रमाणें वाटतें. मेघ जणुंकाय तप्ततैलाचा वर्षावच करितात. ज्या वृक्षाखालीं वास करावा तो पीडा देत असून त्रिविध वायु सर्पाच्या फूत्कारा प्रमाणें वाटतो. स्वतःचें दुःख दुसऱ्यास सांगण्यानें किंचित् कमी होतें; परंतु तें कोणास सांगावें हेंच मला कळत नाहीं.

वरील वर्णन खालील प्र. रा. ना. अं. ६ श्लो. ४३ व ४४ चें जवळ जवळ भाषांतरच आहेः—

हिमांशुश्चंडांशुर्नवजलधरो दावदहनः । सरिद्वीचीवातः कुपित-
फणिनिश्वासपवनः ॥
नवा मल्ली भल्ली कुवलयवनं कुंत-गहनं । ममत्वद्विश्लेषात्सुमुखि
विपरीतं जगदिदम् ॥

कस्याख्याय व्यतिकरमिमं मुक्तदुःखो भवेयं ।
को जानीते निभृतमुभयो--रावयोः स्नेहसारम् ॥

परंतु

जानात्येकं शशधरमुखि प्रेमतत्वं मनो मे ।
त्वामेवैतच्चिरमनुगतं तत्प्रिये किं करोमि ॥

यांतल्या भावापेक्षांहि किती तरी गंभीरभाव तुलसीदासांचा झालेला आहे तें खालील वर्णनांतल्या चौथ्या भागावरून सहज दिसेल:--

चौ०--तत्व प्रेमकर मम अरु तोरा । जानत प्रिया एक मन मोरा
सो मन सदा रहत तोहि पाहीं । जानु प्रीतिरस एतनहि माहीं

( अर्थः- प्रिये ! तुझ्या आणि माझ्या प्रेमाचें तत्व केवळ एक माझेंच मन जाणतें, आणि तें मन नित्य तुझ्यापाशींच रहात असतें. आतां एवढ्यांतच या प्रीतिरसाची ओळख पटवून घे. )

[७] राम-मारुती-संवादः— [म. भा. पा. ६५६-६५९ ]

रामाचा प्रश्नः-

चौ०- कहहु तात केहि भाँति जानकी । रहति करति रक्षा स्वप्रानकी

( अर्थः- बा, मारुते ! जानकी कोणत्या रीतीनें राहून आपल्या प्राणांचें रक्षण करिते तें सांग. )

मारुतचिं उत्तरः-- (म. भा. पा. ६५७)

दो०--नाम पाहरू दिवस निसि ध्यान तुम्हार कपाट ।
लोचन निजपदजंत्रित जाहिँ प्रान केहि बाट ॥

( अर्थः-आपल्या नामाचा सीतेच्या मुखांत रात्रंदिवस पहारा असून आपल्या ध्यानामुळें तिच्या हृदयाचें द्वार देखील बंद झालें आहे. तिचे नेत्रहि आपल्याच चरणीं जडले आहेत. आतां तिचे प्राण कोणत्या वाटेनें जाऊं शकणार ?

हें वर्णन कवीचें स्वयंकल्पित दिसतें. यांतलें ध्यानाभ्यासाचें मर्म वाचक पाहतीलच.

हा संवाद खरोखरच अमोलिक आहे. परंतु तो फारच मोठा असल्यामुळें त्याजवर व्याख्यान करण्याची सोय नाहीं असें फार दिलगिरीनें म्हणावें लागतें यास आमचा नाइलाज आहे. मात्र हा संवाद फारच लक्षपूर्वक वाचावा अशी वाचकांस आमची आग्रहाची विनंती आहे.

येथें फक्त आम्ही ऐवढेंच सांगून ठेवितों कीं हा संवाद अध्यात्मांत आणि वाल्मीकांत नाहीं. तो स्वयंकल्पित आहे. तुलसीदासांचा तो केवळ भक्त-युद्रेक आहे. किंबहुना तुलसीदासच त्यांत आहेत असेंहि म्हणतां येईल. यास कारण या संवादाचें त्यानीं सांगितलेलें खालील माहात्म्य होयः--

यह संवाद जासु उर आवा। रघुपतिचरन-भगति सोइ पावा

( अर्थः-हा संवाद ज्याच्या हृदयांत प्रगट झाला त्यास रामपदाची भक्ति निःसंशय प्राप्त झाली. )

(८) रामदलप्रस्थितिवर्णनः— (म. भा. पा. ६६१)

छं०-सहि सक न भार अपार अहिपति बारबारहिँ मोहई।
गहि दसन पुनि पुनि कमठपृष्ठ कठोर सो किमि सोहई॥
रघुबीर-रुचिर-पयान-प्रस्थिति जानि परम सुहावनी।
जनु कमठखर्पर सर्पराज सो लिखत अविचल पावनी।

[ अर्थः-शेष एवढा उदार (सहिष्णु), परंतु त्याला देखील कपि सैन्याचा भार सहन होईना. त्याला वारंवार मुर्छा येऊं लागली. म्हणून ( मस्तकावरील पृथ्वी निश्चल राखण्यासाठीं ) तो वारंवार कच्छपाचा कठोर पृष्ठभाग आपल्या तीक्ष्ण दांतांनीं धरूं पाही. जणुंकाय तो रघुवीराच्या शुभप्रयाणाच्या मार्गाची रूपरेषा (-नक्काशा) अत्यंत सुंदर जाणून कच्छपाच्या निश्चल आणि पवित्र पृष्ठभागावर लिहूनच ठेवीत आहे असें दिसलें. )

वरील कल्पना हनु. ना. अं. ७ श्लो. ३ मधली आहे:—

नृपतिमुकुटरत्न त्वत्प्रयाणप्रशस्ति प्लवगवलनिमज्जद्भूभराक्रान्त-देहः।
लिखति दशनटङ्कैरुत्पतद्भिः पतद्भि-र्जरठ--कमठ-भर्तुः खर्परे सर्पराजः॥

[९] सत्छलफलवर्णनः— [म. भा. पा. ६६६]

रावणाचा लत्ताप्रहार झाल्यावर बिभीषण म्हणाला:--

दो०--राम सत्यसंकल्प प्रभु सभा कालवस तोरि।
मैं रघुवीरसरन अब जाऊँ देहु जनि खोरि॥

अर्थः-रावणा! तुझा दरबार कालवश झाला आहे. मी आतां सत्यसंकल्प रघुवीरास शरण जातो. इतःपर मला दोष देऊं नकोस.

चौ०-अस कहि चला विभीषन जबहीँ। आयुहीन भे निसिचर तबहीँ
साधुअवज्ञा तुरत भवानी। कर कल्यान अखिल कै हानी
रावन जबहिँ बिभीषन त्यागा। भयउ विभव बिनु तबहिँ अभागा

अर्थः-इतकें म्हणून जेव्हां विभीषण निघाला तेव्हां तत्क्षणींच राक्षस आयुष्यहीन झाले. पार्वती! सतांची अवज्ञा अखिल कल्याणांचा ऱ्हास तत्काल करिते. विभीषणानें रावणाचा त्याग केला तेव्हांच त्याचा दैवदुर्विपाक होऊन तो वैभवशून्य झाला.

हीच सत्छलफलकल्पना तुलसीदासांनीं आपल्या खालील कवित्तांत निराळ्याच रीतीनें परंतु फारच मार्मिकपणानें ठेविली आहे:--

बेदविरुद्ध महामुनि सिद्ध ससोक च।ाचर लोक उजाऱ्यो।
और कहा कहुँ सीय हरी तबहुँ करूनानिधि कोप निवाऱ्यो
सेवक छोभते छाँडि छमा तुलसि लख्यो राम सुभाउ तुम्हाऱ्यो
तौलैँ न दाबिदल्यौँ दसकंधर जौलैँ बिभीषन लात न माऱ्यो

**अर्थः**- रावणाच्या वेदविरुद्ध वर्तनानें थोर थोर मुनि आणि सिद्ध सशोक (व्यथित) झाले आणि चराचर सृष्टि उध्वस्त झाली. विशेष काय सांगूं! त्यानें सीता चोरून नेली तरी देखील तूं करुणानिधीच राहिलास आणि स्वतःस क्रोधावेश होऊं दिला नाहींस. रामा! या तुळसीनें (तुलसीदासानें) तुझा स्वभाव खरा ओळखला तो हा कीं तुझ्या सेवकास दुष्टांकडून जेव्हां उपसर्ग पोंचतात तेव्हांच तुझी क्षमा विरघळून जाते. [उदाहरण] रावणानें बिभीषणास लत्ताप्रहार केला नव्हता तोंवरच तूं रावणाची मुस्कुटें दावून त्याचा चक्काचूर उडविला नाहींस.

(१०) **भागवतपदव्याख्याः**— [म. भा. पा. ६७१]

भाग. स्कं. ११ अ. २ श्लो. ५५ हा असा आहेः—

**'प्रणयरशनया धृतांघ्रिपद्मः स भवति भागवतप्रधान उक्तः'**
तुलसीदासांनीं याचें राममुखानें खालील व्याख्यान करविलें आहेः—

**चौ०-जननी जनक बंधु सुत दारा। तनु धन भवन सुहृद परिवारा**
**सब के ममता-ताग बटोरी। मम पद मनहि बाँध बरि डोरी**
**समदरसी इच्छा कछु नाहीँ। हरस सोक भय नहिँ मन माहीँ**
**अस सज्जन मम उर बस कैसे। लोभीहृदय बसइ धन जैसे**

**अर्थः**- आई, बाप, भाऊ, पुत्र, कलत्र, देह, गेह, सुहृद, वित्त, परिवार इत्यादि सर्वांविषयीं असलेल्या ममतारूप तागाची मजबूत दोरी वळून व तिनें स्वतःचें मन माझ्या चरणांशीं बांधून समदृष्टि, निष्काम, अशोक, निर्भय, आणि निर्हर्ष होऊन राहणारा जो सज्जन तो कृपणाच्या मनांत जसें धन वास करितें तद्वत् माझ्या मनांत त्याचा वास असतो.

(११) **काव्यकौशल्यः**-- (म. भा. पा. ६७२)

**'या विभूतिर्दशग्रीवे शिरच्छेदेन शंकरात्।**
**दर्शनाद्रामभद्रस्य सा विभूतिर्बिभीषणे॥'**

या श्लोकास भाषांतर तुलसीदासांनीं असें केलें आहेः—

दो०-जो संपति सिव रावनहिँ दीन्हि दिये दससमाथ।
सो संपदा बिभीषनहिँ सकुचि दीन्हि रघुनाथ॥

अर्थः-दहा मस्तकें देऊन जी संपत्ति रावणानें शंकरापासून मिळविली होती, तीच संपत्ति रामानें बिभीषणास फार संकोचानें अर्पण केली.

एका 'सकुचि' शब्दानें तुलसीदासांचें काव्यकलानैपुण्य किती स्पष्ट होतें तें पहावें. हिंसेनें मिळविलेली म्हणून रक्तानें माखलेली अशी अपवित्र संपत्ति भक्त बिभीषणास द्यावयाची म्हणजे शुद्धास अशुद्धाचीच जोड करून देणें होईल. ऱ्या विचारानें, किंवा बिभीषणाच्या सहायानें जर सीतेचा लाभ होणार तर लाभाच्या तुलनेस ही लंकेची संपत्ति ती किती या विचारानें राम 'सकुचि' म्हणजे ओशाळले. रामाचें वात्सल्य आणि औदार्य एका 'सकुचि' शब्दानें किती ध्वनित झालें तें कोणासहि दिसूं शकतें. कवित्व ईश्वरदत्त म्हणतात तेंच खरें.

मिश्रबंधु आपल्या नवरत्नांत या दोह्यावरून तुलसीदासांवर बरेंच घसरले आहेत. या दोह्यांत त्यांना तुलसीदासांचा अघळपघळ पक्षपात दिसतो. ते म्हणतात कीं तुलसीदास शंकरांची निंदा करून किंवा त्यांजबद्दल तुच्छता दर्शवून देखील रामाची स्तुति किंवा श्लाघा करण्यास कचरत नाहींत.

घोडा मैदान समोरच आहेत. सहृदय वाचक निकाल दिल्या खेरीज थोडेच राहणार ?

तुलसीदासांनीं या कांडास दिलेला व्यास विशेष मननीय आहे. वाल्मीकि आणि अध्यात्म यांनीं सीताशुद्धिपर्यंतच सुंदरकांडाचा कथाक्रम आंखला आहे. तुलसीदासांनीं तो सागरनिग्रहान्त नेला आहे. सैन्यसागराक्रमण, बिभीषणशरणागति, बिभीषणराज्याभिषेक आणि सागरनिग्रह हीं कथानकें त्यांना सीताशुद्धि इतकीच रसप्रसविणारीं वाटलीं असतील म्हणून, किंवा त्यांचें लंकाकांड इतरांच्या युद्धकांडाप्रमाणें फार विस्तृत न व्हावें म्हणून त्यांनीं या सुंदरकांडाच्या विस्ताराची ही योजना केली असल्यास त्यांत देखील त्यांचें विचारस्वातंत्र्यच दिसून येतें.

असो. पण इतकें मात्र खास कीं या सुंदरकांडाचे दोन भाग पडतात, पूर्वार्ध सीताशुद्धि पर्यंतचा, आणि उत्तरार्ध सागर निग्रहापर्यंतचा. सुंदरकांडाचें अनुष्ठान करणारांनीं हा विभागविचार सोईस्कर झाल्यास पहावें.

## लंकाकांड.

वाल्मीकि आणि अध्यात्म यांनीं या कांडास युद्धकांड ह्मटलें आहे. त्यांचें तें नांव रास्त आहे. कारण युद्धाच्या तयारीपासून ह्मणजे किष्किंधेंतून रामाचा तळ हालण्यापासून त्यांच्या युद्धकांडाचा प्रारंभ होतो.

परंतु तुलसीदासांस युद्धकांडास युद्धकांड म्हणण्याची अडचण पडली, कारण युद्धाच्या प्रास्तविक कथा त्यांनीं सुंदरकांडांत ओढल्या असल्यामुळें लंकाक्रमणापासूनच त्यांचा कथाक्रम चालू होणार. इकडेस लक्ष पाहोंचून त्यांनीं या कांडास अगदीं समर्पक असें लंकाकांड नांव दिलें. समर्पक म्हणण्याचें विशेष हें हि कारण आहे कीं लंकेपुरत्याच कथा देऊन त्यानीं हें कांड समाप्त केलें आहे.

ह्मणून या कांडाचें लंकाकांड हें नांव फारच मार्मिक आहे.

(१) मारुतीचे शौर्योद्गारः— ( म. भा. पा. ६८३ )

सो०-सुनहु भानुकुलकेतु जामवंत कर जोरि कह ।
नाथ नाम तव सेतु नर चढि भवसागर तरहि ॥

चौ०-यह लघु जलधि तरत कति वारा । अस सुनि पुनि कह पवनकुमारा
प्रभुप्रताप वडवानल भारी । सोखेउ प्रथम पयोनिधि-बारी
तव रिपुनारि-रुदन-जल-धारा । भरेउ वहोरि भयउ तेहि खारा

अर्थः--जांववंत हात जोडून ह्मणाला--हे भानुकुलावतंस स्वामिन् ! ऐका. आपलें नांवच सेतूप्रमाणें आहे. त्या सेतूवर चढून नर भवसागर ओलांडून जातात. मग ह्या एवढासा समुद्र तरून जाण्यास कितीसा वेळ लागणार ? तें ऐकून मारुती ह्मणाला---प्रभुप्रतापरूप प्रखर वडवानलानें आधींच समुद्राच्या जलाचा शोष झाला होता. परंतु आपल्या शत्रूपत्नींच्या दुःखाश्रुधारांनीं तो फिरून भरला, आणि त्यामुळेंच तो खारट झाला आहे.

असलीं शौर्योद्दीपक भाषणें युद्धपुरोगामी ठेवणें ही कवीची महत्प्रशंसनीय कल्पकता समजली पाहिजे.

(२) सेतुबंधरामेश्वरवर्णनः— [ म. भा. पा. ६८४–६८५ ]

विस्तारामुळें तें येथें साग्र देतां येत नाहीं. तें वाल्मीकांत नाहीं. अध्यात्मावरून तें घेतलेलें दिसतें. परंतु तुलसीदासांनीं ' मद्भक्तः शंकरद्वेष्टा मद्द्वेष्टा शंकरप्रियः । तौ नरौ नरकं यातौ यावच्चंद्रदिवाकरौ ' या पौराणिक श्लोकाच्या हुबेहुब भाषांतराच्या चौपाया अध्यात्मापेक्षां जास्त जोडून परस्पर द्वेष वाढविणाऱ्या शैववैष्णवांची चांगलीच कानउघाडणी केली आहे. नमुना म्हणून खालचा दोहा दिलेला आहे.:—

दो०–संकरप्रिय मम द्रोही सिवद्रोही मम दास ।
ते नर करहिं कलप भरि घोर नरकमहँ वास ॥

अर्थः-जे शंकरप्रिय म्हणवून माझा द्वेष करतात किंवा मत्प्रिय म्हणवून शिवद्रोह करतात ते कल्पपर्यंत घोर नरकामध्यें पचत राहतात.

(३) सेतुबंधनः— [ म. भा. पा. ६८५ ]

चौ०–बूडहिं आनहिं बोरहिं जेई । भये उपल बोहित सम तेई
महिमा यह न जलधि कै बरनी । पाहन गुन न कपिन्ह कै करनी

दो०–श्री रघुबीर प्रताप तें सिंधु तरे पाषाण ।

[ अर्थः-जे स्वतः बुडतात आणि दुसऱ्यासहि बुडवितात ते पाषाण प्रत्यक्ष नावेप्रमाणें झाले. हा समुद्राचा महिमा नव्हे, पाषाणाचा गुण नव्हे, किंवा कपींनाहि पराक्रम नव्हे. पाषाण समुद्रावर तरंगूं लागले हा केवळ श्रीरघुवीरांचाच प्रताप होय.

वरील वर्णन खालील श्लोकाचें भाषांतर आहे:—

ये मज्जन्ति निमज्जयन्तिच परांस्ते प्रस्तरा दुस्तरे । वार्धौ वीर तरंति वानरभटान्संतारयंतेऽपिच ॥
नैते ग्रावगुणा न वारिधिगुणा नो वानराणां गुणाः । श्रीमद्दाशरथेः प्रतापमहिमारंभः समुज्जृंभते ॥

( हनु. ना. अ. ७ श्लो. १९ )

[४] रावणभीत्युद्रेकः— [म. भा. पा. ६८७]

दो०—बांधे वननिधि नीरनिधि जलधि सिंधु बारीस
सत्य तोयनिधि कंपती उदधि पयोधि नदीस ॥

प्रत्येक तोंडानें एक अशीं दहा तोंडांनीं समुद्राचीं निरनिराळीं दहा नावें रावणानें न कळत उच्चारिलीं. सेतुबंधन ऐकून भीतीमुळें रावणाची अत्यंत गाळण उडाली हें कवीनें अशा रीतीनें दाखविलें आहे. स्वभावोक्तीचा हा एक अप्रतिम नमुना आहे.

[५] सुवेलपर्वतावरील रामाचें शब्दचित्रः— [म. भा. पा. ६९१]

चौ०—सैलसृंग एक सुंदर देखी । अतिउतंग सम सुभ्र बिसेखी
तहँ तरु-किसलय-सुमन सुहाये । लछिमन रचि निज हाथ डसाये
ता पर रुचिर मृदुल मृगछाला । तेहि आसन आसीन कृपाला
प्रभुकृत सीस कपीसउछंगा । वामदहिन दिसि चाप निषंगा
दुहुँ करकमल सुधारत बाना । कह लंकेस मंत्र लगि काना
बड भागी अंगद हनुमाना । चरनकमल चाँपत बिधि नाना
प्रभुपाछे लछिमन बीरासन । कटि निषंग कर बान सरासन

दो०—एहि बिधि करुनासील-गुन-धाम राम आसीन ।
ते नर धन्य जे ध्यान एहि रहत सदा लयलीन ॥

[ अर्थः-अति उंच, सपाट, परम उज्ज्वल आणि सुंदर असें एक शिखर (सुवेलपर्वताचें) पाहून त्यावर लक्ष्मणानें स्वहस्तानें सुंदर पत्रपुष्पांची शेज तयार केली, आणि वर सुंदर व मृदु असें मृगचर्म आंथरलें. त्या आसनावर दयाघन राम बसले. त्यांनीं सुग्रीवाच्या मांडीवर मस्तक टेकलें होतें आणि त्यांच्या डाव्या बाजूला धनुष्य व उजव्या बाजूला भाता असून आपल्या दोन्ही करकमलांनीं ते बाण सांवरीत होते. बिभीषण त्यांच्या कानाशीं लागून कांहीं सल्ला करीत होता. महाभाग्यशाली अंगद आणि मारुती प्रभूंचीं चरणकमलें अनेक प्रकारें चुरीत होते. कमरेला भाते कसून आणि हातांत धनुष्यबाण घेऊन लक्ष्मण प्रभूंच्या पाठीमागें

वीरासन घालून वसला होता. ह्याप्रमाणें करुणासागर, शीलनिधान, गुणधाम प्रभु रामचंद्र वसले होते. जे नर ह्या ध्यानांत तल्लीन असतात ते धन्य होत.]

शब्दचित्र उठविण्याची कवीची धाटी किती प्रसंगोचित, मोहक आणि मार्मिक आहे हें दाखविण्यासाठीं वरील वर्णन दिलें आहे.

[६] रामसैनिकविनोदः— [म. भा. पां. ६९२]

चौ०–कह सुग्रीव सुनहु रघुराई। ससि महँ प्रगट भूमिकी झाँई
मारेउ राहु ससिहि कह कोई। उर महँ परी स्यामता सोई
कोउ कह जब विधि रतिमुख कीन्हा। सारभाग ससिकर हरि लीन्हा
छिद्र सो प्रगट इंदु उर माहीं। तेहि मग देखिय नभ परिछाहीं
प्रभु कह गरल बंधु ससि केरा। अतिप्रिय निजउर दीन्ह वसेरा
विष संयुत करनिकर पसारी। जारत विरहवंत नरनारी

अर्थः-सुग्रीव म्हणाला 'देवाधिदेवा? ऐका. ती चंद्रावर पडलेली भूमीची प्रत्यक्ष छाया होय.' कोणी म्हणाले 'राहूनें शशीला ग्रासल्यामुळें त्याच्या हृदयावर जो घाव झाला त्याचीच ही शामता आहे.' कोणी म्हणाले 'जेव्हां ब्रम्हदेवानें रतीचें मुख घडविलें तेव्हां चंद्रांतून त्याचा सार-भाग काढून घेतला, त्यामुळें त्याच्या हृदयांत हें छिद्र पडलें आहे; आणि तेंच (छिद्र) आकाशाची सावली पाहण्यास द्वार [दुर्बीण] बनलें आहे.' प्रभु रामचंद्र म्हणाले, 'हालाहल विष चंद्राचा सहोदर आहे. तो त्याचा अत्यंत प्रिय असल्यामुळें त्यानें त्यास वक्षस्थळावर जागा दिली. म्हणूनच चंद्रकिरण विषाक्त होऊन ते विरही स्त्रीपुरुषांना जाळीत असतात.'

दो०–कह मारुतसुत सुनहु प्रभु ससि तुम्हार निजदास।
तव मूरति बिधुउर बसति सोइ स्यामताअभास॥

अर्थः-त्यावर मारुती म्हणाला 'प्रभो! ऐका. चंद्र आपला भक्त असल्या कारणानें आपली श्यामल मूर्ति त्याच्या हृदयांत वास करीत आहे. तीच आपली श्यामता चंद्राच्या ठिकाणीं आभासलेली वाटते.'

वरील चंद्रकलंकविषयक उत्प्रेक्षा अध्यात्म, वाल्मीकि किंवा प्रसन्नराघवादि नाटकांत मिळत नाहींत. त्या अनुच्छिष्ट असल्यास तुलसीदासांवर '**कविमंडण**' '**कविकलावतंस**' '**कविकेसरी**' इ. इ. पदव्यांचा वर्षाव आजदेखील झाल्याखेरीज राहणार नाहीं.

[७] रावणाभिनिवेशः--- [म. भा. पा. ६९४]

**चौ०--सिरउ गिरे संतत सुभ जाही। मुकुट खसे कस असगुन ताही**

अर्थः- शिरांचा पात देखील ज्यास सतत शुभावह होतो त्यास मुकुटांचें पडणें अशुभ कसें ?

या चौंपाईत लाथा खाऊन देखील पाठीचा मळ झडला असें म्हणणाऱ्या पक्क्या बेरडाची अंगवण तुलसीदासांनीं फारच खुबीनें रावणांत हुबेहुब दाखविली आहे.

[८] मंदोदरीचा उपदेशः- [म. भा. पा. ६९४ ते ६९६]

यांत विराटस्वरूपवर्णन आहे. तो अध्यात्मांत किंवा वाल्मीकींत नाहीं. तो भाग. स्कं. २ अ. १ प्रमाणें आहे.

रावणावर या उपदेशाचा तिळप्रमाण देखील परिणाम झाला नाहीं. ही गोष्ट खालील सोरठ्यांतल्या स्वभावोक्तीनें किती मार्मिकपणानें दाखविली गेली तें पाहण्यासारखें आहे.

**सों०--फूलइ फरइ न बेत जदपि सुधा बरषहिं जलद।**
**मूरख हृदय न चेत जौं गुरु मिलहिं बिरंचिसिव॥**

(अर्थः-मेघांतून प्रत्यक्ष अमृतवृष्टि जरी झाली तरी वेताच्या वेलीस फुलें किंवा फळें यावयाचीं नाहींत. तसेंच प्रत्यक्ष ब्रम्हदेव किंवा शंकर देखील जरी गुरु मिळाले तरी मूर्खाच्या चित्तास चैतन्य यावयाचें नाहीं.)

(९) अंगदशिष्टाई:— [म. भा. पा. ६९८ ते ७१४]

अध्यात्मांत ही शिष्टाई नाहीं. वाल्मीकींत ती फारच संक्षिप्त आहे. या प्रसंगांत हनुमन्नाटकांतल्या कल्पना कवीनें भिन्नरूपानें घेतलेल्या दिसतात, परंतु

प्रसंग उठावदार होण्यास त्यांचा विशेष उपयोग झालेला दिसत नाहीं. अंगदाच्या मार्मिक वक्रोक्ति आणि रावणाच्या भडभडीत गर्वोक्तिं यांचा या प्रसंगांत अगदीं रेलचेल झालेली आहे. अंगद पक्का मुत्सद्दी (किंवा चांई) आणि रावण अगदींच बेमुत्सद्दी (किंवा आडदांड) अशी ही जोडी फारच मजेदार आंखली गेली आहे. अंगदाच्या भूमिकेंत ओज, आत्मविश्वास, स्वामिभक्ति, रामप्रेम इत्यादि गुण उत्तरोत्तर कसे वाढत गेले तें पाहण्यासारखें आहे. अंगदाचा पाय रावणसभेंत कोणीहि उचलल्यास त्याचा सीता सोडून देण्याचा पण हा वरील सर्व गुणांचा अपरिमित उत्कर्षच समजला पाहिजे.

परंतु हा उत्कर्ष म्हणजे विपर्यासाच होय हें तुलसीदासांच्या मनांत येऊन त्यांनीं प्रसंग एकदमच फार शिताफीनें आटोपता घेतला. हा आटोपता घेण्याचा प्रकार इतका खुबीदार झाला आहे कीं कवींच्या कल्पकतेची, समय-सूचकतेची आणि विनोदी स्वभावाची एकदम ओळख पटल्यावांचून रहात नाहीं.

या शिष्टाईचा गर्भितार्थ आमच्या दृष्टीनें हा दिसतो कीं रामकृपेंतलें एक चिमुकलें भाकडाचें पिलूं देखील रावणा सारख्याची अक्कल आणि शक्ति गुंग करण्यास पूर्ण समर्थ असूं शकतें. म्हणजे पूर्वी सुंदरकांडांत रामास उद्देशून मारुती खालील प्रमाणें बोलला आहे त्याचा अंगदशिष्टाई हा निव्वळ आदर्शच दिसतोः--

**दो०:- ता कहँ प्रभु कछु इ. इ.**

(म. भा. पा. ६५९)

(**अर्थः**- प्रभो ! आपण ज्यास अनुकूल असाल त्याला दुष्कर असें कांहींच नाहीं. आपल्या प्रतापानें यत्किंचित् कापूस देखील वडवाग्नीला जाळून टाकील.)

### [१०] मंदोदरीचा रावणास उपदेशः— [म भा. पा. ७१४-७१६]

लक्ष्मणानें ओढलेली रेघ रावणास ओलांडतां आली नाहीं, जनकसभेंत धनुष्य उचलतां आलें नाहीं इ. इ. मार्मिक गोष्टी मंदोदरीनें आपल्या या उपदेशांत उच्चारिल्या आहेत या वरून असें दिसतें कीं तिजवर त्याचा अत्यंत विश्वास आणि प्रेम असून त्यास तिजबद्दल फार आदरहि होता. तसें नसतें तर इतक्या अपमानाच्या गोष्टी तिला त्याजकडून कधींहि कळल्या नसत्या.

मंदोदरीचें रावणास एकंदर चार उपदेश आहेत त्यांपैकीं हा शेवटचा उपदेश होय. या उपदेशाची भाषा कमालीची सणसणीत झाली आहे, परंतु रावणाकडून मंदोदरीचा एका शब्दानें देखील अपमान झाला नाहीं. पतिव्रता स्त्रींची ओजस्विता कशी असते तें येथें तुलसीदासांनीं उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे.

## [११] इंद्राजितशक्तिप्रहारानें लक्ष्मणमूर्छा:— (म. भा. पा. ७३०-७३६)

अध्यात्म, वाल्मीकि आणि हनुमन्नाटक (अंक. १३) इतक्यांच्या सहायानें हा प्रसंग तुलसीदासांनीं रंगविलेला दिसतो.

आध्यात्म आणि वाल्मीकि रावणाच्या शक्तीनें लक्ष्मणास ही मूर्छा आली असें म्हणतात. कालनेमीची कथा फक्त अध्यात्मांतच आहे. मारुतीची भरतभेट दोहोंतहि नाहीं. ती हनुमन्नाटकांतली दिसते. बाकीचा भाग कवीचाच आहे.

या प्रसंगांतला रामाचा लक्ष्मणाबद्दलचाशोक फारच हृदयद्रावक आहे. शौर्याचें खरें भूषण मायाळुपणा म्हणतात तें अक्षरशः खरें आहे.

## रामलक्ष्मणांचें व्यालास्त्रबंधन:— [ म. भा. पा. ७४७-७४८ ]

हा भाग अध्यात्मांत नाहीं. तो वाल्मीकींतून घेतलेला आहे.

## [१२] धर्मरथरूपक:— [ म. भा. पा. ७५४ ]

अध्यात्मांत अथवा वाल्मीकींत हें धर्मरथवर्णन नाहीं.

या वर्णनावर छटा भारतांतल्या गीतोपदेशप्रसंगाची आहे. युद्धास तोंड लागण्याचें वेळीं तेथें अर्जुनास व्यामोह झाला होता. म्हणून श्रीकृष्णानें त्यास गीतोपदेश केला. येथें रामास विरथ आणि रावणास सरथ पाहून बिभीषणास व्यामोह झाला म्हणून त्यास रामानें रथाच्यारूपकानें धर्मोपदेश केला. '**इहि बिधि मोहिँ उपदेस किय,**' (या रीतीनें मजला आपला उपदेश झाला) या वाक्यावरून बिभीषणाचे गुरु राम होत ही गोष्ट तुलसीदासांनीं उघड केली.

या रूपकावर गीतेच्या तेराव्या अध्यायांतल्या '**अमानित्वमदंभित्व**' या धर्माचीं जशी छटा दिसते तशीच भाग. स्कं. ७ अ. ११ तल्या नारदोक्त धर्माचीहि छटा दिसते.

(१३) त्रिजटाकृत सीतासांत्वनः— [ म. भा. पा. ७७६-७७७ ]

वाल्मीकींत किंवा अध्यात्मांत हें सांत्वन नाहीं. या प्रसंगाची योजना तुलसीदासांनीं खालील श्लोकाच्या आधारानें केलेली स्पष्ट दिसते:—

यो रामो न जघान वक्षसि रणे तं रावणं सायकैः
स श्रेयो विदधातु वस्त्रिभुवनव्यापारचिंतापरः ।
हृद्यस्य प्रतिवासरं वसति सा तस्यास्त्वहं राघवो
मय्यास्ते भुवनावली विलसिता द्वीपैः समं सप्तभिः ॥

हा हनु. ना.त्या अं. १४ तला श्लो. २६ वा आहे. यांतली कल्पना घेऊन तीं तुलसीदासानीं किती चातुर्यानें खालील छंद आणि दोहा यांत ग्रथित केली आहे तें पाहण्या सारखें आहे:-

छंद:- एहि के हृदय बस जानकी जानकी उर मम बास है ॥
मम उदर भुवन अनेक लागत बान सब कर नास है ॥
सुनि बचन हरष बिषाद मन अति देखि पुनि त्रिजटा कहा।
अब मरिहि रिपु एहि बिधि सुनहि सुंदरि तजहि संसय महा ॥

( अर्थः-(त्रिजटा सीतेस म्हणाली-) प्रभूंचा विचार असा कीं रावणाच्या हृदयांत सीतेचा वास आहे आणि सीतेच्या हृदयांत माझा वास आहे. परंतु माझ्या हृदयांत अनेक ब्रह्मांडें वास करीत आहेत. तेव्हां रावणाच्या हृदयास बाण लागल्यास सर्वांचाच नाश होणार. तें भाषण ऐकून सीतेच्या मनास हर्ष वाटला, परंतु विषादहि अत्यंत वाटला. तें पाहून त्रिजटा फिरून म्हणाली:— हे सुंदरि ! आतां शत्रु खास मरणार हें ध्यानांत ठेव आणि आपली शंका दूर कर.

दो०-काटत सिर होइहि बिकल छुटि जाइहि तव ध्यान ।
तब रावन कर हृदय सर मारिहि राम सुजान ॥

अर्थः-शिरें तुटून तुटून रावण, जेव्हां विव्हल होईल आणि त्याचें तुजविषयींचें ध्यान सुटेल तेव्हां सुज्ञ रामचंद्र त्याचें वक्षस्थल शरानें विदीर्ण करतील.

[१४] राम-रावणयुद्ध आणि कांडोपसंहारः—

या युद्धप्रसंगाचें वर्णन करितानां तुलसीदासांनीं अध्यात्मांतला संक्षेप आणि वाल्मीकींतला विस्तार काढून दोहोंतला फक्त उपयुक्त आणि चटकदार तितकाच भाग घेतला, आणि त्यास नाटकांतल्या व स्वतःच्या सुंदर कल्पनांची जोड दिली. त्या कारणानें त्यांचें युद्धवर्णन फार सुटसुटीत होऊन देखील पुष्कळच मनोहर झालें आहे. यांतलें संग्रामनदीचें रूपक बीभत्स आणि भयानक रसांचें उत्कृष्ट उदाहरण आहे. तें स्वयंकल्पित दिसतें. मधून मधून स्वयंकल्पित विनोद आणि युद्धक्रीडा घातल्यानें इतर रामायणांतील युद्धवर्णनापेक्षां तुलसीदासांचें युद्धवर्णन फारच ओजस्वी वाटतें.

तुलसीरामायणांतला युद्धानंतरचा सर्वच भाग बहुशः वाल्मीकि आणि अध्यात्म यांच्या प्रमाणेंच आहे, पण तुलसीदासांनीं तो जास्तच संक्षिप्त आणि प्रेमपरिप्लुत केलेला आहे. याचें मुख्य कारण त्यांची लोकशिक्षणात्मक दृष्टि हें एकच दिसतें. बिभीषणानें आकाशांतून वानरादिकांवर विमानांतून वस्त्राभूषणांची वृष्टि केली इतकीच कल्पना मात्र तुलसीदासांची स्वयंकल्पित दिसते. परंतु ती फार साधार, सार्थ आणि सुमर्म आहे हें मात्र खास.

या वृष्टिसंबंधानें अशी शंका उपस्थित होत असते कीं लंकेचें राज्य बिभीषणास दिलेलें म्हणून त्याच्या हद्दीस ज्या रामानें पादस्पर्श देखील केला नाहीं इतकें कडकडीत लोकशिक्षणव्रत पाळिलें, त्याच रामानें बिभीषणास दिलेली संपत्ति वानरांकडून लाथानीं तुडवावी हें लोकशिक्षणदृष्ट्या चांगलें झालें नाहीं. कारण एक तर त्यांत रामाचा उद्दामपणा दिसून आला; आणि दुसरें ती संपत्ति शंकरार्पित असल्याकारणानें पर्यायानें रामाकडून शंकरांचा देखील उपमर्द दाखविला गेला. ही दृष्टि तुलसीदासांच्या लोकशिक्षणास जास्त विरोधी होऊं पहाते.

शंका भाविक आणि मार्मिक आहे म्हणून ती विचारार्ह आहे यांत शंका नाहीं, म्हणूनच या शंकेसंबंधानें आमचे विचार आम्ही सादर करितों.

राज्यदानाबरोबर सर्व संपत्ति बिभीषणाकडेस गेली आणि तिजवरील रामाचा जेतृत्वाचा हक्कहि गेला या गोष्टी आम्हास अक्षरशः कबूल आहेत. मात्र याच्या पलीकडे कोणताहि भाग आम्हास कबूल करितां येत नाहीं.

बिभीषण रामाला आपखुषीनें विमान भरून संपत्ति देऊं लागला. रामानें आपला हक्क दाखवून किंवा याचना करून ती मागितली नव्हती. अशा स्थितींत रामानीं ती जरी घेतली असती तरी देखील त्यामुळें त्यांस लांछन लागूं शकलें नसतें. परंतु दत्ताचें पुनरादान त्यांच्या व्रतास असह्य झालें.

त्यामुळें त्यांस मोठीच अडचण वाटली. एक तर त्यांच्यानें बिभीषणास नाखुष करवेना, आणि दुसरें त्यांनींच दिलेलें त्यांस घेववेना.

या दोहोंहि अडचणींपेक्षां देखील जास्त बोंचणारी अशी एक तिसरीच अडचण त्यांच्या मनास खाऊं लागली असा त्यांच्या वृष्टिरूप आज्ञेवरून तर्क होतो. ही तिसरी अडचण म्हणजे बिभीषण जर चिरंजीवी आहे, तर त्याची संपत्ति देखील तशीचच असावयास पाहिजे. नाहीं तर सकाळचा राजा आणि दुपारचा फकीर अशीच त्याची स्थिति होणार.

रामासारख्या धर्मिष्ठ दात्यास अशी शंका येणें अगदीं स्वाभाविक होतें. कारण त्यांस पूर्ण माहित होतें की रावणाची सर्व संपत्ति अन्यायानें आणि अत्याचारानें मिळविलेली होती. कांहींसा भाग शंकरांच्या वरप्रसादानें त्यास मिळाला असेल, परंतु तो देखील स्वतःचा शिरच्छेद करूनच म्हणजे तमोगुणमूलक आगळिकीनेंच असली ही पापमय संपत्ति टिकणारी तर नाहींच, पण तिचा संसर्ग देखील बिभीषणाच्या साधुत्वास बाधक झाल्या खेरीज राहणार नाहीं.

वरील विवेचनेमुळें रामास रावणाची संपत्ति बिभीषणाच्या कल्याणासाठीं शुद्ध करणें भाग झालें. म्हणून त्यांनीं तिचा शुद्धीकरणप्रयोग ठरविला. **तो प्रयोग म्हणजे त्या संपत्तीस निष्काम रामभक्तांच्या पायांवर लोटणें हा होय.**

आमच्या मतानें ही वृष्टि '**सा संपत्तिर्विपत्तिःस्यान्महान्तो नाहताः यथा**' या शास्त्ररहस्याचा प्रत्यक्ष प्रयोग होय.

स्वतःची वानरादिकांविषयीं कृतज्ञता आणि आदरभाव, वानरादिकांच्या निष्काम भक्ति बद्दल कुतूहल, आणि बिभीषणाच्या साधुत्वाचा आणि राजवैभवाचा स्थायीभाव इतक्या गोष्टी तत्वदृष्ट्या या दृष्टांच्या मिषानें रामानीं साधल्या.

आतां तुलसीदासांच्या लोकशिक्षणास ही दृष्टि साधक किंवा बाधक आहे तें पहाणें आक्षेपकांवरच सोंपवून आम्ही त्यांची येथेंच रजा घेतो.

## उत्तरकांड.

अध्यात्मानें आणि वाल्मीकानें युद्धकांडांतच त्यांच्या रामाचें मुख्य अवतार-चरित्र ( म्हणजे रावणवध आणि रामराज्याभिषेक ) संपविलें. पुढचें सीतात्यागा-पासून रामनिर्याणापर्यंतचें चरित्र उत्तरामचरित्र समजून तें त्यांच्या रामायणाच्या उत्तरकांडांत त्यानीं दिलें आहे.

तुलसीदासांनीं वरील उत्तररामचारित्रास सपशेल फांटा दिला. कदाचित् त्यांना तें प्रेमळ भक्तांच्या हृदयास दुखविणारें, रसाचा विरस करणारें, आणि सामान्य लोकशिक्षणदृष्ट्या विशेष अनुपयुक्त असेंच वाटलें असावें.

म्हणून तुलसीदासांनीं त्यांच्या रामायणाच्या लंकाकांडांत लंकेपुरताच संबंध ठेवणारा रामचरित्राचा भाग घातला, आणि राज्याभिषेक आणि राज्यपद्धति हेंच रामाचें उत्तरचरित्र ठरवून त्यांनीं त्या वर्णनास उत्तरकांड नांव दिलें.

अध्यात्माच्या उत्तरकांडांत रामगीता आहे. ही गीता वेदान्तप्रचुर आहे. सामान्य लोकशिक्षणास तिचा विशेष उपयोग नाहीं. या विचारानें तुलसीदासांनीं ती अजीबात वगळली, आणि तिच्या ऐवजीं त्यानीं भागवताच्या धर्तीवर वेदस्तुति सनकादिस्तुति, शंकराष्टक इत्यादि स्तवांची योजना केली.

तुलसीदासांच्या ध्येयाच्या दृष्टीनें त्यांची उत्तरकांडाची कल्पना आणि रचना निःसंशय गंभीर आणि सरस ठरतात.

### (१) भरतमारुतिभेटः--- [ म. भा. पा. ८०४-८०७ ];

तुलसीदासांचें उत्तरकांड या भेटीपासूनच सुरू होतें. ही भेट भक्तिभावाचा अप्रतिम नमुना आहे. या वर्णनांत रामदर्शनाचे पूर्वीची भरताची तळमळ, त्याच

स्थितींत त्यास आकस्मिक रीतीनें मारुतिदर्शन, आणि त्यानंतर प्रत्यक्ष रामदर्शन हे सर्व प्रकार जणुंकाय भक्तिविजयादि ग्रंथांतून दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या तुलसीदासांच्या चरित्रा प्रमाणेंच भासतात.

**[२] अयोध्याविषयक राम-प्रेमः—** (म. भा. पा. ८०८)

या वर्णनांतला निवडक भाग हा आहे.:—

चौ०–जद्यपि सब वैकुंठ बखाना। वेदपुरानविदित जग जाना
अवध सरिस प्रिय मोहि न सोऊ। यह प्रसंग जानइ कोउ कोऊ

... ... .... .... ...

अतिप्रिय मोहि इहाँ के वासी। मम धामदा पुरी सुखरासी

(अर्थः- जरीं सर्वत्र वैकुंठाची महती गाइली जाते–आणि ही गोष्ट वेद, पुराण आणि जग यांना संमत आहे–तरीं देखील तें वैकुंठ मला अयोध्येसारखें प्रिय वाटत नाहीं. या सिद्धांताचें रहस्य क्वचित् कोणाकोणालाच ठाऊक आहे.

.... .... .... .... ....

अयोध्यावासी जन मला अत्यंत प्रिय आहेत. ही अयोध्यापुरी सुखाचें भांडार आणि माझ्या पदाची दात्री आहे.)

वरील मातृभूमीच्या प्रेमाची स्फूर्ति सुरदासजींच्या खालील पद्यांत विशेषच रंगविलेली दिसतेः-

काह करौ वैकुंठ महँ जाय ॥ ध्रु० ॥
वहँ नहिँ नंद वहँ नहिँ गोकुल नहिँ वहँ कदंमकि छाँह
वहँ नहि जल जमुनाको निर्मल वहँ नहि ग्वाल बाल अरु गाय॥
इ. इ.

तुलसीदास घ्या, सूरदास घ्या, किंवा कोणीहि घ्या, विचारवान् 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' हाच हितपाठ देणार.

**[३] भेटी आणि मंगलस्नानेंः—** [म. भा. पा. ८०९-८१५]

हीं वर्णनें अत्यंत मनोवेधक आणि मननीय आहेत. यांत तुलसीदासांनीं व्यवहारशिक्षण फारच मार्मिक रीतीनें गोविलें आहे. तें एकदम लक्षांत येत नाहीं याचें कारण त्यांतला प्रेम बुद्धीस अगदींच चकित करून टाकतो. उदाहरणार्थ एक भाग खालीं देतों:--

चौ०-राम कहा सेवकन्ह बुलाई । प्रथम सखन्ह अन्हवावहु जाई
सुनत वचन जहँ तहँ जन धाये । सुग्रीवादि तुरत अन्हवाये
पुनि करुनानिधि भरत हँकारे । निज कर राम जटा निरुवारे
अन्हवाये प्रभु तीनिउँ भाई । भगतवछल कृपाल रघुराई
भरतभाग्य प्रभु कोमलताई । सेष कोटि सत सकहिँ न गाई
पुनि निज जटा राम विवराये । गुरु अनुसासन माँगि नहाये

( अर्थः-रामांनीं सेवकांस बोलावून आज्ञा दिली कीं ' तुम्ही जा आणि माझ्या मित्रमंडळीस स्नानें घाला. ' ती आज्ञा ऐकतांच सेवकांनीं लागलीच धावपळ करून सुग्रीवादिकांना मंगल स्नानें घातलीं. नंतर करुणा-निधानांनीं भरतास बोलावून घेतलें, आणि त्याचा जटाभार स्वहस्तानें मोकळा केला. भक्तवत्सल दयाळू रामप्रभूंनीं नंतर तिघांहि भावांना न्हाऊं घातलें. भरताचें भाग्य आणि प्रभूंचें सौहार्द कोटिशत शेषांच्यानेंहि वर्णिलें जाणार नाहीं. शेवटीं वशिष्ठाज्ञेनें रामांनीं आपला जटाभार मोकळा केला आणि अभ्यंगस्नान केलें.

रावणाचे प्राण घेणारे तेच ना हे भरताच्या जटा मोकळ्या करणारे आणि सर्वच भावांना अंगमर्दनपूर्वक न्हाऊं घालणारे रामाचे हात ! **' त्वयि हि परिसमाप्तं वंधुकृत्यं प्रजानाम् '** हीं कालीदासोक्ति तुलसीदासांच्या या रामास किती तरी शोभते !

## [४] पाहुण्यांची बोळवणः— (म. भा. पा. ८३२-८२६)

या वर्णनांतलें प्रेम अगदीं अवर्णनीय आहे. यांतले राम आणि अंगद अनुक्रमानें कृतज्ञता आणि प्रेम यांचे पुतळेच आहेत.

हा प्रसंग लिहितांना तुलसीदासांसमोर उद्धवास सांगितलेला गोकुलवासी जनांचा श्रीकृष्णास निरोप ( भाग. अ. ४७ श्लो. ६५-७० ) असावा असें वाटतें.

भवभूतीच्या उत्तररामचरितांतल्या खालील श्लोकावर कवीची दृष्टि होती हें मात्र निश्चितः-

वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
लोकोत्तराणां चेतांसि कोहि विज्ञातुमर्हति ॥

कारण हुबेहुब याच श्लोकाचें रुपांतर खालचा दोहा आहेः---

कुलिसहु चाहि कठोर अति कोमल कुसुमहु चाहि ।
चित खगेस अस राम कर समुझि परइ कहु काहि ॥

( अर्थः-गरुडा ! रामाचें मन वाटल्यास वज्राहून देखील कठोर होतें, आणि वाटल्यास पुष्पांपेक्षां देखील कोमल होतें या गोष्टीचा क्वचितच कोणा एखाद्यास बोध होत असेल. )

या प्रसंगांतलें अंगदाचें भाषण इतकें सरळ, सोपें, आणि प्रेमळ आहे कीं त्याला सगळ्या रामायणांत प्रतिद्वंद्वी नाहीं. या भाषणांतल्या प्रेमाच्या आणि करुणेच्या लहरी वरून अशी कल्पना होते कीं हा प्रसंग लिहितांना तुलसीदासांसमोर त्यांच्या बाळपणाच्या वगैरे आठवणी उद्भवल्या असाव्या. जन्मापासूनच आईबापांचें सुख म्हणून मुळीं देखील नाहीं, पुढें गुरुंचाहि वियोग झालेला, स्त्रीदेखील सोडलेली, अशा आयुष्यांत जगाचें सुख काय मिळणार? या सर्व गोष्टींचा उद्वेग होऊन एका रामापरतां आतां कोणीहि वाली नाहीं अशी भावना उद्भवून ती जास्त जोरानें फोंफावत असतांना तुलसीदासांनीं हें अंगदाचें भाषण लिहिलें असावें असें सहज वाटतें. म्हणून या संवादांतला अंगद स्वतः कवीच असावा अशी कल्पना होते.

वरील कल्पनेच्या विचारासाठीं अंगदाचें भाषण खालीं दिलें आहेः--

चौ०-सुनु सर्वज्ञ कृपासुखसिंधो । दीन-दयाकर आरतबंधो
मरतीबार नाथ मोहि बाली । गयेउ तुम्हारेहिं कोंछे घाली
असरन-सरन बिरद् संभारी । मोहि जनि तजहु भगतहितकारी

हे दीनदयाळ कृपासुखसागर आर्तबंधो रामा ! आपण सर्वज्ञ आहांत. माझी विनंती श्रवण करावी. हे नाथा ! मरतेवेळीं वाली मला आपल्याच ओटींत

घालून गेला. अनाथरक्षक हें आपलें ब्रीद आहे. तें सांभाळून आपण मला मोकलूं नये. भक्तांचे हितकर्ते एक आपणच आहांत.

**मोरे तुम्ह प्रभु गुरु पितु माता । जाउँ कहाँ तजि पदजलजाता**
**तुम्हइँ विचारि कहहु नरनाहा । प्रभु तजि भवन काज मम काहा**

माझे स्वामी गुरु, माता, पिता, सर्व कांहीं आपणच आहांत. मग मी या पदपंकजास सोडून कोठें जावें बरें ? हे नरनाथ ! आपणच विचार करून सांगावें कीं, प्रभूस सोडून घरीं माझें काम तरी काय आहे ?

**बालक ज्ञान-बुद्धि-बल-हीना । राखहु सरन जानि जन दीना**
**नीचि टहल गृह की सब करिहउँ । पद बिलोकि भवसागर तरिहउँ**

मी ज्ञान, बुद्धि आणि बळ यांनीं हीन आहे तरी आपलें लेंकरूं आहे. आपला एक दीन सेवक जाणून मला शरणागताला आपण ठेवून घ्यावें. आपल्या महालांतले सर्वच नीच कावाड मी करीत जाईन आणि आपलीं पदकमलें पाहूनच संसारसागर तरीन.

**अस कहि चरन परेउ प्रभु पाही । अब जनि नाथ कहहु गृह जाही**
इतकें बोलून अंगदानें प्रभूंचे पाय घट्ट धरले, आणि तो म्हणाला नाथांनीं मला आतां घरीं जाण्यास सांगूं नये.

अंगदाचें तें प्रेमळ भाषण ऐकून **'प्रभु उठाइ उर लायेउ सजल नयनराजीव'** त्यांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं डबडबले, आणि त्यांनीं अंगदास उचलून पोटाशीं धरिलें. त्यांनीं त्यानंतर **' निज उर माला बसन मनि बालि-तनय पहिराइ'** इतकें करून त्याची बोळवण केली.

वैजयंति, पीतांबर आणि कौस्तुभ रामांनीं अंगदास ओपिले यांत कांहींच नवल नाहीं. भृगपदचिन्ह आणि श्रीवत्स हे देखील ते त्यास देते. पण ते अंगलग्न म्हणूनच रामाचा नाइलाज झाला यावद्दल खिन्नता वाटूनच कीं काय **'बहु प्रकार समुझाइ'** परोपरीनें विनवणी करून रामास अंगदाला **'बिदा कीन्ह'** निरोप द्यावा लागला. तुलसीदासांचा हा राम आणि श्रीशुकाचार्यांचा खालील श्लोकांतला कृष्ण यांचें साम्य वाचकांच्या ध्यानांत आतां सहज येऊं शकेल;---

यस्याम्भुतामलयशःश्रवणावगाहः सद्यः पुनाति
· जगदाश्वपचाद्विकुंठः।
सोऽहं भवद्भ्य उपलब्धसुतीर्थकीर्तिश्छिद्यां
स्वबाहुमपि वः प्रतिकूलवृत्तिम् ॥
( भा. स्कं. ३ अ, १६ श्लो. ६ )

## [५] रामराज्याबद्दल विषाद मानणारांचें वर्णन:—[म. भा. पा. ८३५]

या रूपकाची कल्पना स्वतंत्र असून उत्कृष्ट आहे. परंतु ती विशेष महत्वाची नसल्याकारणानें दिली नाहीं.

## [६] रामाचें प्रजेस जाहीर व्याख्यान—( म. भा. प. ८४४ ]

भागवत स्कं. ४ अ. २१ मध्यें पृथुराजानें प्रजाजनांस केलेल्या उपदेशा-वरून तुलसीदासांनीं या प्रसंगाची कल्पना केलेली दिसते, परंतु उपयुक्ततेच्या दृष्टीनें या व्याख्यानाचें महत्व फारच मोठें आहे. याची कारणें हीं अशीं;–

( १ ) या संवादावरून तुळसीदास केवळ प्रजाराधक राजसत्तेचे चाहते होते असें स्पष्ट दिसतें.

( २ ) त्यांच्या या राजसत्तेची मर्यादा अनीतिमान् राजाचें प्रजेकडून वर्जन करण्यापर्यंत गेलेली आहे.

( ३ ) उद्योगच [ पौरुषच ] दैवाहून श्रेष्ट असें यांत ठरविलें आहे.

( ४ ) ज्ञानापेक्षां भक्तिच श्रेष्ट हा यांतला सिद्धांत आहे.

( ५ ) शैववैष्णवद्वेष हा बालिशपणा होय असें यांत सांगितलें आहे.

( ६ ) सत्समागमाखेरीज भक्ति साध्य होत नाहीं हा यांतला सिद्धांत आहे.

## [७] राम-वसिष्ठसंवाद-( म. भा. पा. ८४७-८४८ )

अध्या. रामा. अयो. का. स. २ श्लो. २८–३० यांतल्या वसिष्टांच्या भाषणाचा तुलसीदासांनीं येथें विस्तार केला आहे. रघुकुलाचें पौरोहित्य स्वीका-रण्याचें इंगित वसिष्ठांनीं यांत स्पष्ट केलें आहे. यांतले वसिष्ठ ज्ञानापेक्षां भक्ती-सच प्राधान्य देणारे आहेत.

[८] विषयानुक्रम—[ म. भा. पा. ८६०–८६२ ]

ही अनुक्रमशैली भाग स्कं. १२ अ. १२ तल्या शैलीचें अनुकरण दिसते.

[९] भागवतमतैक्य–[ म. भा. पा. ८८५ ]

भाग. स्कं. १२ अ. २ यांत हा श्लोक आहे:–

दानव्रततपोहोमजपस्वाध्यायसंयमैः । श्रेयोभिर्विविधैश्चान्यैः
कृष्णे भक्तिर्हि साध्यते ॥

हें आणि तुलसीदासांचें खालील मत यांत अगदीं सारखेपणा आहे.

चौ० जप तप व्रत मख सम दम दाना । बिरति बिबेक जोग बिज्ञाना
सबकर फल रघुपतिपदप्रेमा । [तेहि बिनु कोउ न पावइ पेमा
(क्षेम)

[१०] कलिवर्णन–( म. भा. पा. ८८७-८९२ )

यांत भाग स्कं. १२ अ. २ मधलें बरेचसें वर्णन घेऊन त्यास कवींनीं स्वतः-च्या कालाचें वर्णन कुशलतेनें जोडिलेलें आहे असेंच ह्मणावें लागतें. एकंदरींत हा भाग जरी थोडा विस्तृत झाला तरी तो फारच चटकदार झाला आहे यांत शंका नाहीं.

[११] संतहृदय:–( म. भा. पा. ९२२ )

चौ०–संतहृदय नवनीतसमाना । कहा कविन्ह पै कहइ न जाना
निजपरिताप द्रवइ नवनीता । परदुख द्रवहिं सुसंत पुनीता

अर्थ:–संतांचें हृदय नवनीतासमान आहे असें कवींनीं ह्मटलें आहे. तें ह्मणणें त्यांनाच कळलेलें नाहीं. स्वतःस ताप झाला कीं नवनीत विरघळतें, परंतु जे खरे पवित्र संत आहेत ते केवळ दुसऱ्याच्याच दुःखानें द्रवतात. ( तात्पर्य, ते स्वतःच्या दुःखास कांहींच समजत नाहींत. )

वरील वर्णन खालच्या श्लोकाचें हुबेहुब रूपांतर आहे:–

सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदंति कवयस्तदलीकं ।
अन्यदेहविलसत्परितापात् सज्जनो द्रवति नो नवनीतं ॥

[१२] कांडसमाप्ति--( म. भा. पा. ९२७ )

कामिहि नारि पियारि जिमि लोभिहि प्रिय जिमि दाम
ऐसेइ हुइ कब लागिहैं तुलसीके मन राम ॥

( अर्थः---कामीजनास जशी स्त्री प्रिय, आणि लोभ्यास जसा पैसा प्रिय तशाप्रमाणें तुळसीदासाच्या मनास राम केव्हां प्रिय लागेल ? )

कांडसमाप्तीची ही तऱ्हा कवींनीं भागवताच्या ' **भवेभवे यथा भक्तिः** ' या समाप्तीच्या श्लोकावरून घेतली असावी. परंतु ज्या चातुर्यानें, प्रेमानें आणि कळवळ्यानें कवींनीं ती तऱ्हा येथें सुधारली तेंच खरें पाहण्यासारखें आहे. असा ग्रंथसमाप्तीचा प्रकार फारसा कोठें आढळत नाहीं. परबोधक शक्तीचें वर्म खरोखर स्वामीजींस चांगलेंच अवगत होतें यांत शंका नाहीं.

**काकभुशुंडिगरुड-संवाद** तुलसीरामायणाची समाप्ति करितो. अशी समाप्ति कोणत्याच रामायणांत आढळत नाहीं. कवीची ही स्वतंत्रच योजना आहे. या संवादास वेदांतोपन्यास ह्मणण्याची प्रथा आहे. आह्मास मात्र ती ग्राह्य नाहीं. ज्ञान किंवा भक्ति रुजण्यासाठीं जी चित्तशुद्धि अवश्य आहे ती प्राप्त होण्याच्या मार्गाचा उपन्यास तुळसीदासांनीं या संवादाच्या रूपानें केला आहे असें आमचें मत आहे.

वरील संवाद वास्तविक रीतीनें या रामायणाची पुरवणी आहे. तुलसीदासांनीं ती मुद्दाम जोडली हें खऱ्या कळवळ्याच्या आणि दूरदर्शी अशा शिक्षकास अत्यंत शोभण्यासारखेंच कार्य झालें. ही पुरवणी नसती तर तुळसीदासांचें लोकशिक्षणाचें काम रामचरितमानसासारखा ' **न भूतो न भविष्यति** ' असा ग्रंथ करून देखील अपुरेंच राहतें. कारण श्रवणास जशी मननाची चाड तशीच रामचरितमानसास या संवादाची अपेक्षा होती. तुलसीदासांनीं ती ऐन-वेळींच ताडली आणि पूर्ण केली. खऱ्या कसलेल्या शिक्षकाचें लक्षण तें हेंच.

या संवादांत अगदीं मामुली, साध्या, सोप्या, आणि अगदीं प्रचारांतल्या गोष्टी उदाहरणास घेऊन विषय चांगला विंतवून देण्यासंबंधानें कवींनीं विशेषच काळजी घेतलेली दिसते. शिकविण्याची ही धाटणी फारच थोड्या शिक्षकांस

साधते. तुलसीदासांत ती प्रेक्षणीय आणि अनुकरणीय अशीच रुजलेली दिसून येते. विशेषतः पारमार्थिक विषय अशा रीतीनें पटवून देणारा शिक्षक फारच विरळा.

या संवादाचा हेतु ज्ञानापेक्षां भक्ति श्रेष्ठ इतकेंच दाखविण्याचा नसून '**भक्ति ज्ञानाची माउली**' हें सिद्ध करण्याचा आहे.

एकंदरींत हें कांड अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या उत्तरकांडापेक्षां अगदींच निराळ्या धर्तींवर झालेलें आहे इतकें सांगून हा काव्य-परिचय समाप्त करितों.

# लोकशिक्षण

या भागांत तुळसीदासांची खालील विषयांवर मतें व्याख्यानरूपानें दिलीं आहेतः—

(१) दैवपौरुषवाद (२) गृहशिक्षण (३) स्त्रीशिक्षण (४) राजनीति (५) समाजशिक्षण (७) कर्म आणि उपासना, (७) दार्शनिकमत [वेदान्तमत] आणि (८) भक्ति.

वरील विषयांसंबंधाचीं मतें तुलसारामायणांत व्याख्यानरूपानें म्हणजे संकलितरूपानें विवक्षित अशीं आलेलीं नाहींत. तीं ग्रंथांत इतस्ततः विखुरलेलीं आहेत. त्यांस येथें विषयवार समष्टिरूप देऊन वाचकांस सादर करण्यापलीकडे आम्ही कांहींहि केलेलें नाहीं. सर्व मतें तुळसीदासांच्याच लेखणींतून निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्यारूपानें बाहेर आलेलीं आहेत. फुलें बागेंतलींच, माळी फक्त त्यांची लेणीं गुंफणारा, एवढीच काय ती आमची या लोकशिक्षण प्रकरणासंबंधानें कामगिरी समजावयाची. आमचें स्वतःचें मत म्हणून या भागांत कोणतेंहि नसल्याकारणानें त्यासंबंधानें आम्हांकडेस कोणत्याहि प्रकारें जबाबदारी पोहोंचू शकत नाहीं.

## दैवपौरुषवाद

तुळसीदासांचें रामायण म्हणजे लोकशिक्षणाची चळवळ हें आम्ही पूर्वीच सांगून चूकलों आहों (कविपरिचय–लेख ३ पहा). चळवळ करणारा केवळच दैववादी असूं शकत नाहीं. त्याप्रमाणें तुळसीदास देखील तसे नव्हते हेंच या व्याख्यानावरून सिद्ध होईल.

(म. भा. पा. ४२८)

**दो०– सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ !**
**हानि लाभ जीवन मरन जस अपजस विधि हाथ ॥**

(अर्थः–वसिष्ठगुरु भरतास विशेष अनुलक्षून म्हणाले ' बा भरता ! ऐक, भवितव्यता प्रबल असते. हानी आणि लाभ, जीवन आणि मरण, आणि यश आणि अपयश हे सर्व विधिप्रयुक्तच असतात.) (म. भा. पा. ८४४)

चौ०–बडे भाग मानुसतन पावा। सुरदुर्लभ सद ग्रंथन्हि गावा
साधनधाम मोच्छकर द्वारा। पाइ न जेहिँ परलोक सँवारा
दो०–सो परत्र दुख पावइ सिर धुनि धुनि पछिताइ।
कालहिँ कर्महिँ ईस्वरहिँ मिथ्या दोष लगाइ॥
(म. भा. पा. ८४४)

( **अर्थः**–[राम म्हणतात-] नरदेह महद्भाग्यानेंच मिळतो. देवांना देखील तो दुर्लभ असतो असें थोरथोर ग्रंथ सांगतात. तो साधनांचें धाम आहे, आणि मोक्षाचें द्वार आहे. तो मिळून ज्यानें परलोक साधला नाहीं तो परत्र दुःखें भोगतो, कपाळ ठोकठोकून प्रस्तावतो, आणि काळ, कर्म आणि ईश्वर यांना वृथैवच दोष देतो. )

वरील वाक्यें दिसण्यांत स्पष्टच विरोधी दिसतात. पहिलें दैवाचा पुरस्कार करितें, तर दुसरें **पौरुषास** पुढाकार देतें. हांच आतां विप्रतिपत्ति समजावयाची.

या विप्रतिपत्तींत पौरुषवादी पक्ष असें म्हणतो कीं पूर्वपक्षाचा ' विधि '-शब्दासंबंधानें गैरसमज झालेला आहे. ' विधि ' शब्द ' दैव ' आणि ' उद्योग ' या दोहोंचाहि वाचक आहे. अशा व्यर्थी शब्दाची उपपत्ति प्रतिपाद्य विषयावरूनच ठरवावी लागते. वसिष्ठांच्या भाषणाचा रोख भरतास राज्य करण्यास लावण्याचा होता, तर ' **विधि** '–शब्द उद्योगवाचक घेणेंच भाग. योगवासिष्ठाचे कट्टे पौरुषवादी वसिष्ठ अशा अगदीं सामान्य प्रसंगीं [ परिस्थितींत ] दैववादी बनून त्यांनीं आपला एकदमच रंग पालटावा हें दिसण्यांत तरी शक्य दिसतें काय ? शिवाय या ' **विधि** '–शब्दाचा अर्थ भरतानें देखील दैववाचक केलेला नाहीं हेंहि स्पष्ट आहे. कारण त्यानें जर तसा अर्थ केला असता तर तो वसिष्ठांच्या भाषणावर खालील प्रमाणें औपरोधिक उत्तर कदापिहि न देताः–

चौ०गुरु विवेकसागर जगजाना। जिन्हहिँ विस्व कर-बदर-समाना
मोकहँ तिलकसाज सज सोऊ। भये विधि विमुख विमुख सब कोऊ
म. भा. पा. ४३६

( **अर्थः**—आतां आमचे गुरुराज वसिष्ठ–ज्यांना हें विश्व तळहातावरील बोराप्रमाणें आहे, आणि जे विवेकसागर म्हणून भुवनविख्यात आहेत–

ते देखील मजलाच राजछत्रांकित करण्यास प्रवृत्त झालेले आहेत. म्हणजे त्यांच्याच शब्दाप्रमाणें दैव फिरलें की सगळेंच कांहीं फिरतें. )

यावरुन स्पष्ट आहे कीं भरतानें ' विधि '-शब्दाची दैववाचकता न घेतां पौरुषवाचकताच घेतली, आणि तो रामदर्शनाच्या उद्योगास लागला. भरताच्या या भाषणानें आणि उद्योगानें वास्तविक पाहतां वसिष्ठांस स्वतःचा उपमर्द झाला असें वाटण्यास पुष्कळच जागा होती. परंतु तसें न वाटून उलट त्यांस आनंदच झाला, आणि ते तत्काल रामदर्शनोद्यत होत्साते भरताचे अनुयायी बनले. या एकंदर सर्व प्रकारावरुन ' विधि '-शब्द उद्योगवाचकच धरला पाहिजे. असें केलें तरच वरील पहिल्या दोह्यांतल्या ' बिलखि ' या शब्दाचा खोंचदारपणा स्पष्ट दिसून येतो.

या उपपत्तीवर दैववादी पक्ष खालील अवतरणें देऊन दैव-प्राधान्य समर्थन करतोः—

**दो०—कह मुनीस हिमवंत सुनु जो विधि लिखा लिलार**
**देव दनुज नर नाग मुनि कोउ न मेटनहार ॥**(म. भा. पा. ६७)

( **अर्थः**-नारद म्हणाले—हिमवंता ! ऐक. ब्रह्मदेवाचें भाललिखित देव, दैत्य, नर, नाग, मुनि यांतून कोणाच्यानेंहि पुसवत नाहीं. )

**चौ०— .. ... .. । सो न टरइ जो रचइ विधाता**
इ. इ. ( म. भा. पा. ९१ )

यावर विरुद्ध पक्ष आपलें उत्तर खालील प्रमाणें देतोः—

तुलसीदासांनींच '**विधि कर लिखा को मेटनहारा।**' [ विधिलिखित अन्यथा कोण करुं शकतो ? ] असा प्रश्न घेऊन त्यावर '**भाविउ मेटि सकहिँ त्रिपुरारी।**' [ शंकर भावी देखील टाळूं शकतात—म.भा. पा. ६८ ] हें उत्तर दिलें आहे. यावरुन शंकरांचा उपासना-विधि ह्मणजे **पौरुषच** विधिदिष्टापेक्षां ह्मणजे दैवापेक्षां समर्थ ठरतो.

वरील उत्तराचा परिहार दैववादीपक्ष करुं शकत नाहीं. तो फक्त ' **होइहहि सोइ जो राम रचि राखा।** ' ( रामसंकल्पितच अखेर होणार ) या वाक्याचीं सार्थकता दाखविण्यास विरुद्धपक्षास आवाहन करितो. त्यावर उद्योगवादी

ह्मणतो कीं, 'मोरे कहे न संशय जाहीं' [ माझ्या ( शंकराच्या ) देखील उपदेशानें तिचा ( सतीचा ) संशय मावळला नाहीं—म. भा. पा. ५५ ] हें वाक्य ज्याअर्थीं तत्पूर्वीचें आहे त्याअर्थीं उद्योग पुरता संपल्या नंतरच रामसंकल्पितावर भिस्त ठेवावयाची. शिवाय ब्रह्मलिखित आणि रामसंकल्पित हे अगदीं पृथक् आहेत. रामसंकल्पित ब्रह्मदिष्ट ह्मणजे दैव नव्हे! रामसंकल्पितावर कोणाचीच मात्रा चालत नाहीं हें मात्र खरें.

रामसंकल्पित ब्रह्मदिष्ट नव्हें यास पौरुषवादी खालील आधार देतोः—

(म. भा. पा. ४६४-४६५ )

**चौ०-करमप्रधान विस्वकरि राखा। जो जस करइ सो तस फल चाखा**

**तदपि करहिं सम विषम विहारा। भगत अभगत हृदय अनुसारा**

( **अर्थः**—विश्वाच्या राहटींत कर्मच प्रधान आहे. जो जसें करील तसेंच फळ त्यानें चाखावें हीच ती राहाटी होय. तरी देखील भक्ताभक्तांच्या इच्छेनुसार रामाचे व्यवहार समविषम होतात.)

आणि ह्मणतो कीं रामसंकल्प देखील रामसेवेचाच ह्मणजे **पौरुषाचाच** परिपाक समजला पाहिजे.

अशा रीतीनें ह्या वादाचा शेवट '**दैव दैव आलसी पुकारा**' ( आळशांनांच '**दैव**' '**दैव**' ह्मणून ओरडत रहावें ) या वाक्यानें करून तुलसीदास **पौरुषवादी** होते असें त्यांजकडून सिद्ध करण्यांत येतें.

आह्मांला देखील वरील पौरुषवादच सोपपत्तिक वाटतो, कारण त्याचे खालील ठोकताळे फार शुद्ध आणि सयुक्तिक वाटतातः—

( १ ) **पौरुष** शब्द मानवी शक्तीची जाणीव दर्शवितो. सामान्य दृष्ट्या **दैव** शब्द पौरुषाची सुप्तता किंवा ऱ्हास या अर्थी समजला जातो. आतां जाणीव ह्मणजे चेतनधर्म, आणि सुषुप्ति किंवा ऱ्हास ह्मणजे अचेतनता. अचेतन चेतनास बाधक होऊं शकत नाहीं हा नियम आहे. मग दैव उद्योगास बाधक कसें ?

( २ ) **दैव विरुद्ध पौरुष** हें या वादाचें मूळस्वरूप आहे. शास्त्रदृष्ट्या दैव ह्मणजे पूर्वजन्मांतल्या कर्मांचा ( ह्मणजेच उद्योगांचा ) चेतनधर्मरूप परिपाक होय. कारण '**पूर्वजन्मार्जितं कर्म दैवमित्यभिधीयते**' असें प्रमाण आहे. आतां येथें वादाचें स्वरूप अर्थातच असें झालें— '**पूर्वजन्म—उद्योग** विरुद्ध **वर्तमानजन्म—उद्योग.**' या लढ्यांत ज्याचें बलाधिक्य होईल तोच बली. तेव्हां प्रथम पासूनच दैवास बली किंवा प्रधान समजण्यास कांहींच आधार नाहीं. उद्योगाची अंगवण नसणाऱ्यास दैवच प्रधान वाटणें साहजिक आहे. परंतु त्यास देखील '**अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते**' हें वाक्य जमेस धरावेंच लागेल.

## गृहशिक्षण

ब्राह्ममुहूर्तावर ( कुक्कुटध्वनि होतो तेव्हां ) घरांत कोणी देखील निद्रित असूं नये. सर्वांनीं उठून आपापल्या उपासनेप्रमाणें किंवा गुरुमार्गाप्रमाणें भगवत्स्मरण करावें. नंतर गुरु, ब्राह्मण, देव, माता, पिता आणि वृद्ध, यांचें पदवंदन करावें. पुढें प्रातर्विधि सारून सर्वांनीं सूर्योदयापूर्वी शुद्धचित्तानें गंगास्नान ( किंवा गंगाळस्नान ) करावें. नंतर संध्योपासनादि विधि करावा. ही पहिल्या प्रहराची कर्मे होत. तदनंतर स्त्रीपुरुषांनीं योग्य पुरुषांकडून यथाधिकार पुराणादिकांचें श्रवण करावें, किंवा स्वतः पठण करावें. हीं सर्व नित्य कर्मे होत. ( म. भा. पा. २९३ )

घरांतील पुरुषांचें भोजन एकाच पंक्तीस व्हावें ( ह्मणजे अर्थातच पंक्तिप्रपंचास वाव राहणार नाहीं. म. भा. पा. ८३० ). मध्यान्हापर्यंत घरांतील मंडळींचीं भोजनें आटोपलीं पाहिजेत. पुढें किंचित् विश्रांतिनंतर व्यवसायास सुरुवात व्हावी ( म. भा. पा. १८२ ). शेवटच्या प्रहरांत पुरुषांनीं उघड्या मैदानांतल्या शुद्ध हवेंत फिरावयास जावें ( म. भा. पा. ८४९ ).

वेळेवर सायंसंध्या होत असावी. सकाळसारखाच वंदनविधि रात्रींहि व्हावा. नंतर भोजनोत्तर कुटुंबांतल्या माणसांनीं आपापल्या नात्याप्रमाणें एकत्र जमावें, आणि सांसारिक चर्चा न करतां पारमार्थिक चर्चा करावी. येणें प्रमाणें

प्रसन्नचित्त होऊन दुसऱ्या प्रहरांत शयन करावें, परंतु त्यापूर्वीं आपापल्या नात्या-प्रमाणें पादसंवाहन केल्या खेरीज राहूं नये. ( म. भा. पा. १८८ )

हा एकंदर प्रकार दैनंदिनचर्येचा झाला. आतां विशेष गृहाचार तो असाः- [ खालील आंकडे तुलसीरामायणाच्या आमच्या मराठी भाषांतराचीं पानें दाखवितात. ]

गृहचालक मनाचा सरळ आणि गुणग्राही असावा ( २९० ). त्याचें ध्येय प्रेमजीवनानें कुटुंबपालनाचें असावें ( ४०५ ). घरांत वडील स्त्रिया सुनामुलींना कशा वागवितात तें नेहमीं त्यानें सूक्ष्मरीतीनें लक्षांत आणावें ( २९१ ). धाकटीं मुलें घराबाहेर खेळण्यास अवश्य पण खबरदारीनें पाठवावी ( १७२ ). परीपाहुणा आलागेला, यांसर्वांस त्याचें गृह स्वगृहासारखें वाटलें पाहिजे. आदर आणि प्रेम घरांत सर्वत्र नांदल्याखेरीज हें होणें दुरापास्त असतें ( ८२२ ). गुरु-संत, गाय-ब्राह्मण, आई-बाप, सासू-सासरा, साधु-स्वामी यांचा आदर आणि प्रेम घरांत देवा पेक्षां देखील जास्त होत असावा ( ५३२,९१५ ). त्यांच्या सेवेसाठीं गृहचाल-कानें चित्त-वित्त, देह-गेह, आणि पुत्र-कलत्र तृणवत् समजलें पाहिजेत ( २९४, ३९७ ).

प्रत्येक कुटुंब स्वधर्म, वर्णाश्रमधर्म आणि वैदिकक्रियाकलाप यांचें केवळ पीठच असलें पाहिजे (८२६). नोकरचाकरांशीं, ग्राम्य आणि वन्य जनांशीं, आणि दीनदुःखितांशीं सर्व कुटुंबाचें वर्तन साधें, प्रेमळ आणि नम्र असावें. ( ६६१, ३८६, ४०१-४०२ ). कुटुंबांतल्या स्त्रियांची देखील स्वातंत्र्यसुखाची कल्पना अगदीं जागृत असावयास पाहिजे ( ९५ ३१३ ).

वर सांगितलेल्या सांसारिक प्रेमास खालील उपदेशाप्रमाणें ईश्वर भक्तीचें अधिष्टान मात्र अवश्य असलेंच पाहिजेः—

**दो०-जरउ सो संपति सदनसुख सुहृद मातु पितु भाइ ।**
**सनमुख होत जो रामपद करइ न सहज सहाइ ॥**

( अर्थः--रामचरण सन्मुख होण्यास जे सहज सहायक होत नाहींत ते सर्व जळलेले बेहत्तर, मग ते संपत्ति गृहसुख, सुहृद, मातापिता इत्यादि कोणीहि असोत.)

ह्याच तुळसीदासांचा प्रपंचास परमार्थीकरणाचा योग होय.

## स्त्रीशिक्षण

[ यांतले आंकडे तु. रामायणाच्या आमच्या भाषांतराचीं पानें दर्शवितात. ]

**'नारिधरम पतिदेव न दूजा'** ( पतिव्यतिरिक्त अन्यदेव नसणें हाच मुख्य स्त्रीधर्म ) ( पा. ९५ ). हें तुलसीदासांचें स्त्रीशिक्षणाचें संग्रहवाक्य होय. त्यांची प्रसंगोपात्त सर्व व्याख्या याचेंच भाष्य समजलें पाहिजे.

### व्याख्यान नं० १

सीताअनुसूयाभेट ( ५५४-५५५ )

स्त्रीचे माता, पिता आणि भ्राता हे जरी हितकर्ते होत, तरी त्यांच्या पासून लाभणाऱ्या हितास सीमा आहे. तिचा अमित हितकर्ता फक्त तिचा पतिच होय. त्याची सेवा न करणारी स्त्री अधम समजावी. वृद्ध, रोगग्रस्त, बुद्धिहीन, अंध, बधिर, क्रोधी, अत्यंतदीन, अशा देखील पतीचा अपमान करणाऱ्या स्त्रीस यम-लोकांत नाना यातना भोगणें भाग होतें. स्त्रीस व्रत, धर्म, नियम, वाक्कायमनानें पतिप्रेमच.

पतिपरायण स्त्रियांचे चार प्रकार आहेत ते हेः-[ १ ] **उत्तम**, [ २ ] **मध्यम**, [ ३ ]**निकृष्ट** आणि [ ४ ] **अधम. उत्तम** स्त्रीस स्वपति खेरीज जगांत पुरुषच दिसत नाहीं. **मध्यमेस** परपुरुष, पिता, भ्राता आणि पुत्र यांसारखे दिसतात. **निकृष्ट** स्त्री धर्मास आणि कुलास स्मरून परपुरुषापासून बचावते. **अधम** स्त्री संधि न सांपडल्या कारणानें किंवा जनलज्जेच्या भीतीनें परपुरुषरत होत नाहीं.

पतिवंचक जारिणी स्त्री शेंकडो कल्पपर्यंत रौरव नरकांत पचत राहते. ही जाणीव असून देखील जी स्त्री क्षणैक सुखासाठीं मोहांत फसते तिच्या सारखी भ्रष्टिंग तीच. ती जन्मजन्मांतरीं ऐन तारुण्यांत विधवाच होत राहते.

स्त्री जरी जात्या अपवित्र तरी निष्कपट पतिसेवेनें उत्तम गति मिळविणें तीस सहज आहे. तुळसच पहा, अजून देखील पतिपदसेवेनें ती हरीस परम प्रियच आहे.

## व्याख्यान नं० २

वनगमनोद्यत सीता ( ३४८-३४९ ), वनवासिनी सीता ( ३७३, ४७९, ५७९ )

स्त्रीचें पतिप्रेम असें असावें कीं पतिखेरीज तीस स्वर्ग देखील नरक वाटावा. सासरचें काय आणि माहेरचें काय सर्व गणगोत तिनें पतीच्याच नात्यानें पाहिलें पाहिजे, आणि त्या नात्याविरहित तेंच गणगोत सोळा कळांच्या सूर्याप्रमाणें तीस काळीज जाळणारें भासलें पाहिजे. पतिविरहित स्त्रीस ब्रह्मसृष्टीचें साम्राज्य आणि भोग प्रत्यक्ष रोगाचें जाल, भोगाचा भार आणि दुःखाचा जंजाळ वाटला पाहिजे. प्राणाविण कुडी, जलाविण नदी तशी पतिविण स्त्री असें तिचें तीसच वाटलें पाहिजे. पतिसमागमांत दुःखाचे अनेक पर्वत जरी कोसळले तरी पतिसेवेच्या आनंदांत तीस त्यांचा भास देखील होऊं नये. '**पतिवियोग**' हा शब्द कानीं पडतांच तिची छाती दुभंग झाली तरच तिचें खरें प्रेम समजावें.

## व्याख्यान नं० ३

( निरनिराळ्या ठिकाणच्या वर्णनांचा गोषवारा )

घरांत स्त्रीची वागणूक यजमानीण या जाणीवेनें कदापि नसावी. सासूसासरे, वडील माणसें, यांची मर्जी संभाळून तिनें त्यांच्या आर्जवांत आणि आज्ञेंत असावें ( २७५ ). जरी ती राजैश्वर्यांत असली तरी तें ऐश्वर्य तिच्या पतीचें ( म्हणजे देवाचें किंवा गुरूचें ) समजून तिनें स्वतः सदैव सेवाधर्मानेंच वागत असावें. घरीं नोकरचाकर कसेहि कळवळ्याचे आणि हुशार असले तरी पतिसेवा त्यांजवरच तिनें विसंबतां कामा नये. अगदीं हलक्यांत हलकीं कामें करण्यास तिनें तत्पर असावें [ ८२९ ]. निजकडून तिच्या सुनांचा सांभाळ '**नयन पलक की नाईं**' ( नेत्रांच्या पापण्याप्रमाणें ) या कळवळयानें होत असावा (२९१ ). देव-ब्राह्मण, गुरु-संत, अतिथि-अभ्यागत, दीन-दरिद्री, यांचा सत्कार आणि परामर्श गृहस्त्रियांकडून अधिकारानुसार पत्यनुमोदनानें होत असावा [ २८८, ३६१ ].

## समाजशिक्षण

तुलसीदासांची समाजरचना सनातन वैदिकधर्माच्या तत्वावर उभारलेली आहे:- ( म. भा. पा. ८२६ )

**दो०- बरनाश्रम निज निज धरम निरत बेद पथ लोग।**

म्हणजे जनता आपपल्या वर्णाश्रमाचे वेदविहित धर्म आस्थापूर्वक आचरून असली पाहिजे.

अशा स्वधर्मनिष्ठ समाजांचा ( जनसमूहांचा ) विवेकनिष्ठ पालक आणि पोषक ( म्ह० चालक किंवा नेता ) कोणी तरी एक असावयास पाहिजे असें त्यांचें मत आहे: — ( म. भा. पा. ५३९ )

**दो०- पालइ पोषइ सकल अँग तुलसी सहित विवेक।**

( म्हणजे सर्वच अंगांचें ( घटकांचें ) पालन आणि पोषण विवेकपूर्वक करणारा असा कोणी तरी एक पाहिजे. )

अशा तऱ्हेच्या समाजरचनेनें राजा आणि प्रजा हा संबंध अर्थांतच उत्पन्न झाला.

आतां राजा कसा असावा तें तुलसीदास सांगतात:-( म. भा. पा. ३४ )

**चौ०-साधु सुजान सुसील नृपाला। ईस-अंस-भव परमकृपाला**

राजा भगवदंशधारी असतो. म्हणून तो साधु सुज्ञ, सुशील आणि पराकाष्ठेचा दयावान् असतो.

परंतु अशा राजाची देखील सत्ता लोकमतावलंबीच असली पाहिजे असें तुलसीदासांचें मत दिसतें:- ( म. भा. पा. ३०१ )

**चौ०जौं पंचहि मत लागइ नीका। करहु हरषि हिय रामहिं टीका**

अर्थ:-( दशरथ सुमंतास म्हणतो- ) रामाच्या यौवराज्याभिषेकाची योजना पंचमंडळीस जर संमत असेल तरच ती आनंदानें अमलांत आणावी.

याचें तात्पर्य हें कीं राजाच्या योजनेस पंचांच्या ( ज्यानां पूर्वीं चौधरी म्हणत असत, आणि हल्लीं पुढारी म्हणण्यांत येतें त्यांच्या ) मताचा पाठिंबा असलाच पाहिजे.

पुढें प्रजा आणि पंच यांचें ध्येय कोणतें असावयास पाहिजे तें तुलसीदास सांगतातः- [ म. भा. पा. ४७७ ]

**चौ०-ईति भीति जनु प्रजा दुखारी। त्रिविधताप पीडित ग्रह मारी पाइ सुराज सुदेस सुखारी।**

**अर्थः**- दैवी आणि मानुषी आपत्तींनीं पोळलेलीं आणि त्रिविधताप व ग्रहदशा यांनीं पीडलेली प्रजा सुदेशांतच सुराज्य प्राप्त करील तरच ती सुखी होईल. कारणः--[ म. भा. पा. ६१७ ]

.... .... .... .... । **सुराज खल उद्यम गयउ**

सुराज्यच खलांचे धंदे बुडवूं शकतें,

आणि तसें झालें म्हणजेः- ' **प्रजा बाढ जिमि पाइ सुराजा** '

( म. भा. पा- ६१८ )

आणि ' **सुराज मंगल चहुँ ओरा** ' (म. भा. पा. ४७८)

प्रजा वाढीस लागते आणि सर्वच बाजूंनीं तिची भरभराट होऊं लागते.

एवढ्यावरून **स्वधर्मासाठीं सुदेश आणि सुराज्य** हवे असें तुलसीदासांचें मत आहे हें सिद्ध झालें. परंतु तेवढ्यानेंच ते संतुष्ट नाहींत. त्यांना सुदेशांतलें सुराज्य कसें असावें हें त्यांनीं ह्या रीतीनें दर्शविलें आहेः-

**चौ०-राजा राम जानकी रानी। आनँद अवधि अवध रजधानी सुवस वसउ फिरि सहित समाजा।** [ म. भा. पा. ५०६ ]

**अर्थः**--[ चित्रकूटावर जमलेली अयोध्येची प्रजा आपापल्या उपास्याची प्रार्थना करिते- ) रामच आमचा राजा असावा, जानकीच राणी असावी, आनंदाची सीमा जी अयोध्या तीच त्यांची राजधानी असावी, आणि आह्मां सर्व प्रजाजनांसह त्यांनीं तेथें सुवश [ स्वतंत्र ] असावें.

तुलसीदासांची वरील भावनेची उत्कटता किती आश्चर्यजनक आहे ती खालील वर्णनावरून स्पष्ट होईलः-( म. भा. पा. ५०६-५०७ )

चौ० एहि सुख सुधा सीँचि सब काहू । देव देहु जग जीवन लाहू

दो०-गुरुसमाज भाइन्ह सहित रामराज पुर होउ ।
अछत राम राजा अवध मरिय माँग सब कोउ ॥

चौ०-सुनि सनेहमय पुरजनवानी । निंदहिँ जोग विरति मुनि ज्ञानी
एहि विधि नित्य करम करि पुरजन । रामहिँ करहिँ प्रनाम पुलकितन

अर्थः-ह्या सौख्यामृताच्या सिंचनानें देवानें आह्मां सर्वांसच जगांत जगण्याचा लाभ द्यावा. गुरुजन, प्रजाजन, आणि बंधुजन यांच्यासह अयोध्येंत रामाचेंच राज्य असावें आणि या रामराज्यांतच आह्मांस मरण यावें अशी ईश्वराजवळ सर्व प्रजा प्रार्थना करीत असे. पुरजनांची ती प्रेमळ वाणी ऐकून ज्ञाननिष्ठ मुनी देखील स्वतःच्या योगावर आणि वैराग्यावर धिक्कार घालीत असत. रामाच्या प्रजाजनांचें नित्यकर्म ह्या प्रकारचें होतें. तें सारून मग त्यांनीं रामास अत्यानंदानें नमस्कार करावा.

वरील वर्णनांतून दोन फार ठळक आणि महत्वाचे प्रमेय निष्पन्न होतातः-

( १ ) सुवशतेसाठीं ईश्वरोपासन हेंच तुलसीदासांचें नित्यकर्म दिसतें.

( २ ) [ सुदेशांतल्या सुराज्याच्या ] सुवशतेंत मरणें हाच त्यांच्या मतानें जीविताचा खरा लाभ दिसतो. या लाभाविरहित मोक्षाधिकारप्राप्ति देखील त्यांस तितकी स्पृहणीय वाटत नाहीं.

असो. ग्रंथवर पाहतां तुलसीदासांनीं केवळ स्वधर्मासाठीं सुदेश, सुराज्य आणि सुवशता ही त्रयी निवेदित केली.

आतां अगदीं अखेर एक आणखी तत्व सांगून ते आपलें समाजशिक्षण समाप्त करितात. तें तत्व ह्मणजेः- ( म. भा. पा. ८४४ )

चौ०-जौँ अनीति कछु भाषउँ भाई । तौ मोहि वरजहु भय बिसराई ॥

( अर्थः-[ राम प्रजेस दिलेल्या व्याख्यानांत ह्मणतात- ] मी जर कांहीं अनीतीचें तुह्मास सांगेन तर तुह्मी निर्भय होऊन मला वर्ज करावें.
यांत राजा नीति-विमुख झाला ह्मणजे प्रजेस कोणता हक्क पोंचतो तें त्यांनीं निर्दिष्ट केलें आहे.

पूर्वोक्त विवेचनावरून तुलसीदासांनीं **स्वधर्मासाठीं** त्यांच्या समाजशिक्षण-शास्त्राची जी **चतुःसूत्री** ठरविली ती हीः-

**सुदेश, सुराज्य, सुवशता आणि राजवर्जन.**

स्वधर्मासाठीं असल्याप्रकारचें समाजशिक्षण तुलसीदासांना सुचावें यांत वास्तविक पाहतां मोठेसें आश्चर्य नाहीं. तो अकबर बादशाहाच्या कुटिल राज-नीतीचाच परिणाम होय हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. [कविपरिचय-लेख १, २ व ३ पहा. ]

आजचा मनु ' स्व '-ची तहान ' सु '-नें भागत नसते असें कंठरवानें सांगून तुळसीदासांची वरील **चतुःसूत्री** खालील रूपांतरानें आविष्कृत करितोः-

**स्वराज्य, स्वदेश, स्वातंत्र्य आणि बहिष्कार**

या रूपांतरास आधार ह्मणून तो तुलसीदासांचीं खालील वाक्यें आग्रहानें सरसावितो.

**' सो [भगति] सुतंत्र अवलंब न आना। तेहि आधीन ज्ञान विज्ञाना**

**अर्थः**-भक्ति स्वतंत्र आहे. तीस दुसऱ्या कशाचाहि आधार लागत नाहीं. ज्ञान आणि विज्ञान तिच्या ताब्यांत असतात. [ म. भा. पा. ५६८ ]

**' महावृष्टि चलि फूटि कियारी। जिमि सुतंत्र भयें बिगारहिँ नारी**

**अर्थः**-महावृष्टीनें क्याऱ्या फूटून चालल्या. जसें स्त्री स्वतंत्र झाली कीं ती विघडणारच. [ म. भा. पा. ६१७ ]

**सब नर करहिँ परस्पर प्रीती। चलहिँ सुधर्म निरत श्रुति नीती**

[ व्यंकटेश्वर स्टीम प्रेसचें तु. रामायण आवृत्ति २३ पा. ६०२ ]

अर्थः—सर्वच पुरुष परस्परांवर प्रेम करीत असत. ते स्वधर्मानें वागून वेदाचार निष्ठ असत.

इ० इ० इ०

आह्मांस प्रस्तुतचा काय किंवा पुरातनचा काय दोन्हींहि मनु सारखेच. आमची दृष्टि तुलसीदासांच्या प्रमुख व अढळ अशा फक्त एकाच तत्वावर अनन्य आहे. तें तत्व ह्मणजे स्वधर्म होय. केवळ या स्वधर्मरूप तत्वासाठींच तुलसीदासांना त्यांची चतुःसूत्री हवी आहे. तें तत्व आजच्या मनूंत नष्टप्राय झालेलें असल्यामुळें एकट्या हिंदुस्थानाचेंच काय पण हिंदुस्थानासुद्धां प्रत्यक्ष '**सुरपुरा-**' चें देखील स्वतंत्र स्वराज्य तुलसीदास '**नरकसरिस दुहुँ राजसमाजा**' (दोन्हींहि राज्यांचें वैभव केवळ नरकवत्) लेखतात.

## राजनीति

प्रजाराधक राज्यपद्धतींत '**राजनीति-**' शब्द केवळ राजासच लागूं करणें अशुद्ध आहे; कारण तेथें सर्वच राजकारण प्रजेच्या मतावर अवलंबून असतें. म्हणून राजनीति हा शब्द राज्यपद्धतींच्या अनुरोधानेंच लागूं होणें भाग आहे.

तुलसीदासांच्या मतें राजा आणि प्रजा यांचा संबंध कसा असावा या विषयीं पूर्वीं उल्लेख आलाच आहे. तोच परस्पर संबंध ध्यानांत घेऊन त्यांनीं राजनीतीचें विवेचन केलें आहे.

वास्तविक त्यांची सर्व राजनीति खालील एकाच सूत्रांत आटोपतेः—
[ म. भा. पा. ५३९ ]

**दो०- मुखिया मुखसो चाहिये खान पान कहँ एक ॥**
**पालइ पोषइ सकल अँग तुलसी सहित विवेक ॥**

**चौ०-राजधरम सरवस इतनोई। जिमि मन माँह मनोरथ गोई**

याचा अर्थ असा कीं मुख्यानें मुखाप्रमाणें असावयास पाहिजे. मुख खानपानासाठीं एकटेंच खरें, परंतु तें एकंदर शरीराचें पालन पोषण फार विचारपूर्वक

करीत असतें. राजनीति एकंदरींत ही इतकीच, पण मनोरथ मनामध्यें जसा गुप्त असतो, तशी ती [ राजनीति ] या शब्दांत [ सूत्रांत ] प्रच्छन्न आहे.

वरील सूत्रानें राजनीतीचें हृदय व्यक्त झालें. आतां तिचा बाह्य व्यापार तुलसीदासांनीं कसा काय सांगितला आहे तें पाहूं.

[१] राज्याचा खजीना हेंच त्याचें खरें बल होय. तो अपरिमित असला पाहिजे.

**'दसरथ धन सुनि धनद लजाई'** ( दसरथाचें धन ऐकून कुबेर देखील लाजला. ) [ म. भा पा. ५४५ ]

[२] खजीन्याचा आणि राजाचा संबंध **'चंचरीक जिमि चंपक बागा'** ( चंपक वनांतल्या भ्रमराप्रमाणें–म. भा. पा. ५४५ ) अशा तऱ्हेचा असला पाहिजे.

[३] प्रजाकार्याविषयीं इतकी दक्षता पाहिजे:- ( म. भा. पा. ५४४ )

**ऊँच नीच कारज भल पोचू । आयसु देब न करव सँकोचू**
**परिजन पुरजन प्रजा बुलाये । समाधान करि सुबस बसाये**

याचें तात्पर्य हें की परिजन आणि प्रजा यांना बोलावून त्यांस राजानें सांगितलें पाहिजे कीं उंच, नीच, बरें, वाईट कसेंहि जरी काम असलें तरी तें फरमाविण्यास त्यांनीं संकोचूं नये. अशा रीतीनें त्यांचें समाधान करून त्यांच्या कामकाजाची योग्य व्यवस्था राजाकडून लावण्यांत यावी.

**[४] सचिव सुसेवक ( भरत ) प्रबोधे । निज निज काज पाइ सिख ओधे ॥** [ म. भा. पा. ५५४ ]

ह्मणजे सचिव आणि लहानथोर सरकारी नोकर यांजला त्यांचीं कामें चांगलीं समजावून देण्यांत येऊन त्यांच्या अंमलबजावणीबद्दल राजाकडून योग्य खबरदारी घेण्यांत यावी.

[५] लष्करावर राजाची फार बारकाईची नजर असावी. राजाकडून कवाईतीं वगैरे वारंवार तपासण्यांत याव्या. ( म. भा. पा. ५४६ )

[६] स्वाध्याय, सदाचार आणि गृहशिक्षण यांची जोपासना राजाकडून काळजीपूर्वक करण्यांत यावी. [ म. भा. पा. ८२७, ८३४ ]. ( '**गुरुगृह गये पढन रघुराई**' यावरून रामाला देखील आपला शिक्षणक्रम गुरुगृहीं राहून संपवावा लागला हें सिद्ध आहे )

[७] राज्यांत कलाशिक्षणास चांगलेंच उत्तेजन मिळत गेलें पाहिजे. [ बालकांड अयोध्याकांड आणि उत्तरकांड यांतल्या ठिकठिकाणच्या वर्णनांवरून ही गोष्ट स्पष्ट होते. ]

[८] पाण्याचा पुरवठा, त्याचा निस्तार आणि स्वछता यांजबद्दल राजानें फारच काळजी घेत असावें. [ म. भा. पा. ८३३-८३४ ]

[९] शहरांची रचना, त्यांची स्वछता, शहरांतील वाडे, बगीचे, बाजार, आमराई, झाडांची छाया, पाण्याच्या सोयी वगैरे कामें फार व्यवस्थित रीतीनें करण्यांत यावीं. ( म. भा. पा. ८३१-८३४ )

[१०] शहराबाहेर मैदानें असावींत. हवाखोरीच्या जागा आणि बागबगीचे शहराबाहेर फार स्वच्छ आणि सुंदर असावेत. [ म. भा. पा. ८३४-८३६ ]

[११] हुषार गुप्त हेर राज्यांत अवश्य असले पाहिजेत, परंतु त्यांचें प्रस्थ राजानें मर्यादितच राखलें पाहिजे. [ म. भा. पा. ५०५ ]

इ० इ० इ०

## कर्म आणि उपासना

**वेदविहित कर्मे आणि आचार** यांजवर तुलसीदासजींचा फार भर दिसतो, तरी त्यांचा कर्मठांप्रमाणें कर्मकांडावर जोर असलेला कोठेंहि आढळत नाहीं. त्यांना देशकालोचित नित्यनैमित्तिक कर्मे '**कायेन वाचा**' इत्यादि भागवतधर्माप्रमाणें '**हरिहि समर्पे**' अशी होत राहावीं असा त्यांचा आशय दिसतो.

परंतु **उपासना** मात्र तुलसीदासांचा **आत्मा** आहे असें ह्मणावें लागतें. इतरांची कथाच काय ? लोकशिक्षणासाठीं अवतरलेल्या प्रत्यक्ष रामास देखील त्यांनी **शिवोपासना** दिलेली आहे. ही दीक्षा अध्यात्मांत अथवा वाल्मीकींत

मुळींहि नाहीं. ‘ उपासनेला दृढ चालवावें ’ या समर्थांच्या मताप्रमाणेंच तुलसीदासांचें मत असलेलें स्पष्ट दिसून येतें.

तुलसीदास रामोपासक समजले जातात. आमच्या मतानें ते शिवोपासक होते. ‘ सपनेहुँ साँचेहु मोहि पर जौ हरगौरि पसाउ। तौ फुर होऊ जो कहेउँ सब भाषा भनिति प्रभाउ’ ( म. भा. पा. २२ -शंकरपार्वतींचा प्रसाद जर मजवर स्वप्नांत खरोखरच झाला असेल तर माझ्या या प्राकृत वाणीचा देखील प्रभाव असाच राहील कीं मी जें बोलेन तें सर्व खरेंच होत राहील ) या दोह्यावरून त्यांना शंकरांचा प्रसाद झाला होता हा एक फारच सबळ आधार आमच्या मतास मिळतो. हीच शंकरोपासना त्यांनीं सगळ्या काव्यभर लादलेली आहे. हा देखील तितकाच सबळ आधार धरला पाहिजे.

आपण उपासनेचा जसा सांप्रदायिक अर्थ करतो तसा मात्र त्यांचा नव्हता. त्यांचा अर्थ उपासना म्हणजे ( उप-आसन=समीपवर्तित्व= ) अविरल सेवाधर्म असाच आहे. कालीदासांनीं ‘ स्थितस्थितामुच्चलित प्रयातां ’ या श्लोकांतल्या ‘ छायेव ’ या एकाच शब्दानें जशी सर्व उपासना सांगितली, तशींच तुलसीदासानींहि ‘ भरतहिँ जानि रामपरिछाहीँ ’ यांतल्या ‘ परिछाहीँ ’ या एकाच शब्दानें ती सुचविली आहे. उपासना या शब्दाचा त्यांचा अर्थ तो हाच.

परंतु त्यांच्या उपासनेचा विशेष हा कीं सांप्रदायिक उपासकांना इतर सांप्रदायिक उपासकांचा जसा तिटकारा वाटतो तसा प्रकार त्यांच्या उपासनेचा नाहीं. इतरांप्रमाणें ते उपास्य मूर्तीचे सांप्रदायिक उपासक नाहींत. उपास्यमूर्तीचा आत्मा त्यांचें उपास्य आहे. म्हणून वल्लभादिकांच्या द्वैतदर्शाचे परिणाम त्यांजवर आणि त्यांच्या अनुयायांवर सहसा घडलेले नाहींत.

वल्लभाचार्यांचा उपासना प्रकार मात्र त्यांना फार आवडता दिसतो. हें ‘ मंगलभवन अमंगलहारी। द्रवउँ सो दसरथ अजिर-विहारी ,( मंगलभवन, अमंगलहारी असा जो दशरथअजिरविहारी राम तो मजविषयीं दयार्द्र असो ) या रामचरितमानसाच्या मंगलावरून स्पष्ट आहे.

मात्र त्यांच्या कर्माचें आणि उपासनेचें रहस्य पाहूं गेल्यास तें जवळ जवळ हें असेंच दिसेलः-

'स ईश्वरोऽनिर्वचनीयः प्रेमस्वरूपः' (नारदभक्तिसूत्र),

किंवा

'God ! thou art love ! I build my faith on that.'

Browning.

## वेदान्तमत

'यत्सत्वादमृषेव भातिसकलं रज्जौ यथाऽहेर्भ्रमः' (म. भा. पा. २)

'एक अनीह अरूप अनामा। अज सच्चिदानंद परधामा
व्यापक विस्वरूप भगवाना। तेहि धरि देह चरित कृत नाना'

अर्थः-एक, अनीह, अरूप, अनाम, अज, सच्चिदानंद, परंधाम, व्यापक, विश्वरुप, असा जो भगवान् त्यानेंच देह धरून नाना चरित्रें केलीं आहेत. [म. भा. पा. १८)

'झूठउ सत्य जाहि विनु जाने। जिमि भुजंग विनु रजु पहिचाने
जेहि जाने जग जाइ हेराई। जागे जथा सपन भ्रम जाई'

अर्थः-रज्जूला न ओळखून तो जसा सर्प भासतो त्याप्रमाणें ज्यास न जाणल्यामुळें असत्यच सत्य भासते, आणि ज्याचें ज्ञान झालें असतां जगच नाहीं-सें होतें—उदाहरणार्थ, जागृति आली ह्मणजे स्वप्नभ्रम नष्ट होतोः-(म. भा. पा. १०३)

'मुधा भेद जद्यपि कृत माया। (म. भा. पा- ८७१)

मायेनें केलेलें भेद जरी खोटे आहेत

'सोहमस्मि इति वृत्ति अखंडा। दीपसिखा सोइ परम प्रचंडा
आतम-अनुभव-सुख सुप्रकासा। तब भवमूल भेदभ्रम नासा

**अर्थः**--अहंब्रह्मास्मि अशी जी अखंड वृत्ति तीच त्या (विज्ञानमय) दीपाची परम तेजस्वी जोत असून ती जेव्हां ब्रह्मानुभवसुखाचा लख्ख प्रकाश पाडील, तेव्हां संसारास कारणीभूत अहंममादि भेदभ्रमांचें निर्मूलन होईल. [ म. भा. पा. ९१२ )

'जड चेतनहिँ ग्रंथि परिगई। जदपि मृषा छूटत कठिनई
तबते जीव भयउ संसारी। छूट न ग्रंथि न होइ सुखारी'

**अर्थः**--जडचेतनांची ही गांठ पडली आहे. ती जरी मिथ्या आहे तरी ती उलगडण्यास अवघड आहे. ही गांठ पडली तेव्हां पासूनच हा जीव संसारी बनला. ती गांठ सुटत नाहीं आणि हा जीव सुखी होत नाहीं. [ म. भा. पा. ९१० ]

वरील उताऱ्यांत जीवब्रह्मैक्य व मायावाद यांचा स्पष्ट उल्लेख केलेला असल्यामुळें वेदान्तदर्शनांत तुलसीदास श्रीशंकराचार्योंचेच अनुयायी होते हें स्पष्ट दिसतें. पण त्यांचा ओढा ज्ञानमार्गाकडे जास्त दिसत नाहीं. स्वतःच्या आवडीनें ह्मणा किंवा देश-काल-स्थितीस अनुलक्षून ह्मणा रामचरितमानसांत त्यांनीं ज्ञानापेक्षां भक्तिलाच प्राधान्य दिलें आहे.

रामानुज किंवा वल्लभ यांचा द्वैतसांप्रदाय तुलसीदासांना जरी इष्ट नसला तरी ज्ञानसाधनप्रकार मात्र त्यानीं वल्लभांचाच घेतलेला आहे हें खालील प्रमाणावरून स्पष्ट दिसतेंः-

दो०-करम बचन मन छाँडि छल जब लगि जन न तुह्मार
तब लगि सुख सपनेहुँ नहिँ किये कोटि उपचार॥

**अर्थः**--कायावाचामनानें कपटाचें निमूर्लन करून प्राणि जावत्कालपर्यंत आपला ( रामाचा ) सेवक होत नाहीं तावत्कालपर्यंत कोट्यवधि साधनें करून देखील सुख ह्मणून त्यास स्वप्नांतहि दुर्लभच असणार. [ म. भा. पा. ३८१ )

दो०-सेवक सेव्य भाव बिनु भव न तरिय उरगारि
भजहु रामपदपंकज अस सिद्धांत बिचारि॥

अर्थः—गरुडा ! सेव्यसेवकभावाखेरीज भवसागर तरला जावयाचा नाहीं. या सिद्धांताचा विचार करून रामपदपंकजाचेंच भजन करीत असावें. ( म. भा. पा. ९१४ )

तरी पण वल्लभांचा शिवविष्णुभेद मात्र तुलसीदासांस मान्य नाहीं. ( लंकाकांडाचें समालोचनेंत सेतुबंधरामेश्वरवर्णन सदर (२) पहा. )

**तात्पर्य, गीतेचा निष्कामकर्मयोग, शंकराचार्यांचा ज्ञानयोग, आणि रामानुजस्वामी व वल्लभाचार्य यांचा भक्तियोग या तीन योगांच्या संयोगानें संगतवार तयार झालेला तुलसीदासांचा हा दार्शनिकयोग एक अपूर्व तीर्थराज निर्माण झाला आहे.**

त्यांच्या या योगाचा परिणाम मात्र फार शुद्ध झाला. त्यांच्या अनुयायांना त्यामुळें कोणताहि एक निराळा सांप्रदाय काढतां आला नाहीं, आणि परस्परांच्या द्वेषांत भर घालण्यास अवसर मिळाला नाहीं. यावरून लोकशिक्षणाच्या तत्वाची जोपासना त्यांजकडून किती काळजीपूर्वक झाली ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे.

आतां सांगावयाचें तें हें कीं कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग यांचा समुच्चयात्मक योग असणें अशक्य आहे अशी शंका करण्याचें कोणासहि कारण नाहीं. या समुच्चयासच **'पराभक्ति' 'ज्ञानोत्तरभक्ति' 'चौथी भक्ति'** हीं नांवें आहेत. **अद्वैतसिद्धांताचे पुरस्कर्ते आद्यशंकराचार्य** यांनीं देखील अगदीं अखेर याच योगाचें अवलंबन खालील प्रमाणें केलें आहेः-

**सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।**
**सामुद्रोहि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारंगः ॥**

त्यांच्याच पाउलावर पाउल ठेऊन **अद्वैतसिद्धिकर्ते श्रीमधुसूदनसरस्वति** देखील खालील प्रमाणेंच गेले आहेतः-

**'ध्यानाभ्याससमाहितेन मनसा यन्निर्गुणं निष्क्रियं ।**
**ज्योतिः किंचन योगिनो यदि परं पश्यंति पश्यंतु ते ॥**
**अस्माकं तु तदेव लोचनचमत्काराय भूयाच्चिरं ।**

कालिंदीपुलिनेषु यत्किमपि तन्नीलं महो धावति ॥

आणि हाच मार्ग तुलसीदासांनींहि या रीतीनें स्वीकारला आहे:-( म. भा. पा. ५६३ )

**चौ०-जे जानहिँ ते जानहु स्वामी । सगुन अगुन उर अंतरजामी**
**जो कोसलपति राजिवनैना । करउ सो राम हृदय मम ऐना**

अर्थः- हे हृदयांतरवासी प्रभो ! तुझें सगुण व निर्गुण स्वरूप जे जाणत असतील ते जाणोत, परंतु हें जें तुझें कमलनयन अयोध्याधीशरामरूप तेंच मात्र माझ्या हृदयांत निवास करो.

वरील प्रकार **विचारपरिवर्तनाचा** वाटणें संभवनीय आहे. परंतु तशांतलें मुळींच कांहीं नाहीं. तो **साधनपरिपाक** होय. **सगुणांतून** ( म्हणजे **कर्म** आणि **उपासना** यांतून ) **निर्गुण** ( म्हणजे **ज्ञान** ), आणि फिरून **निर्गुणांतून सगुण** ( म्हणजे **भक्ति** ), असा साधनपरिपाकाचा क्रम आहे.हीच पुर्णावस्था होय. इलाच **ज्ञानोत्तरा भक्ति** म्हणतात. ज्ञानाचा परिपाक भक्तींत होणें हेंच ज्ञानाचें खरें फळ. **श्रीशंकरांची रामभक्ति** ह्याच प्रकारची होय. **अद्वैतभक्ति** ती हीच. ही फारच दुष्प्राप्य असते. म्हणूनच सर्व अध्यात्मिक वाङ्मयांत इची महती गाइलेली आढळते. तुलसीदास देखील असेंच म्हणतातः- ( म. भा. पा. ९१० )

**अस विचारि जे मुनि विज्ञानी । जाचहिँ भगति सकल सुखखानी**

अर्थः-या विचारानेंच **आत्मानुभवी मुनी** देखील सर्व सुखांची खाण अशा भक्तीचीच परमेश्वराजवळ याचना करितात.

कारण–[ म. भा. पा. ९०८ )

**जे असि भगति जानि परिहरहीँ । केवल ज्ञानहेतु स्रम करहीँ**
**ते जड कामधेनु गृह त्यागी । खोजत आक फिरहिँ पय लागी**

अर्थः-भक्तीची अशी महती जाणून देखील जे तिला झुगारतात आणि

केवळ ज्ञानासाठींच धडपडतात ते घरीं चालत आलेल्या कामधेनूस हांकून लावून दुधासाठीं रुई शोधत भटकणारासारखेच मूर्ख होत.

भागवत देखील असेंच ह्मणतें:-

श्रेयःस्रुतिं भक्तिमुदस्य ते विभो क्लिश्यंति ये केवल-बोध-लब्धये ।
तेषामसौ क्लेशल एव शिष्यते नान्यद्यथा स्थूलतुषावघातिनाम् ॥
भाग. स्कं. १०, अ. १४, श्लो. ४

## भक्ति

तुलसीदासांचें जीवनसर्वस्व केवळ एक हरिभक्तिच आहे. त्यांच्या मनांत कोणत्याहि विचाराचा संचार झाला तरी भक्तीचें बीज त्यांत असल्या खेरीज रहावयाचेंच नाहीं. विनोद, शोक, शृंगार, युद्ध, वगैरे कशांतहि त्यांचें मन गुंतलें असलें तरी तें भक्ति सोडीत नाहीं आणि भक्ति त्यास सोडीत नाहीं. भक्तीचें आणि त्याचें इतकें तादात्म्य झालें आहे.

तुलसीरामायणांत भक्तीची व्याख्या तुलसीदासांनीं केलेली कोठेंहि आढळत नाहीं. ग्रंथाच्या एकंदर वळणावरून **अनन्य, अहेतुक, अविरल** आणि **आविचल ईशप्रेमासच** त्यांनीं भक्ति म्हटलेलें दिसतें.

'**पुज्येष्वनुरागः भक्तिः**' ही **नारदभक्तिसूत्रांतली** भक्तिशद्बाची व्याख्या तुलसीदासांनीं घेतली आहे असें विधान करून '**पूजनीय प्रिय परम जहाँते । सब मानिअहि रामके नाते**' [ पूज्य, प्रिय आणि श्रेष्ठ हे सर्व रामाच्याच नात्यानें लेखले जावेत:–म. भा. पा. ३५६. ] ही उक्ति त्या विधानास प्रमाण म्हणून दाखविण्यांत येते. हा उपन्यास समाधानकारक वाटत नाहीं. '**पूजनीय प्रिय**' इ० उक्तींत '**पूज्येषु**' इ० व्याख्येचा अंतर्भाव होउं शकतो, परंतु ती उक्ति व्याख्या होऊं शकत नाहीं. ती उक्ति '**मातृदेवो भव**', '**पितृदेवो भव**' इ० श्रुतिवाक्यांच्या धर्तीवर आहे हें स्पष्टच दिसतें. हीं वाक्यें जशी व्याख्या म्हणवूं शकत नाहींत तशीच वरील उक्तिहि व्याख्या म्हणवूं शकत नाहीं. आमच्या मतानें वरील उक्ति ह्या श्रुतिवाक्याप्रमाणें केवळ **साधन मार्गदर्शकच** समजली पाहिजे.

'पूजनीय प्रिय' इ० उक्ति **साधनमार्गदर्शक** कशी तें आतां येथेंच सांगून टाकलेलें बरें, कारण त्यांतून एक अत्यंत महत्वाचें पारमार्थिक प्रमेय निष्पन्न होणार आहे–थोडें विषयांतर झालें तरी मोठीशी हरकत नाहीं. पूज्य, प्रिय आणि श्रेष्ठ हीं सर्व नातीं **प्रावृत्तिक** ( प्रापंचिक किंवा व्यावहारिक ) गणलीं जातात. म्हणून तद्विषयक प्रेमादर **प्रावृत्तिकच** म्हणविला जातो. या प्रेमादराचा परिपाक **'यांति देवव्रता देवान् पितृन् यांति पितृव्रताः'** या गीतावाक्यानुसारच व्हावयाचा. त्यास **नैवृत्तिक** म्हणजे **पारमार्थिक** स्वरूप तेवढ्यानेंच यावयाचें नाहीं. त्यास पारमार्थिकत्व आणावयाचें झालें तर त्याचें प्रापंचिकत्व झाडून टाकलें पाहिजे. औषधीस जसें अनुपान किंवा धातूस जसा उपसर्ग अशांतलाच हा साधन प्रयोग आहे. **'सब मानिअहि रामके नाते'** हा तो प्रयोग होय. याचा भाव हा कीं प्रापंचिक प्रेम जर रामाच्या ( किंवा गुरूच्या) नात्यानें मानण्यांत आलें तर गीतावाक्याप्रमाणें **'यांति मद्याजिनोपि माम्'** येथवर त्याचा परिपाक होऊं शकतो. **सारांश प्रपंच हरिप्रेममूलक झाला कीं तोच परमार्थ होतो.** साधनमार्गदर्शक म्हणण्याचें याथार्थ्य आतां वाचक पाहून घेतीलच.

असो. तुलसीदासांनीं भक्तीची स्वतंत्र अशी व्याख्या केली नाहीं एवढ्यानें त्यांच्या ग्रंथास कांहीं वैगुण्य येतें असें मात्र कोणासहि म्हणतां येणार नाहीं. मुख्य भक्तिसंबंधानें जेवढें म्हणून समजावयास पाहिजे तेवढें त्यांनीं सांगितलेलें असलें म्हणजे झालें—मग त्यांनीं भक्तीची व्याख्या केली काय आणि न केली काय, दोन्हीहि सारखेच. आपणास मुख्यतः ( १ ) **भक्तीचें तात्विक स्वरूप**, ( २ ) **तिची उपयुक्तता**, आणि ( ३ ) **तिचीं साधनें** यासंबंधानें त्यांचीं मतें कशींकाय आहेत तीं समजलीं म्हणजे झालें. तींच आतां आपण पाहूं.

## ( १ ) भक्तितत्व

आमच्या मतानें भागवतांतल्या भक्तीचें तत्व तुलसीदासांनीं रामायणांत घेतलें आहे. म्हणून भागवतांतल्या भक्तीचें शुद्ध स्वरूप येथें प्रथम स्पष्ट केलें पाहिजे.

( भाग. स्कं. ७ अ. १० )

भगवान् श्रीनृसिंहानें प्रऱ्हादास वर माग ह्मटलें त्यावर प्रऱ्हादानें खालील भाषण केलें आहेः —( भाग. स्कं. ७ अ. १० )

यस्त आशिष आशास्ते न स भृत्यः स वै वणिक् ॥ ४ ॥
आशासानो न वै भृत्यः स्वामिन्याशिष आत्मनः ।
न स्वामी भृत्यतः स्वाम्यमिच्छन्यो राति चाशिषः ॥ ५ ॥
अहं त्वकामस्त्वद्भक्तस्त्वंच स्वाम्यनपाश्रयः ।
नान्यथेहावयोरर्थो राजसेवकयोरिव ॥ ६ ॥
यदि रासीश मे कामान्वरांस्त्वं वरदर्षभ ।
कामानां हृद्यसंरोहं भवतस्तु वृणे वरम् ॥ ७ ॥

**सारांशः**–जो तुजपासून वैभवाची (वररूपानें) आशा धरितो तो भृत्यच नव्हे, तो वाणी(व्यवहारी) होय. आपल्या स्वामीच्या वरांची (कृपेची) इच्छा करणारा तो भृत्यच नव्हे, आणि भृत्यांवर आपलें स्वामित्व स्थापित करण्याच्या इच्छेनें सेवकास वैभव देऊं इच्छिणारा तो स्वामीहि पण नव्हे. मी तुझा निष्काम भक्त आहे, आणि तूं माझा निष्काम स्वामी आहेस. राजा आणि राजसेवक यांचा संबंध जसा अर्थापेक्षी असतो तसा तुझा आणि माझा सेव्यसेवकभाव नसला पाहिजे. हे वरदश्रेष्ठा देवा ! जर मला तूं कामपूरक वर देणारच असशील तर मी तुजपासून हाच वर मागतों कीं माझ्या चित्तांत कोणतीहि वासना अंकुरित होऊं नये.

वरील उक्तीचें हृदय आमच्या दृष्टीनें '**अहं त्वकामस्त्वद्भक्तस्त्वंच स्वाम्यनपाश्रयः**' या श्लोकार्धांत सांठलेलें आहे. '**अहं त्वकामस्त्वद्भक्तः**' या पादावरून स्वामीभक्तिखेरीज अन्य कोणतीहि अपेक्षा सेवकास स्वामीपासून नसावी. ह्मणजे **निरपेक्षता** हाच मुख्य सेवकाचा धर्म होय. स्वामीची कृपा किंवा अवकृपा या दोहोंचीहि सेवकास पर्वा नसावी. त्याचप्रमाणें स्वामी देखील सेवकावर **निरपेक्ष** प्रेम करणाराच असावा. '**अनपाश्रयः**' या शब्दाप्रमाणें सेवकाच्या सेवेची देखाल स्वामीनें मनांत इच्छा धरूं नये. अर्थात् याचा अर्थ हाच झाला कीं स्वामी आणि सेवक हे दोघेहि पूर्ण **स्वावलंबी** राहून एकमेकांवर फक्त **निःस्वार्थप्रेमच** करणारे असले पाहिजेत.

वरील स्वामिसेवकसंबंध आणि त्यांचा परस्परांविषयीं निःस्वार्थ प्रेमाविष्कार पूर्ण स्वावलंबन राखून होत असणें सर्वथैव अशक्य कोटींतलें आहे असें वाटणें अगदीं स्वाभाविक आहे, कारण **परस्परानुबंधि** असें या स्वामिसेवकांत स्पष्ट कांहींच दिसत नाहीं. परंतु असा स्वामिसेवकभाव खात्रीनें शक्य आहे, कारण या सेव्यसेवकांत एक विलक्षण **सामान्यधर्म** असतो आणि त्याचाच त्यांच्या परस्परव्यवहारावर जबरदस्त पगडा असतो. हा सामान्यधर्म म्हणजे त्यांची परस्परांविषयीं **कृतज्ञताबुद्धि** होय. या **कृतज्ञतेमुळेंच** सेव्यसेवक **सहृदय ( समरस )** बनून जातात. खालील श्लोकांवरून ही गोष्ट सप्रमाण सिद्ध होतेः—

( भाग. स्क. ९ अ. ४ )

**अहं भक्तपराधीनो ह्यस्वतंत्र इव द्विज ।**
**साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः ॥ ६३ ॥**
**नाहमात्मानमाशासे मद्भक्तैः साधुभिर्विना**
**श्रियं चात्यंतिकीं ब्रम्हन् येषां गतिरहं परा ॥ ६४ ॥**
**ये दारागारपुत्राप्तान् प्राणान्वित्तमिमंपरम् ।**
**हित्वा माम् शरणं याताः कथं तांस्त्यक्तुमुत्सहे ॥ ६५ ॥**

वरील श्लोकांतल्या **'अहं भक्तपराधीनः'** आणि **'कथं तांस्त्यक्तुमुत्सहे'** यांत **सेव्याची कृतज्ञता** व्यक्त होते, आणि **'येषां गतिरहं परा'** आणि **'ये दारागार'** इ० यांत **सेवकाची कृतज्ञता** व्यक्त होते.

वरील भक्तिरहस्य तुलसीदासांनीं त्यांच्या रामायणांत खालील वर्णनद्वारा निर्दिष्ट केलें आहेः—

## सेवकाचें नैरपेक्ष्य

प्रयागराजक्षेत्रास भरताची विज्ञप्ति—( म. भा. पा. ४५३ )

**चौ०-जानहु राम कुटिल करि मोही। लोग कहउ गुरु साहिब-द्रोही**
**सीतारामचरन रति मोरे। अनुदिन बढउ अनुग्रह तोरे**
**जलद जनम भरि सुरति बिसारे। जाचत जल पबि पाहन डारे**

चातक रटनि घटे घटि जाई। बढे प्रेम सब भाँति भलाई
कनकहि बान चढइ जिमि दाहे। तिमि प्रियतमपद नेम निबाहे

( अर्थः-प्रत्यक्ष रामांनीं देखील हवें तर मला कुटिल ठरवावें. जनानें खुशाल मला गुरुद्रोही आणि स्वामीद्रोही समजावें. मात्र सीतारामचरणीं माझें प्रेम अनुदिन वर्धिष्णु राहिलें म्हणजे झालें. तुझी मजवर कृपा ही एवढीच व्हावी. मेघास चातकाची जरी जन्मभर विस्मृति झाली, आणि जलाची याचना चातक करीत असतां त्याजवर तो ( मेघ ) जरी वज्रपाषाणांची एकसारखी धार धरूं लागला, तरी क्षीणायु चातकाची ओरड ज्या मानानें क्षीण होत जाऊन अगदीं नष्ट होते त्याच मानानें त्याचें मेघावरील प्रेम वर्धमान असतें. चातकाची सर्व प्रकारें श्रेष्ठता ती हीच. सोनें अग्निपुटानें वाणासच चढतें. यांच्याप्रमाणेंच तूं माझ्या जिवलगांच्या चरणांचें माझें प्रेम निभवून दे. )

हें वर्णन ज्या मानानें सेवकाचें **नैरपेक्ष्य** दाखवितें त्याच मानानें तें सेवकाची **अनन्यता, अहेतुकता** आणि **अविरल व अविचल स्निग्धता** दाखवितें हा या वर्णनाचा **विशेष** विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे.

## सेव्याचें नैरपेक्ष्य

सुतीक्ष्णाची रामास वरयाचना--

[ म॰ मा. पा. ५६४ ]

**दो०-अनुज जानकी सहित प्रभु चापबाणधर राम।**
**मम हियगगन इंदु इव बसहु सदा निःकाम॥**

[ **अर्थः**-हे प्रभो ! सीतालक्ष्मणांसह चापबाणधर अशा याच रामरूपानें माझ्या हृदयाकाशांत चंद्राप्रमाणें आपण वास्तव्य करावें, आणि अखंड **निष्काम** असावें. )

## सेव्यसेवकांची परस्परांबद्दल कृतज्ञता

रामभरद्वाज संवाद—

[ म. भा. पा. ३८१ ]

भरद्वाज म्हणतात:-

दो०-करम वचन मन छाँडि छल जव लगि जन न तुम्हार।
तव लगि सुख सपनेहुँ नहिँ ।किये कोटि उपचार॥

अर्थः-कायावाचामनोनें कपटाचें निर्मूलन करून जीव जावत्कालपर्यंत आपला ( रामाचा ) सेवक होत नाहीं तावत्कालपर्यंत कोट्यवधि साधनें करून देखील सुख म्हणून त्यास स्वप्नांत देखील दुर्लभ होय.

राम म्हणतात:-

चौ०—सो वड सो सव गुनगनगेहू। जेहि मुनीस तुम्ह आदर देहू

अर्थः—मुनीश्वरा! आपण ज्याचा अंगीकार कराल तोच सर्वश्रेष्ठ आणि अखिलगुणभांडार होय.

हीं भाषणें झाल्यावर ( ' मुनि रघुवीर परस्पर नवहीँ । वचन अगोचर सुख अनुभवहीँ '॥ ) देव आणि भक्त परस्परांचें देवतार्चन वनले आणि ' यतो वाचो निवर्तते ' अशा परमानंदांत निमग्न झाले.

वरील व्याख्यानाचें तात्पर्य हें कीं भजक भज्याशीं जेव्हां कृतज्ञताबुद्धीनें संमीलित असतो, आणि त्याच्या प्रेमाचा ओघ भज्याकडेस अविरल, अचल. आणि अनन्य असतो तेव्हांच त्याच्या त्या प्रेमास भक्ति ही संज्ञा प्राप्त होते, आणि अशा या त्याच्या भक्तीचा परिणाम भज्यास देखील भजकगुणविशिष्ठ वनविण्यांत होतो. तुलसीदासांच्या भक्तीचें तात्विक स्वरूप ( ह्मणजे हृदय ) हें असें आहे.

## ( २ ) भक्तीची उपयुक्तता

भक्ति या शद्वानेंच भज्यभजकभाव आणि भज्याची श्रेष्ठता व भजकाची कनिष्ठता व्यक्त होते. या श्रेष्ठकनिष्ठत्वाच्या जाणीवेचा उत्कर्ष भजकामध्यें ज्या मानानें होत जाईल त्या मानानें त्याच्या अहंकाराचा अपकर्ष

होत राहील. भक्तीचा मुख्य प्रभाव तो हाचः कर्म, ज्ञान, वगैरे साधनांनीं जीवाच्या अहंकारावर घाव न बसता उलट त्यांपासून त्याच्या अहंकाराच्या वृद्धीचाच संभव जास्त असतो. भक्ति मूळापासूनच अहंकार गिळत जाते. ' मूले कुठारः ' असा परिणाम भक्तीपरतां इतर कोणत्याहि साधनानें होत नाहीं.

तुलसीदास वरील मत खालील प्रमाणें निर्दिष्ट करितातः—

छूटइ मलकि मलहिके धोये । घृत कि पाव कोउ वारि विलोये
प्रेम भगति जल बिनु रघुराई । अभ्यंतर मल कबहुँ कि जाई

म्हणजे घाणेरड्या पाण्यानें घाण जशी निघूं शकत नाहीं, किंवा नुसतें पाणीच घुसळून लोणी मिळविणें जसें कोणासहि शक्य नाहीं, तद्वतच मानसिक मल ( म्हणजे अहंकार ) प्रेमभक्तिरूप जलाखेरीज कदाकाळीं देखील धुतला जावयाचा नाहीं.

भागवत तेंच मत खालील प्रमाणें प्रख्यापित करितेः—

न तथा ह्यघवान् राजन् पूयेत तपआदिभिः ।
यथा कृष्णार्पितप्राणस्तत्पूरुषनिषेवया ॥
( भाग. स्कं. ६ अ. १ श्लोक. १६ )

न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।
न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥
[ भाग. स्कं. ११ अ. १४ श्लो. २० )

भगवद्गीता देखील वरील मतासच दुजोरा देतेः—

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥
[ भ. गी. अ. ९ श्लोक. २५ ]

वरील प्रमाणांवरून भक्तीचा आरंभापासूनच अहंकारनिर्दलनपटुत्वरूप अनितरसाधारण विशेष सिद्ध झाला.

( भ. गी. अ. ९ श्लो. ३१ )

भगवद्गीतेनें वरील मत देऊन त्यास खालील मताचीहि जोड दिली आहे:-

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥**

'**क्षिप्रं भवति धर्मात्मा**' आणि '**शश्वच्छांतिं निगच्छति**' या दोन पादांनीं अनुक्रमानें भक्तींचें **क्षिप्रसिद्धिप्रदायित्व** [ म्हणजे **अल्पायासकरत्व** ] आणि **भूरिप्रदत्व** सिद्ध होतात. '**न मे भक्तः प्रणश्यति**, या अंतिम पादाचें तात्पर्य हें कीं अन्य साधनांत जी च्युतीची भीति आहे ती भक्तींत मुळींच नाहीं, आणि म्हणूनच इतर योगांत जो हानींचा संभव आहे तो भक्तियोगांत कदापिहि नाहीं. एकंदरींत **क्षिप्रसिद्धिप्रदायित्व** ( किंवा ) **अल्पायासकरत्व**, **भूरिप्रदत्व** आणि **साधनच्युतिहीनत्व** असे **तीन विशेष** वरील श्लोकांत भगवान् श्रीकृष्णांनीं प्रतिपादिले आहेत.

वरील तीन विशेष तुलसीदासांनींहि तीन पृथक् प्रसंगांनीं दिले आहेत. ते प्रसंग असे:-

**( १ ) अल्पायासकरत्वः**- ( म. भा. पा. ९१४ )

राम लक्ष्मणास ज्ञानोपदेश करतांना सांगतात—

**जातें बेगि द्रवउँ मैं भाई। सो मम भगति भगतसुखदाई**

म्हणजे जेणेंकरून ईश्वर **त्वरित** कृपा करितात ती भक्तसुखदायिनी अशी माझी भक्तिच होय.

**( २ ) भूरिप्रदत्वः**- [ म. भा. पा. ९१४ ]

काकभुशुंडि गरुडास सांगतातः-

**भगति करत बिनु जतन प्रयासा। संसृतिमूल अबिद्यानासा**

म्हणजे भक्ति केल्यानें **त्रास आणि आयास न होतां** जन्म मरण कारण जी अविद्या तिचा नाश होतो.

(३) साधनच्युतिहीनत्वः– [ म. भा पा. ५११ ]

जनक स्वपत्नीस भरताबद्दल सांगतातः–

**साधन सिद्धि रामपग-नेहू। मोहिँ लखि परत भरत मत एहू**

म्हणजे भरतास **साधन** आणि **सिद्धि** दोन्हीहि **रामपद्प्रेमच** होत. '**कैवल्यसंमतपथस्त्वथ भक्तियोगः**' या भागवतीय श्लोकावरील टीकेंत **श्रीधरस्वामींनीं** देखील असेंच व्याख्यान केलें आहे. **अर्थात भक्तींत साधन आणि सिद्धि दोन्हीहि एकच झालेले असतात.** यावरून जेवढें साधन घडलें तेवढीच सिद्धि हातांत आली आणि जेवढी भक्ति लाभली तितका तो एक अविचल संस्कारच होऊन बसला. म्हणजे अर्थातच **साधनच्युति** हा प्रश्नच उरत नाहीं.

इतर संतांप्रमाणें तुलसीदासांनाहि भक्तीचा आणखी एक खालील विशेष कबूल आहे. तो विशेष **अन्यसाधननैरपेक्षत्व** होय. त्यांनीं तो असा दिलेला आहेः– ( म. भा. पा. ५६८ )

**सो ( भगति ) सुतंत्र अवलंब न आना। तेहि आधीन ज्ञान विज्ञाना**

म्हणजे भक्ति ही स्वतंत्र आहे. ती इतर कशयावरहि अवलंबून नाहीं. ज्ञान आणि विज्ञान देखील तिच्या तंत्रांत असतात. '**केचित् केवलया भक्त्या**' ( भागवत ), '**ईश्वरप्रणिधानाद्वा**' ( योगसूत्र ) इ. याच मतास पुष्टि देतात.

येथवर भक्तीचे **मुख्य मुख्य विशेष** आपणास मिळाले ते हेः–

**अहंकारनिर्दलनपटुत्व** ( अहंकाराचा वीमोड करण्यास रामबाण )
**अल्पायासकरत्व** ( श्रम वांचविणारा )
**भूरिप्रदत्व** [ काळ आणि श्रम यांच्या मानानें अत्यंतच फायदेशीर ]
**साधनच्युतिहीनत्व** [ साधनभ्रष्टतेच्या भीतीपासून मुक्त ]
**अन्यसाधननैरपेक्षत्व** [ पूर्ण स्वतंत्र )

**भक्ति ही एवंगुणविशिष्ट असल्याकारणानें तिची अनितर साधारण उपयुक्तता अर्थातचसा द्धझाली.-**

## ३ भक्तीची साधनें.

तुलसीदासांच्या मतानें भक्तीच्या प्राप्तीची साधनें मुख्य तीन दिसतात तीं हीं:—

**(१) प्रथमहिं विप्रचरन अति प्रीती।** [पहिलें साधन म्हणजे विप्रपदीं अतिशय प्रेम असणें–म. भा. पा. ५६८ ]

**(२) संकर-भजन विना नर भगति न पावइ मोर।** (शंकरांच्या भक्तीखेरीज रामभक्ति प्राप्त होत नसते–म. भा. पा. ८४६ ]

**(३)... जोइ कर सतसंगा। रामभगति तेहि सुलभ विंहगा।** [ जो सत्संग करील त्यालाच रामभक्ति सुलभ होते– म. भा. पा. ९१५ ]

**(४) नाम सप्रेम जपत अनयासा। भगत होहिं मुद मंगल वासा॥** (राम-नामाचा सप्रेम जप जापकास भक्त करून त्यास मोद आणि मंगल यांत रुळत ठेवितो.–म. भा. पा. ३० )

एकंदरींत **विप्रचरणसेवन, शंकरोपासन, सत्संग** आणि **रामनामजप** या चार साधनांवर भक्तीच्या प्राप्तीसाठीं तुलसीदासांचा विशेष भर आहे.

बहुतेक सर्वच संतांनीं आणि ग्रंथांनीं ह्या साधनापैकीं पहिल्यास, तिसऱ्यास आणि चवथ्यास सारखेंच महत्व दिलें आहे. तुलसीदासांचें मतवैचित्र्य त्यांत कांहींच नसल्यामुळें त्या संबंधानें जास्त पाल्हाळ करण्याची गरज नाहीं.

फक्त शिवोपासनेचाच थोडा विचार आहे. या मतासंबंधानें तुलसीदास देखील इतर अभेदभक्ति शिकविणाऱ्या संताप्रमाणें भागवताच्याच कासेस लागले आहेत. ‘ **वैष्णवानां यथा शंभुः** ’ असें भागवत म्हणतें. या उक्तीस प्राधान्य देऊन आणि शैववैष्णवांचा परस्परांविषयीं दुराग्रह लक्षांत घेऊन त्यांनीं जें या साधनास वैशिष्ट्य दिलें तें अगदीं योग्य केलें. कारण भेदास आणि द्वेषास आळा घालणें हा त्यांच्या कालांत त्यांच्या लोकशिक्षणाच्या कार्यक्षेत्रांतला एक अगदीं प्रमुख भाग होता.

---

# भूमिका परिचय

रामचरितमानसांतल्या [ तुलसीरामायणांतल्या ] परिचयास योग्य अशा भूमिका खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

(१) दशरथ, (२) कौसल्या, (३) कैकयी, [४] भरत, (५) राम, (६) सुमित्रा, (७) सीता-लक्ष्मण, (८) जनकवसिष्ठ, (९) मारुति, (१०) गुह-अगंद- सुग्रीव-विभीषण, (११) कुंभकर्ण, (१२) मंदोदरी, आणि (१३) रावण.

तुलसीदासांचें ग्रंथविषयक ध्येय लोकशिक्षण असल्याचें पूर्वीच निश्चित झालें आहे. अर्थातच त्यांच्या भूमिका लोकशिक्षणाच्या तत्वावरच योजिलेल्या असल्या पाहिजेत हें निराळें कथन करण्याची गरज नाहीं. सांगावयाचें तें इतकेंच कीं या तत्वावर दृष्टि रोखून ठेवणें भाग झाल्या कारणानें अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या कांहीं प्रमुख भूमिका तुलसीदासांना न पटल्यामुळें कांहींची त्यांना सुधारणा करावी लागली, कांहीं वर टीका करावी लागली, आणि कांहीं नवीन करणें अपरिहार्य झालें. या गोष्टीचा परिचय भूमिकांच्या परिशीलनानें आतां होणारच आहे म्हणून त्या संबंधानें जास्त विस्तार करण्याची येथें आवश्यकता नाहीं.

वरील भूमिका-परिगणांत सुमंत समाविष्ट झालेला नाहीं. याचें कारण रामायणीय इतिहाससंबंधानें किंवा अवांतर कोणत्याहि रीतीनें त्याच्या भूमिकेस कसलेंहि महत्व पोचूं पावत नाहीं. म्हणून त्या भूमिकेचा विचार योग्य स्थळीं ( अयाध्याकांडाच्या समालोचनेंत सदर नं. २० वर ) केला आहे तो वाचकांस स्मरत असेलच.

तसें पाहिलें तर रामायणीय भूमिकासंबंधानें तुलसीदासांनीं आपल्या प्रस्तावनेंत ( वंदना-म. भा. पा. २२-२४ पहा ) उल्लेख केलेलाच आहे. परंतु तो उल्लेख निव्वळ निष्कर्षरूपानें झालेला आहे. तितक्यानें भूमिकांच्या वास्तविक

स्वरूपाचा बोध होत नाहीं. आमच्या मतानें तो बोध होणें अत्यंत अवश्य आहे. **भूमिकापरिचय** हा स्वतंत्र भाग घालण्याचें मुख्य कारण हें होय.

विषयप्रवेशापूर्वी येथें अवश्य नमूद करावयाचें तें हें कीं आमचा भूमिका-विचार तुलनात्मक दृष्टीनें व्हावयाचा आहे. तुलनेसाठीं आम्ही मुख्य वाल्मीकि आणि अध्यात्म याच संहिता जमेस धरल्या आहेत. याचें कारण या दोन सर्व-मान्य रामायणांपरतां आधारभूत असा अन्य समग्र रामायणीय कथाग्रंथ तुसीदासांसमोर असण्याची आमच्या मतानें बहुशः वानवाच होती.

## दशरथ.

प्राचीन आणि अर्वाचीन सर्वच कवींनीं दशरथास कमीअधिक रीतीनें स्त्रीलंपट ठरविलें आहे. येथवरच जर त्यांची मजल पोहोंचली असती तर आह्मांस जास्त कांहींच बोलावयाची गरज नव्हती. परंतु स्त्रीलंपटतेमुळें दशरथाच्या भूमिकेचा केव्हां केव्हां विपर्यास करण्यांत आलेला दिसतो. तो मात्र आमच्या मतानें सर्वथैव अनुचित होय. कारण कैकयीची वरयाचना दशरथाच्या कानांत शिरतांच त्याची स्त्रीलंपटता जी अगदीं पूर्ण नाहींशी झाली ती त्यानंतर त्यास केव्हांहि शिवली नाहीं. म्हणून स्त्रीलंपटतेमुळें दशरथाच्या भूमिकेचा विपर्यास करण्यास आमच्या मतानें मुळींच जागा नाहीं.

स्त्रीलंपटता पार मावळल्यानंतर दशरथाची मनोभूमिका केवळ दोनच विचारांनीं व्यापिलेली होती. हे विचार **सत्यप्रेम** आणि **पुत्रप्रेम** हे होत. या दोन विचारांचें जें प्रीतिषडाष्टक तें स्त्रीलंपटता नाहींशी झाल्यानंतरचा **दशरथ** होय.

वस्तुमध्यें ज्या गुणाचा सर्वातिरिक्त उत्कर्ष होतो तो तिचा **विशेष** समजला जातो. हा **विशेष** बहुधा प्रामुख्यानें एकाच गुणाचा असतो. अवांतर गुणांचें (किंवा गुणसंघाताचें) उच्चत्व पूर्वोक्त विशेषाचें आनुषंगिक असतें.

अध्यात्म आणि वाल्मीकि रामायणांत **दशरथाच्या सत्यप्रेमापेक्षां पुत्रप्रेमच** जास्त ऊर्जित झाला आहे. म्हणून तेथल्या त्या भूमिकेचा विशेष **पुत्रप्रेमच** म्हणविला जाईल.

तुलसीदासांच्या दशरथाची भूमिका मात्र फार भिन्न आहे ती ही अशीः-

म. भा. पा. २२

दो०-वंदउँ अवधभुआल सत्य प्रेम जेहि रामपद ।
बिछुरत दीनदयाल प्रिय तनु तृन इव परिहरेउ ॥.

( अर्थः—सत्य आणि रामपद या दोहोंचे ठायीं सारखें प्रेम ठेविल्यामुळें रामवियोग होतांच प्रिय तनु ज्यानें तृणवत् त्यागिली त्या अयोध्याधीश दशरथाला मी वंदन करितों. )

वरील भूमिकेंत पुत्रप्रेम आणि सत्यप्रेम या दोहोंचाहि उत्कर्ष समसमान ठेविला आहे, आणि हे दोन्हीहि उत्कर्ष दशरथाच्या देहावसानास समसमान कारणीभूत झाले हें गोस्वामीजींनीं दृष्टोत्पत्तीस आणलें आहे. म्हणून त्यांच्या दशरथाचे सत्यप्रेम आणि पुत्रप्रेम हे दोन विशेष समजले पाहिजेत. यामुळेंच त्यांच्या दशरथास कल्पनातीत महत्व येऊन त्याची भूमिका आदर्शभूत झाली आहे असें आमचें मत आहे. याच मताची शहानिशा आतां येथून सुरू होईल.

अध्यात्म— अयो. कां. स. ३ श्लो. ६९

स्त्रीजितं भ्रांतहृदयमुन्मार्गपरिवर्तिनम् ।
निगृह्य मां गृहाणेदं राज्यं पापं न तद्भवेत् ।
एवं चेदनृतं नैव मां स्पृशेद्रघुनंदन ॥

दशरथाची वरील उक्ति पश्चात्तापाची आहे. तो रामास सांगत आहे कीं रामानें त्यास बंदींत कोंडून ठेवावें आणि स्वतः राज्य घ्यावें. त्या कृतीनें रामास पाप तर लागणार नाहींच, पण तो ( दशरथ ) देखील अनृत भाषणाच्या पापापासून वांचेल. रामानें तिकडे दुर्लक्ष केलें, कारण दशरथ पुत्रवात्सल्यानें 'भ्रांतहृदय' म्हणजे वेडापीर बनून तो त्यास ( रामास ) पुत्रधर्मापासून च्युत करीत होता.

वाल्मीक रामा. अयो. कां. स. ३४ श्लो. २६

अहं राघव कैकेय्या वरदानेन मोहितः ।
अयोध्यायां त्वमेवाद्य भव राजा निगृह्य माम् ॥

फक्त धर्मशास्त्रीपणाची चर्या खेरीज करून बाकीचा हा दशरथ देखील अध्यात्माच्या दशराथाचीच प्रति आहे.

वरील दोन्हीहि दशरथांचा सत्यप्रेम पुत्रप्रेमासमोर बिलकुलच खजिल झाल्यामुळें त्यांची सत्यनिष्ठा नीतीच्या लपंडावानें बरीच निस्तेज झाली हें स्पष्ट दिसतें. असे विद्रूप झालेले दशरथ तुलसीदासांना असह्य झाले. लोकशिक्षणाच्या दृष्टीनें त्यांना 'प्रान जाइ बरु वचन न जाई' ( प्राण गेलेले वेहत्तर, पण प्रतिज्ञा फोल व्हावयाची नाहीं ) असाच दशरथ पाहिजे होता. म्हणून अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या दशरथाचें पश्चात्तापानें डवडवलेलें हृदय तेवढें तुलसीदासांनीं काढून तें असामान्य आणि लोकमान्य अशा स्वरूपांत घातलें. तोच हा त्यांचा दशरथ होयः—[ म. भा. पा. ३५८-३५९ ]

चो०-सुनि सनेहवस उठि नरनाहा । बैठारे रघुपति गहि बाहा
सुनहु तात तुम्ह कहँ मुनि कहहीँ । राम चराचरनायक अहहीँ
सुभअरु असुभ करम अनुहारी । ईसु देइ फल हृदय बिचारी
करइ जो करम पाव फल सोई । निगम नीति असि कह सब कोई

दो०—अउर करइ अपराध कोउ अउर पाव फलभोगु ।
अतिबिचित्र भगवंतगति को जग जानइ जोगु ॥

अर्थः-रामाचें भाषण ऐकतांच प्रेमाच्या झटक्यांत दशरथ उठला आणि रामाचा हात धरून त्यास त्यानें बसविलें. तो म्हणाला " रामा ! चराचरनियंता तो तूं राम आहेस असें मुनिजन म्हणतात. ईश्वर बऱ्या वाईट कर्मा-प्रमाणें उचित फल देतो. ज्याचें जसें कर्म तसा त्यास फळभोग असें वेदशास्त्रादि सर्वांचेंच मत आहे. अपराध एकाचा आणि प्रायश्चित्त भलत्यास हा मात्र भगवंताचा अजबच न्याय म्हणावयाचा ! तो जगांत कोणास कळणें शक्य आहे बरें !

आतां हा दशरथ आणि वरचे दोन दशरथ कोणीहि पाहून घ्यावेत. या दशरथांत मनलज्जा, जनलज्जा, सत्यप्रियता, पितापुत्रांची मर्यादा, रामासंबंधीं आदर आणि प्रेम, कैकयीच्या चिडण्याच्या भीतीनें रामाशीं कानघुसणी वगैरे भाव किती मनोहर आणि मार्मिक दाखविले आहेत. लोकशिक्षणाचें तत्व कोणत्या दशरथाच्या अंगीं पूर्ण खिळलेलें आहे तें आतां एकदम दिसूं शकतें.

तुलसीदासांनीं त्यांच्या दशरथाची भूमिका आणि तिजसंबंधी त्यांचें चोज खालील चौपायांत फारच प्रेक्षणीय आणि मार्मिक रीतीनें वर्णिलें आहेः—

**जियन मरन फल दसरथ पावा। अंड अनेक विमल जस छावा**
**जियत राम विधुवदन निहारा। रामविरह मरि मरन सँवारा**

(म. भा. पा. ४१६)

**अर्थः**—जगण्याचें आणि मरण्याचें सार्थक एका दशरथानेंच कमाविलें. त्याच्या उज्वल यशानें अनेक ब्रम्हांडें गजबजलीं आहेत. तो जो जगला तो रामाचा मुखचंद्र पाहतच जगला, आणि राम दुरावतांच स्वतः मरून त्यानें मृत्यूसहि शोभविलें.

## कौसल्या

या भूमिकेचा मनसोक्त परिचय होण्यास रामायणांत वास्तविक तीनच प्रसंग आहेत—(१) **रामवनगमन**, (२) **दशरथनिधन**, आणि (३) **भरतकौसल्यासंवाद**

अध्यात्मांतली **रामवनगमनकालीन कौसल्या** ही अशी आहेः—

**पिता गुरुर्यथा राम तवाहमधिका ततः।**
**पित्राज्ञप्तो वनं गंतुं वारयेहमहं सुतम्॥**
**यदि गच्छसि मद्वाक्यमुल्लंघ्य नृपवाक्यतः।**
**तदा प्राणान् परित्यज्य गच्छामि यमसादनम्॥**

[अयो. स. ४ श्लो. १२, १३]

वाल्मीकींतली त्याच प्रसंगाची कौसल्या ही अशी आहे:—

यथैव राजा पुज्यस्ते गौरवेण तथाह्यहम् ।
त्वा साहं नानुजानामि न गंतव्यमितो वनम् ॥ २५ ॥
अहं प्रायमिहासिष्थे नच शक्ष्यामि जीवितुम् ।
ततस्त्वं प्राप्स्यसे पुत्र निरयं लोकविश्रुतम् ॥ २८ ॥

( अयो. स २१ )

वरील वर्णनांचा सारांश हा कीं दोन्हीहि कौसल्या मातृत्वाचा हक्क स्थापित करून आणि आत्महत्येची भीति घालून रामास पित्राज्ञापराङ्मुख करण्याचा यत्न करितात. वाल्मीकींची कौसल्या रामास घोर नरकांत देखील लोटण्यास तयार झाल्य.कारणानें आगळीकीची एक मजल जास्तच गाठते. राममाता या भावनेनें यांचा आदर बाह्यतः कोणीहि करीलच, परंतु कोणी देखील या एकीसहि प्रेमादरास पात्र मानूं शकणार नाहीं. पहिली **आत्मघातिनी** तर दुसरी **आत्मघातिनी असून पुत्रनिरयदायिनी** असेंच त्यांज बद्दल कोणाच्याहि मनांत आल्यावांचून राहणार नाहीं.

पण इतर कोणच्याहि कशाला, खुद्द रामाच्याच मनास तसें वाटलें. त्यांच्या मनांत तशी कल्पना जर उद्भवली नसती तर दोन्हीहि कौसल्यांची कानउघाडणी रामांनीं खरेंच रामशास्त्री बनून खालीलप्रमाणें केलीच नसती.

अध्यात्मरामा. अयो. का. स. ४

त्वमप्येवं मयादिष्टं ( लक्ष्मणाय ) हृदि भावय नित्यदा ॥ ४४ ॥
समागतं प्रतीक्षस्व न दुःखैः पीडयसे चिरम् ।
न सदैकत्रसंवासः कर्ममार्गानुवर्तिनाम् ॥ ४५ ॥
यथा प्रवाहपतितप्लवानां सरितां तथा ।
चतुर्दशसमासंख्या क्षणार्धमिव जायते ॥ ४६ ॥

वाल्मीकिरामा. अयो. कां. स. २४

भर्तुः पुनः परित्यागो नृशंसः केवलं स्त्रियः ।

स भवत्या न कर्तव्यो मनसाऽपि विगर्हितः ॥ १२ ॥

.... .... .... ....

राज्ञो वृद्धस्य सततं हितं चर समाहिता ।
व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा ॥ २५ ॥
भर्तारं नानुवर्तेत साच पापगतिर्भवेत ।
भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम् ॥ २६ ॥

वर प्रमाणें रामाचा उपदेश होऊन देखील ह्या दोन्हीहि माथेफिरू कौसल्या फिरून केव्हां तरी आपल्या मूळस्वभावावर जाऊन कांहीं तरी अभद्रपणा करणार, आणि तसें झालें कीं लोकशिक्षणाची सगळीच घाण होणार अशी तुळसीदासांना खरोखर भीति वाटली असावी. म्हणूनच त्यांनीं त्या कौसल्या आपल्या रामायणासाठीं घेतल्या नाहींत. त्यांनीं त्या घेतल्या नाहींत हें खरोखरच बरें झालें, कारण आपणास लवकरच दिसेल कीं ह्या दोन्हीहि कौसल्या पतिनिधनप्रसंगीं अखेर आपल्या पूर्वस्वभावावर गेल्यामुळें तुळसीदासांचींच कल्पना अक्षरशः खरी ठरली.

अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या कौसल्यासंबंधानें तुलसी-दासांचें मन वरील कारणामुळें विटल्यामुळें त्यांना त्यांच्या ध्येयास शोभण्यासारखी कौसल्येची स्वतंत्र भूमिका करणें भाग झालें. त्यामुळें त्यांस कौसल्येची भूमिका अशी योजावी लागली कीं ( **'मातु विवेक अलौकिक तोरे। कबहुँ न मिटिहि अनुग्रह मोरे'**-म. भा. पा. १३२ ) जिचा अलौकिक विवेक कदाकाळींहि नष्ट व्हावयाचा नाहीं—म्हणजे जी पतिधर्म आणि पुत्रप्रेम यांच्या विरोधाचा योग्य निवाडा करूं शकेल, पोटाची आंतडी करवतली जात असतां देखील जी स्वधर्मापासून रेसभरहि ढळणार नाहीं, स्वतःच्या भयंकर आपत्तींत देखील जी परांतरास सांभाळीतच राहील, पुत्रास पुत्रधर्म शिकवून जी दुसऱ्यास यत्किंचितहि उपसर्ग न पोहोंचवितां आणि स्वतःचा स्त्रीधर्म न सोडतां मातृप्रेम वागवीत राहील इ० इ०. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे **'जौं सुत कहउँ संग मोहि लेहू। तुम्हरे हृदय होइ संदेहू'** ( रामा ! जर मजला तू बरोबर [ वनांत ] ने असें मी म्हटलें तर तुझें मन मजविषयीं कलुषित होईल ) अशा

भाषणावरून रामास देखील जिच्या बद्दल शंका न वाटतां उलट तिच्या कुशींत जन्म घेतल्याबद्दल धन्यताच वाटेल अशी कौसल्येची भूमिका तुलसीदासांनीं निश्चित केली.

वरप्रमाणें भूमिकेची योजना ठरल्यावर तुलसीदासांनीं तिची प्राणप्रतिष्ठा 'राम भरत दोउ सुत सम जानी।' ( राम आणि भरत हे दोघेहि पुत्र जिला समसमान वाटतात ) या बीजमंत्रानें केली, आणि तिच्या देहाचा अंगन्यास खालील मंत्रांनीं केला: - [ म. भा. पा. ३६१-३६२ ]

चौ०-तात जाउँ बलि कीन्हेहु नीका। पितु आयसु सब धरम क टीका

दो०- राज देन कहि दीन्ह बन मोहि न सो दुखलेस
तुम्ह बिनु भरतहि भूपतिहि प्रजहि प्रचंड कलेस॥

चौ०-जौं केवल पितुआयसु ताता। तौ जनि जाहु जानि बडि माता
जौं पितु मातु कहेउ बन जाना। तौ कानन सत अवध समाना
पितु बनदेव मातु बनदेवी। खग मृग चरनसरोरुह सेवी

( अर्थ:—बाळा ! फारच योग्य केलेंस. मी तुजजवरून स्वत:स ओंवाळून टाकतें. पित्राज्ञापालनच सर्वधर्मांत श्रेष्ठधर्म होय. राजानें तुला राज्य देऊं करून वनवास दिला याचें मला रतिमात्र देखील दु:ख नाहीं. परंतु तुझ्यावांचून भरताला, महाराजांना [ दशरथाला ] आणि प्रजेला मात्र प्रचंड क्लेश भोगावे लागणार. बाळा ! जर ही केवळ पित्याचीच आज्ञा असती, तर मातेसच अधिक मानून तूं न गेल्यास चाललें असतें. परंतु वनवासाची आज्ञा जर उभयतांचीहि आहे तर मात्र तुला अरण्यच शंभर अयोध्येप्रमाणें समजलें पाहिजे. वनांतील देव आणि देवता हेच तुझे मातापिता आणि तेथील पशुपक्षी हेच तुझ्या चरणकमलांचे सेवक समज. )

याचें तात्पर्य हें कीं जी. आपखुषीनें स्वत:चे रामावरील मातृत्वाचे हक्क कैकयीच्या पायीं अर्पण करील आणि जी स्वत:

भरताची आई आणि रामाची कैकयी होईल अशीच कौसल्या तुलसीदासांना त्यांच्या लोकशिक्षणासाठीं पसंत झाली. साधें आणि संक्षेपानें सांगावयाचें म्हणजे वैधव्य पत्करून देखील पुत्रप्रेम संभाळणाऱ्या अध्यात्माच्या आणि वाल्मीकीच्या राममाते परीस पुत्रप्रेम झुगारून किंवहुना निपुत्रकत्व पत्करून देखील सौभाग्याचेंच चोज वाळगणारी राममाता तुलसीदासांना त्यांच्या ध्येयांसाठीं पसंत पडली.

अशा या स्वामीजींच्या कौसल्येनें लोकशिक्षणास कितपत हातभार लाविला इतकेंच आतां पहावयाचें राहिलें आहे तें पाहूं:—

दशरथनिधनकालीन कौसल्या

अध्यात्म-अयो. कां स. ७

कैकेय्यै प्रियभार्यायै प्रसन्नो दत्तवानन्वरम्
त्वं राज्यं देहि तस्यैव मत्पुत्रो किं विवासितः ॥ १६ ॥
कृत्वा त्वमेव तत्सर्वमिदानीं किंनु रोदिषि ।
कौसल्यावचनं श्रुत्वा क्षते स्पष्ट इवाग्निना ॥ १७ ॥
ततः शोकाश्रुपूर्णाक्षः कौसल्यामिदमब्रवीत् ।
दुःखेन म्रियमाणं मां किं पुनर्दुःखयस्यलम् ॥ १८ ॥
इदानीमेव मे प्राणा उत्क्रमिष्यंति निश्चयः ।

वाल्मीकि-अयो. कां. स. ६१

तत्रत्वं मम नैवासि रामश्च वनमाहितः ।
न वनं गंतुमिच्छामि सर्वथा हा हता त्वया ॥२५ ॥

स० ६२

सात्वं धर्मपरा नित्यं दृष्टलोकपरावरा ।
नार्हसे विप्रियं वक्तुं दुःखितापि सुदुःखितम् ॥ ९ ॥

जानामि धर्मं धर्मज्ञ त्वां जाने सत्यवादिनम् ।
पुत्रशोकार्तया तत्तु मया किमपि भाषितम् ॥ १४॥

अध्यात्माची कौसल्या ' इदानीमेव ' या शब्दांवरून दशरथाचें मरण जास्त ओढवून आणण्यास कारणीभूत झाली हें स्पष्टच आहे. म्हणून तीस पतिघातिनी म्हणतां येईल.

वाल्मीकीची कौसल्या वाष्कळा सारखी कांहीं तरी बरळली, परंतु लगेच ती निवळल्यामुळें तीस प्राकृत म्हटलेलेंच ठीक.

आतां स्वामीजींची कौसल्या हीं पहाः—

म. भा. पा. ४१५

नाथ समुझि मन करिय विचारू । राम-वियोग-पयोधि अपारू ।
करनधार तुम्ह अवधजहाजू । चढेउ सकल प्रिय-पथिक-समाजू ।
धीरज धरिय त पाइय पारू । नाहिँ त बूडिहि सब परिवारू ।
जौँ जिय धरिय विनय पिय मोरी । राम लषण सिय मिलहिँ बहोरी ।

अर्थः-( कौसल्या म्हणाली )—महाराज ! आपणच मनांत विचार करून पहा कीं, रामवियोग हा अफाट समुद्र असून त्यांत अयोध्यारूपी जहाज तरंगत आहे. त्यात आपली सर्व प्रिय प्रजा हा पथिकसमाज बसलेला असून केवळ आपणच त्या जहाजाचे कर्णधार आहांत. आपण धैर्य धराल तरच त्यांतून पार पडतां येईल. नाहींतर सर्व मंडळी बुडणारच. माझी विनंति आपण मनावर घ्याल तर राम, लक्ष्मण आणि सीता पुन्हां खास मिळवितां येतील.

केवढा गंभीर उपदेश करून ही कौसल्या पतीच्या मनास तकवा देत आहे ! राम सीता आणि लक्ष्मण हे सर्व तुम्हांआम्हांमुळें, त्यांच्यामुळें तुम्ही आम्ही नाहीं, म्हणूनच तुम्हीआम्ही जर जीवंत असूं तर त्यांची आपणास केव्हांहि वाण नाहीं, असें धैर्य देऊन तिनें आपला पतिव्रतधर्म अगदीं शिखरास पोंचविला. स्त्रीधर्माचें तत्व खरेंखरें इनेंच ओळाखिलें. अशा सतीच्या ठायीं रामास गर्भवास जर वैकुंठवासाहून देखील श्लाघ्य व सुखमय वाटला

काव्यसमालोचन उत्तरकांड, सदर नं. २ पहा ) तर त्यांत विशेष नवल तें काय ? ही कौसल्या पाहून कोणासहि असेंच वाटलें पाहिजे कीं धन्य या माउलीची कूस, आणि धन्य तो तुलसीदास ज्यानें ती कूस हुडकून काढिली !

आतां फक्त भरतभेटींतल्या कौसल्या पहावयाच्या आहेत. तितकें झालें कीं ही भूमिका संपली.

वाल्मीकीची ती कौसल्या:--( वा. रा. अयो. स. ७५ )

इदं ते राज्यकामस्य राज्यं प्राप्तमकंटकम् ।
संप्राप्तं बत कैकेय्या शीघ्रं क्रूरेण कर्मणा ॥ ११ ॥

.... ... .... ....

इत्यादि बहुभिर्वाक्यैः क्रूरैः संभर्त्सितोऽनघः ।
विव्यथे भरतस्तीव्रव्रणे तुद्येव सूचिना ॥ १७ ॥

वाल्मीकीच्या कौसल्येनें सकृद्दर्शनींच निष्पाप भरतावर अशी पुष्पांजळी वाहिली. त्यामुळें आधींच कैकयीनें दुखविलेलें त्याचें कोवळें हृदय फारच कळवळलें आणि त्यानें आपली शुद्धता या कौसल्येस पटवून देण्यास अनेक द्रावक शपथा घेतल्या. तेव्हां कोठें ही कौसल्या शुद्धीवर आली. एकंदरींत या वेळची देखील वाल्मीकीची कौसल्या प्राकृतच ठरते.

अध्यात्मकारांची कौसल्या मात्र या प्रसंगीं कौतुक करण्यासारखी निवळली आहे ती अशी:-( अयो स. ७ )

साऽपि तं भरतं दृष्ट्वा मुक्तकंठं रुरोदह ॥ ८२ ॥
पादयोः पतितस्तस्या भरतोऽपि तदारुदत् ।
आलिंग्य भरतं साध्वी राममाता यशस्विनी ॥ ८३ ॥

अध्यात्मसंहिते संबंधानें साशंक होणें ठीक नाहीं, परंतु प्रत्यक्ष पतीच्या मरणप्रसंगीं देखील जिच्या हृदयास द्रव म्हणून कसा तो दिसूं शकला नाहीं त्या तिच्या हृदयानें भरतास पाहून इतकें कां कळवळावें हें मात्र कोडेंच राहतें.

आमच्या दृष्टीनें स्वामीजीस देखील या कोड्यानें पछाडिलें असावें. म्हणूनच अध्यात्माचें ' **राममाता** ' हें सूत्र मात्र त्यांनीं घेतलें आणि त्या सूत्रास साजेल असें वार्तिक म्हणून आपली ' **राममाता** ' निराळीच निर्माण केली. म्हणूनच त्यांची '**राममाता**' अशी झाली आहे:-[ म. भा. पा. ४२२-३२३ ]

**चौ०-भरतहिं देखि मातु उठि धाई। मुरुछित अवनि परी झँइ आई**

.... .... .... ....

**सरल सुभाय माय हिय लाये। अतिहित मनहुँ राम फिरि आये**

**भेंटेउ बहुरि लषन-लघु-भाई। सोक सनेह न हृदय समाई**

**देखि सुभाउ कहत सब कोई। राममातु अस काहे न होई**

( अर्थ-भरतास पाहतांच कौसल्या धांवत सुटली, पण लगेच घेरी येऊन ती जमीनीवर पडली. ... .... ....
....... स्वभावानें ती अगदींच बाळबोध, तिनें भरतास उराशीं धरिलें. जणुं काय रामच परत आले इतकें तिला तेव्हां गोड वाटलें. नंतर ती शत्रुघ्नास भेटली. तिच्या हृदयांत शोक आणि प्रेम मावेनासे झाले. तिचा तो स्वभाव पाहून सर्वच म्हणाले कीं ही रामाची आई ना! ही अशी कां न असूं नये ?

अध्यात्मकार आणि स्वामीजी यांच्या कौसल्या आतां समोर आहेतच. त्यांची तुलना केली असतां सहज दिसून येतें कीं '**अति हित मनहुँ राम फिरि आये**' अशीच कौसल्या ' **राममाता** ' म्हणवूं शकेल. म्हणून स्वामीजींच्या कौसल्येची भूमिका ' **अति हित मनहुँ राम फिरि आये** ' या एकाच वाक्यांत निदर्शित झाली आहे असेंच म्हटलें पाहिजे.

स्वामीजींनीं आपल्या वंदनेंत ( म. भा. पा २२ ) सर्वांच्या आधीं या कौसल्येस दिलेला वंदनाचा बहुमान तोच आम्ही त्यांच्या कौसल्येच्या भूमिकेचा खरा विशेष समजतो.

## कैकयी

रामकथेचा ज्यास परिचय आहे त्यास कैकयीचा परिचय नसणें संभवतच नाहीं. जसें द्रौपदीमुळें भारत तसेंच कैकयीमुळें रामायण. शिवाय कैकयीची भूमिका सर्व रामायणांत एकसारखीच आहे. या दृष्टीनें पाहतां कैकयींची भूमिका देण्याची खरीखुरी अवश्यकताच नाहीं. तथापि कैकयीच्या भूमिकेबद्दल ज्याअर्थी कधीं कधीं द्विधा मत दिसून येतें त्याअर्थी आमचें मत आह्मांस निर्दिष्ट करणेंच भाग आहे.

आमच्या मतानें रामायणीय इतिहासांतल्या अस्सल कैकयीस कांहीं भूमिकाच नाहीं, आणि जर कांहीं असेल तर ती देवमायाविमोहित मंथरेच्या संसर्गापूर्वीच संपते आणि भरताच्या रामदर्शननिमित्त वनसंचारांत ती पुनरुज्जीवित होते. या दोन्हींहि प्रसंगांतली कैकयी निभ्रांत निर्दुष्टच आहे.

राहिली ती वरील दोन प्रसंगांच्या मधली कैकयी. या कैकयीस भूमिका आहे असें गृहीत करून तीस सदोष ठरविण्यांत येतें.

आमच्या मतानें या कैकयीस मुख्य कैकयीच म्हणणें चुकीचें आहे, आणि म्हणून तीस भूमिका या दृष्टीनें पाहून तिच्या अवगुणांची वाटाघाट करणें अयोग्य आहे. **'वातुल भूत विवस मतवारे । ते नहिं बोलहिं वचन सँम्हारे'** म्हणजे भूतबाधा, वायु आणि वेड ( किंवा उन्माद ) यांच्या संचारस्थितींतल्या कोणत्याहि भाषणा बद्दल भाषण करणारा कधींहि जबाबदार नसतो हें कर्त्यांचेंच मत आहे. या न्यायाप्रमाणें बिचाऱ्या **देवमाया-विमोहित** कैकयीवर निष्कारण आग पाखडणें अमानुषपणाचें होणार नाहीं काय ? भरद्वाज भरतास समजवितांना स्पष्ट सांगतात कीं **'तात कैकइहि दोष नहिं गई गिरा मतिधूति'** [ बाळ ! कैकयीचा मुळींच दोष नाहीं. वाग्देवीनेंच तिची बुद्धि नष्ट केली होती ]. भरद्वाजांचें हें भाषण गृहीत केलें म्हणजे या कैकयीस भूमिका आहे हें म्हणणेंच सदोष ठरतें. **'आदावंतेच यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा'** हा वेदांतन्याय या कैकयीच्या संबंधानें पूर्ण लागूं पडतो.

आमच्या मतानें तर कैकयीच्या भूमिके संबंधानें भवति न भवति करीत बसण्यापेक्षां सर्वांनीं रामासारखेंच तिच्या समोर मान वांकवून खालील प्रमाण तिचे आभारच मानिले पाहिजेत:-

तातस्नेहो भरतमहिमा पौरुषं वायुसूनोः ।
सख्यश्चापि प्लवगनृपतेः कापि सौमित्रिभक्तिः ॥
सीतसात्वं निजभुजबलं वैरिणां वैरिभावः ।
ज्ञातं सर्वं तवचरणयोर्मातरेषः प्रसादः ॥

## भरत

अध्यात्मांत आणि वाल्मीकींत भरताची भूमिका आहे, परंतु केवळ लोकशिक्षणास वाहिलेल्या तुळसीदासांच्या भरतभूमिकेच्या तुलनेस ती जवळ जवळ आहे नाहीं सारखीच. तुलसीदासांनीं ही भूमिका इतकी वर आणली आहे की अयोध्याकांडाचा नायक **राम** कीं **भरत** येथवर मोह पडतो, आणि एकवेळ अशीहि भावना होते कीं वाल्मीकि केवळ आपल्या रामायणांतल्या चुकीची दुरुस्ती करण्यासाठींच कीं काय तुलसीदासांच्या रूपानें फिरून अवतरले. आह्मांस असेंहि वाटतें कीं भरतभूमिका तुलसीदासांकडून इतकी उत्कृष्ठ वठविली गेली नसती तर त्यांच्या रामायणाचा आज जो लोकांत अप्रतिहत वर्धिष्णु प्रचार दिसत आहे तो तितका दिसलाच नसता. रामचरितमानसाचा **प्राण** निःसंशय **भरतच** होय. तो नसता तर रामचरितमानसाचा **आत्मा** जो **राम** तो अगदींच '**एकाकी न रमते**' ह्मणून विमनस्क दिसला असता.

इतर सर्व रामायणांत सीतारामांची जोडी प्रामुख्यानें दिसते. तुलसीरामायणांत रामभरताची जोडी तशी झाली आहे, आणि त्यामुळें सीतेस '**नेपथ्ये**' दाखविण्याची पाळी आली आहे. '**भरतसरिस को रामसनेही । जग जपु राम राम जपु जेही**' ( भरतासारखा रामास प्रिय कोण आहे ? अवघें जग रामाचा जप करितें, परंतु खुद्द राम मात्र भरताचाच जप करीत असतात ) हें प्रशंसावाक्य खुद्द कवीकडूनच आमच्या मताची कबूली दर्शवीत आहे. वास्तविक पाहतां तुलसीदासांच्या लोकशिक्षणास खरोखरी भरताचीच भूमिका उपयोगास आली.

भरतामुळें तुलसीदासांची ओळख किंवा तुलसीदासामुळें भरताची ओळख इतकें वाटण्यापर्यंत अयोध्याकांडाच्या सौष्ठवाची मजल जाऊन पोह्चोंचली आहे.

भरतभागामधून रामरसाचे घोट अविच्छिन्न घेण्यास जितका अवसर सांपडतो तितका या किंवा अन्य कोणत्याहि रामायणांत सांपडत नाहीं. तुलसीदासांकडून भरताचें हृदय इतकें उघडें झालें नसतें, तर सेवाधर्माचे हृदय कधींच इतकें उघडकीस आलें नसतें, आणि सेवाधर्म जो अगदीं अनाथ झालेला होता तो सनाथ झालेला कधींच पहावयास मिळाला नसता.

आमच्या मतानें अयोध्या कांडाचे खरेखरें दोन भाग पडतात—पूर्वार्ध दशरथनिधनापर्यंतचा आणि उत्तरार्ध भरतभावाचा. पूर्वार्धांतल्या रामप्रेमास लौकिक प्रेम म्हटलेलें चालू शकेल, कारण त्यांत रामाचें खरें स्वरूप मुनिजनां परतां इतर फारच थोड्यांना विदित झालेलें दिसतें. परंतु उत्तरार्धांत त्या लौकिक स्वरूपाची सर्वांस ओळख पटून रामविषयक लौकिक प्रेमाचें रूपांतर पारमार्थिक प्रेमांत झालें आहे. म्हणून हे दोन भाग ज्ञानपूर्व भक्तियोग आणि ज्ञानोत्तर भक्तियोग यांसारखे आम्ही समजतों.

वरील विभागकल्पना वास्तविक पाहतां भरतामुळेंच झाली. अयोध्याकांडाच्या रंगभूमीवर भरत नव्हता तोंवर रामविषयक प्रेमांत मोहाचाच दंगल माजला होता. भरताचा पाय त्या भूमीस लागतो न लागतो तोंच मोहाचा पडदा उचलला जाऊन रामाचें सत्य स्वरूप निदर्शनास येऊं लागतें, मोहाची जागा आनंदानें भरून निघते, आणि शोकानें विमनस्क होऊन विवळत पडलेली सर्व अयोध्या—[ म. भा. पा. ४६९ ]

**दो०–जरउ सो संपति सदनसुख सुहृद मातु पितु भाइ।**
**सनमुख होत जो रामपद करइ न सहज सहाइ॥**

( अर्थः–श्रीरामचरण सन्मुख होत असतां उल्हासानें सहाय न करणारी संपत्ति, गृहसुख, मित्र, माता, पिता आणि बंधु या सर्वांना खुशाल आग लागो. )

असें म्हणत परमानंदांत गर्क होऊन भरताच्या छत्राखाली राम दर्शनास लोटते.

०

पण स्वामीजींचा अत्यंत कृतज्ञ राम भरताचें उसणें फेडण्यास मुळींहि वेळ

लागूं देत नाहीं. भरतानें त्यास उजेडांत आणिलें म्हणून रामानें भरद्वाजाकडून भरतासहि उजेडांत आणविलें. रामाचें जगत्कर्तृत्व आणि भरताचें जगद्‌गुरुत्व या दोहोंहि गोप्यांचा परिस्फोट केल्यानें भरद्वाजानें जगास कायमचें ऋणी करून ठेविलें. खुद्द भरद्वाज–[ म. मा. पा. ४५६ ]

**दो०--तुम कहँ भरत कलंक यह हम सब कहँ उपदेसु ।**
**रामभक्तिरस सिद्धिहित भा यह समय गनेसु ॥**

( **अर्थः** बा भरता ! हा रामवनवास तुला कलंक वाटत असेल परंतु आम्हा सर्वांस तो उपदेशात्मक आहे. रामभक्तिरसाच्या प्राप्त्यर्थ आम्हांस **'श्रीगणेशायनमः'** कसा तो हा आतां तूं केला.)

असें अत्यानंदानें उद्गारून भरताची दीक्षा प्रथम पत्करितात.

पुढें पुढें तर जणूं काय सर्वच प्रमुख मंडळींनीं भरताची दीक्षा घेतलेली दिसते. '**भरत कहहिं सो किये भलाई**' [ भरत सांगेल म. भा. पा. ४९६ तेंच करणें श्रेयस्कर ] असें खुद्द रामानेंच म्हटलें आहे. '**कहिय जो आयसु देहु**' ( म. भा. पा. ५२१–तूं जी आज्ञा देशील तीच रामास कळविण्यांत येईल ) असें म्हणून शुक्रगुरु जनकानें भरतास गौरविलें आहे. आणि '**समुझब कहब करब तुम्ह सोई । धरमसार जग होइहि जोई**' ( म. भा. पा. ५४५-तुझे विचार, उच्चार, आणि आचार तेच सर्व जगाचें धर्मरहस्य ) अशारीतीनें रामगुरु वसिष्ठांनीं देखील भरताबद्दल मान्यता दर्शविली आहे. भरताचा जगद्‌गुरुत्वाचा अधिकार सिद्ध होण्यास जास्त प्रमाणांची आतां कोणास तरी अपेक्षा वाटेल काय ?

या जगद्‌गुरुतत्वाचा जगाला काय लाभ झाला तें आतां पहावयाचें आहे. वास्तविक पाहतां तुलसीदासांना देखील भरताच्या तत्वांचा परिचय करून देणें जड गेलें ही गोष्ट ते त्यांच्या रामाच्याच साक्षीनें अशा रीतीनें कबूल करितातः– [ म. भा. पा. ४७५ )

**चौ०--कविकुल अगम भरतगुनगाथा । को जानइ तुम बिनु रघुनाथा**

( अर्थः—भरतगुणचरित्र, कविकुलास देखील अगम्य आहे. रघुनाथा ! तुम्हांपरतां तें कोणास तरी उमजणार काय ? )

तथापि स्वतःच्या ध्येयाच्या जबाबदारीमुळें ते कार्यविमुख होऊं शकले नाहींत, आणि त्यांच्या बुद्धिबलानुरूप त्यांनीं आपलें कार्य पार पाडिलें.

तुलसीदासांनीं भरताचें एक प्रमुख तत्व आपणा समोर अगदीं सूत्र रूपानें ठेविलें आहे तें हें:— ( म भा. पा ५१९ )

' साधन सिद्धि रामपगनेहू. '

याचा अर्थ असा कीं भरताचें साधन आणि त्याची सिद्धि दोन्हींहि रामपदप्रेमच. यावरून प्राप्यप्रापक विभाग भरताच्या भक्तितत्वाचा भाग नाहीं हें सिद्ध आहे. वाक्य दिसण्यांत चमत्कारिक दिसतें, पण तें फार अर्थप्रचुर आहे. त्यांतून तीन प्रमेयें अत्यंत महत्वाचीं निघतात तीं हीं:—

( १ ) रामप्रेम जितकें उज्जृंभित झालें तितकीच सिद्धि प्रतीत झाली. त्यायोगानें असमाधानास वांवच रहात नाहीं.

( २ ) साध्य रामपदप्रेमच आहे, रामपद नाहीं.

( ३ ) रामप्रेमाच्या वृद्धीच्या मानानें रामपदाचें सान्निध्य आपोआपच सुलभ होत जाईल.

हीं प्रमेयें भरताच्या आचारांत तुलसीदासांनीं वेळोवेळीं दाखविलीं आहेत इतक्या सगळ्यांचें मंथन करणें अशक्य आहे. ह्मणून वरील प्रमेयें ज्यांत सूक्ष्म रूपानें आलेलीं आहेत असा एकच विशिष्ट प्रसंग आह्मी देतों. हा प्रसंग ह्मणजे भरताची प्रयागराजास विज्ञप्ति. त्याचें वर्णन असें आहे:–( म. भा. पा. ४५३)

चौ०-माँगउ भीख त्यागि निज धरमू । आरत काह न करइ कुकरमू
अस जिय जानि सुजानि सुदानी । सफल करहिँ जग जाचकबानी

दो०–अरथ न धरम न कामरुचि गति न चहउँ निरवान।
जनम जनम रति रामपद यह बरदान न आन॥

चौ०–जानहु राम कुटिल करि मोही। लोग कहउ गुरु-साहिब-द्रोही
सीताराम चरन रति मोरे। अनुदिन बढउ अनुग्रह तोरे
जलद जनम भरि सुरति बिसारउ। जाचत जल पबि पाहन डारउ
चातक रटनि घटे घटि जाई। बढे प्रेम सब भाँति भलाई
कनकहि बान चढइ जिमि दाहे। तिमि प्रियतमपद नेम निबाहे

अर्थः—स्वधर्म सोडून मी तुला भिक्षा मागत आहें. दुःखार्दित कोणतें दुष्कर्म न करील ?–असें समजून जगांतले सूज्ञ दाते याचकयाचना सफलच करितात. धर्म, अर्थ, काम यांची मला चाड नाहीं. मोक्षप्राप्तीची मला हाव नाहीं. जन्मोजन्मीं रामपदाच्या भक्तीखेरीज इतर तुझें कोणतेंहि वरदान मला नको. प्रत्यक्ष रामांनीं देखील वाटेल तर मला कुटिल ठरवावें. जनानें खुशाल मला गुरुद्रोही आणि स्वामीद्रोही समजावें. मात्र सीतारामचरणीं माझें प्रेम अनुदिन वाढावें म्हणजे झालें. तुझी मजवर कृपा ही एवढीच व्हावी. मेघ चातकाची आठवण जन्मभर जरी विसरला आणि जलाची याचना चातक करीत असतां त्याजवर तो जरी वज्रपाषाणांची एकसहा धार धरूं लागला, तरी क्षणजीवित चातकाची ओरड ज्या मानानें क्षीण होत जाऊन अगदीं नाहींशी होते त्याच मानानें त्याचें मेघावरील प्रेम वृद्धिंगत होत असतें. चातकाची खरी योग्यता ती हीच. अग्निपुटेंच सोन्याची तेजोवृद्धि करितात. यांच्याप्रमाणेंच तूं माझ्या जिवलगांच्या चरणांचें माझें प्रेम निभवावें.

वरील विचार अतिशयच उच्चकोटीचे आहेत. समाजशिक्षणास त्यांचा विशेष उपयोग नाहीं. हें जाणून तुलसीदासांनीं भरतचरित्रांत प्राथमिक शिक्षणाचे धडे दिले आहेत. त्यांपैकीं विस्तरभय वागवून जास्त महत्वाचे असे अगदीं नेमके तीनच धडे आम्ही येथें देतों.

धडा १.–( म. भा. पा. ४३२ )

चौ०–गुरु-पितु-मातु-स्वामि-हित-बानी । सुनि मन मुदित करिय भल जानी
उचित कि अनुचित किये विचारू । धरम जाइ सिर पातक भारू

अर्थः–माता, पिता, गुरु आणि स्वामी यांचे हितोपदेश ऐकावे, आणि ते हितकर समजून आनंदानें अमलांत आणावे. त्यांच्या योग्यायोग्यतेचा विचार मनांत आणल्यास धर्मलोप होतो आणि पापभरानें मस्तक लवतें. ( मात्र या धड्याचा उपयोग ' स्वे स्वेऽधिकारे या निष्ठा स गुणः परिकीर्तितः ' या भागवतांतील नियमावर दृष्टि ठेवूनच व्हावयाचा हें भरताच्या भाषणाच्या मागच्या पुढच्या संदर्भावरून लक्षांत आणावयास पाहिजे. )

धडा २ ( म. भा. पा. ५०३ )

चौं०–जो सेवक साहिबहिँ सँकोची । निज हित चहइ तासु मति पोची
सेवक हित साहिब सेवकाई । करइ सकल सुख लोभ बिहाई
स्वारथ नाथ फिरे सबहीका । किये रजाय कोटि विधि नीका
यह स्वारथ परमारथ सारू । सकल सुकृत फल सुगति सिंगारू

अर्थः-जो सेवक स्वार्थबुद्धीनें धन्यास भीड घालितो तो नीचबुद्धि होय. सेवकाचा स्वार्थ म्हणजे स्वामीची सेवा, आणि ती त्यानें इतर सर्व सुखाला आणि लोभाला सोडूनच केली पाहिजे. रामास अयोध्येस परत फिरविणें ही सर्वांच्या स्वार्थाची बाब झाली. परंतु सर्वांचें कोटिपट श्रेष्ठ कर्तव्य रामाची आज्ञा पाळणें हेंच होय. सर्व स्वार्थ आणि परमार्थ यांचा निष्कर्ष काय तो हा एकच. तोच सर्व सुकृतांचें फळ आणि सद्गतीचा शृंगार होय.

धडा ३ ( म. भा. पा. ५२२ )

चौं०–आगम निगम प्रसिद्ध पुराना । सेवा धरम कठिन जग जाना

**स्वामिधरम स्वारथहिँ विरोधू। वैर अंध प्रेमहिँ न प्रबोधू**
**दो०-राखि राम रुख धरम व्रत पराधीन मोहिँ जानि।**

अर्थः-वेद, शास्त्र, पुराण आणि व्यवहार या सर्वांच्याच मतानें सेवाधर्म कठिण ठरला आहे. स्वामीधर्म आणि स्वार्थ हे शब्दच विरोधी आहेत. वैरांध आणि प्रेमांध यांचें ऐकमत्य असंभवनीय आहे. रामाची मर्जी, त्यांचा धर्म आणि त्यांचें व्रत मला संभाळलेंच पाहिजे, आणि म्हणून मला तुम्ही केवळ पराधीन समजावें. अशा स्थितींत—

**आज्ञा सम न सुसाहिब सेवा।** ( म. भा. पा. ५२८ )

मला स्वामींच्या आज्ञे सारखी दुसरी सेवाच नाहीं.

वरील धड्यांचा उपयोग भरताकडून वेळोवेळीं कसा होत गेला तें दाखविणाऱ्या प्रसंगांपैकीं अगदीं निवडक असे दोनच प्रसंग देऊन ही फार लांबलेली आणि कदाचित् कंटाळवाणी झालेली भूमिका संपवितों.

[ १ ] भरत श्रीक्षेत्रराजप्रयागास पायींच गेला. वाटेंत त्याचें आणि त्याच्या खासदारांचें बोलणें झालें तें हें:—[ म. भा. पा. ४५२ ]

**चौ०—कहहिँ सुसेवक बारहिँ बारा। होइय नाथ अस्व-असवारा**

भरताचे सेवक त्यास वारंवार काकळूत करून म्हणत कीं महाराजांनीं घोड्यावर स्वार व्हावें, तेव्हां त्यांस भरत म्हणालाः—

**चौ०-राम पयादेहि पाय सिधाये। हमकहँ रथ गज बाजि बनाये**
**सिर भरि जाउँ उचित अस मोरा। सबते सेवक धरम कठोरा।**

माझा स्वामी राम पायीं अनवाणीच चालत आहे. अश्व, गज, रथ हे मग मजसाठींच आहेत् तर ! वास्तविक पाहतां डोक्यानें चालत जाणें हेंच माझें खरें कर्तव्य होय सर्व धर्मापरता सेवाधर्मच कठिण.*

---

* सेवाधर्मःपरमगहनो योगिनामप्यगाम्य।

(२) अयोध्या सोडतांना भरतानें राज्याची सर्व व्यवस्था केली. त्या वेळचे त्याचे हे उद्गार आहेतः—[ म ा. पा. ४३९ ]

**चौ०-भरत जाइ घर कीन्ह बिचारू। नगर बाजि गज भवन भंडारू**
**संपति सब रघुपतिकै आही। जौं बिनु जतन चलउँ तजि ताही**
**तौ परिनाम न मोर भलाई। पापिसिरोमनि साइँदोहाई**
**करइ स्वामिहित सेवक सोई। दूषन कोटि देइ किन कोई**

अर्थः—इकडे आपल्या महालांत जाऊन भरतानें विचार केला कीं राजधानी वगैरे सर्व साम्राज्यवैभव वास्तविक राजारामाचें आहे. त्याची योग्य व्यवस्था न लावितां जर मी तें तसेंच टाकून चालता झालों, तर त्याचा ( वैभवाचा ) आणि माझा दोघांचाहि परिणाम चांगला नाहीं. मला पाप्यांचा शिरोमणि आणि स्वामीचा द्रोही बनावें लागेल. कोणी मला कोट्यवधि दोष कां देईना, पण सेवक खरा तोच, जो स्वामीचें हितच करीत राहील.

भरताच्या चरित्राचें तात्पर्य आमच्या विचारानें हें दिसतें कीं प्रत्येकानें त्याचें जें कांहीं आहे तें सर्व परमेश्वराचें ( किंवा गुरूचें ) आहे, आणि आपण त्याचे केवळ वहिवाटदार [ ट्रस्टी ] आहोंत अशी भावना दृढ करून प्रपंचांत शिस्तीनें आणि आनंदानें वागणें हा देखील परमार्थच होतो. त्यांतली ईश्वरसेवेची भावना गेली म्हणजे आपल्या ' **अहंममादि** ' भावना होतात, आणि त्या कारणानें आपणास प्रपंच दुःखमय होतो.

सेव्यसेवकभाव इतका काटेतोल जागृत ठेवणारी भूमिका तुलसीदासांच्या भरतापरता आम्हांस इतर रामायणांत कोठेंहि दृष्टीस पडली नाहीं. या भूमिकेचा **विशेष खुद्द तुलसीदासांनींच** दिलेला आहे, आणि तो त्यांनीं जनकाकडून वदविण्यानें त्यास फार महत्व आलेलें आहे. शिवाय त्यांत **रामाच्या आणि भरताच्या विशेषांची तुलना** झाल्यानें विचार फार गंभीर आणि मार्मिक झाला आहे. तो हा असाः–[ म. भा. पा. ५१८ ]

**चौ०-देवि परंतु भरत रघुबरकी। प्रीति प्रतीति जाइ नहिं तरकी**
**भरत अवधि सनेह ममताकी। यद्यपि राम सीँव समताकी**

( जनक आपल्या पत्नीस ह्मणतात–) रामभरतांचे परस्पर प्रेम आणि विश्वास अतर्क्य आहेत. राम जरी समत्वाची सीमा आहेत तरी भक्तिभावनेची सीमा एक भरतच होय.

अखेर सांगावयाचें हें कीं '**नोद्धवोण्वपिमन्न्यूनः**' या उक्तीनें श्रीशुकाचार्यांनीं जशी **उद्धव** आणि **श्रीकृष्ण** यांचं जोडी भागवतांत दाखविली आहे तद्वतच '**भरत राम ही की अनुहारी**' या उक्तीनें स्वामीजींनीं **भरत** आणि **राम** ही जोडी या कांडांत दर्शविली आहे. तुलसीदासांच्या भरताची भूमिका अप्रतिम श्लाघिष्ट होण्याचें आमच्या मतानें मुख्य कारण भरतास रामाच्या जोडींत वसविणें हेंच होय.

स्वामीजींनीं आपल्या भरताची स्वतंत्र भूमिका अत्यंत संक्षेपानें परंतु परमपूर्णतेनें जी दर्शविली आहे ती ही अशीः–[ म. भा. पा. ४६४. ]

**चौ०–भरत सरिस को रामसनेही । जग जप राम राम जप जेही**

ह्मणजे विश्व ज्या रामाला जपतें तो प्रत्यक्ष रामच जर भरताचा जप करितो तर भरताच्या तोडीचा रामास जीव कीं प्राण इतर कोण असूं शकणार ?

## राम.

रामाच्या भूमिके संबंधानें भिन्नमत शक्यच नाहीं. सर्वांनाच ती भूमिका पूर्वीपासूनच सर्वश्रेष्ठ दिसत आली, आणि पुढेंहि ती तशीच दिसत राहणार. कित्येक ठिकाणीं ती कमीजास्त मोहक झालेली दिसते. परंतु तो कार्यवैशिष्ठ्याचा परिणाम होय, रामाच्या गुणवैषम्याचा नव्हे. अध्यात्मांतला राम विशेषतः आध्यात्मिक असल्यामुळें वाल्मीकीच्या अत्यंत व्यवहारपटु रामा पुढें तो भिन्न स्वरूपाचा दिसतो. हा न रामाचा दोष, न कर्त्याचा गुण; हा केवळ कार्यगौरवाचा परिणाम होय. रामाची भूमिका जी आहे ती सर्वत्र तशीच आहे. तुलसीदासांच्या रामाची देखील अशीच गोष्ट आहे. त्यांच्या रामाची भूमिका जी आहे तीच आहे. परंतु अध्यात्माच्या आणि वाल्मीकीच्या दृष्टींचें सम्मेलन करून त्यास वल्लभाचार्यांच्या कृष्णाच्या प्रेमवैशिष्ठ्याची जोड तुलसीदासांनीं दिली.

'वंदउँ बालरूप सोइ रामू' [ त्या बालरूप रामालाच मी वंदन करितों ] ह्या त्यांच्या मंगलावरूनच हें निदान स्पष्ट दिसतें. रामचरितमानसांतला राम आध्यात्मिक व व्यावहारिक राहून विशेष लोभस झाला याचें खरें वर्म आमच्या कल्पनेनें हेंच आहे.

आतां रामाची भूमिका अशी वर्तविण्याचें प्रयोजन काय इकडेस वळूं. रामचरितमानसाकडे तुलसीदासांची दृष्टि केवळ लोकशिक्षणाची असल्या-कारणानें रामाच्या गुणवैभवांत **कृतज्ञता** आणि **प्रेमळपणा** यांचें वैशिष्ट्य दाखविणेंच त्यांस श्रेयस्कर वाटलें. कारण '**रहत न प्रभुचित चूक कियेकी। करत सुरत सय वार हियेकी**' [ **अर्थ**--प्रभूंच्या चित्तांत मुद्दाम केलेली चूक देखील रहात नाहीं. आपणास त्यांची आठवण नुसती एकवार देखील जरी झाली तरी ते आपली आठवण अगदीं कळवळयानें शंभरदां करितात ], '**राम सदा सेवकरुचि राखी**' ( राम निरंतर सेवकाचें मनोगत राखतातच ) **इत्यादि प्रकारच्या क्षमाशील, कृतज्ञ आणि प्रेमळ रामा खेरीज लोकशिक्षणाचा भार अन्य कोण वाहूं शकणार?**

आतां लोकशिक्षणाची बाजू अगदींच सोडून विचार करूं. रामचरित्राचा विशेष महत्वाचा भाग म्हणजे रामाचें वनवासचरित्रच; कारण त्यांचें मुख्य अवतारकार्य वनवासांतच संपलें. या अवतारकार्यास वानरादिकां-कडून जिवापाड मदत झाली. व्यावहारिक दृष्टीनें या पशूंना रामा पासून कशाचीहि अपेक्षा नव्हती. अरण्यांत वृक्षवेली आहेत तो पर्यंत त्यांचें स्वराज्य अव्याहत चालणारच. मग त्यांस रामाच्या कार्यासाठीं आपले प्रिय प्राण वेंचण्याचा मोह कां पडावा? केवळ विराध, वाली, कबंध अशा महासत्वांच्या प्राणांचे भक्ष घेणाऱ्या रामाऱ्या बाहुबलानें भेदरून जाऊन त्यांनीं रामा भोंवती एकवटावें आणि लांगूलचालन करावें हें म्हणणें मुळींच सयुक्तिक दिसत नाहीं. उलट त्यामुळें तर धाक वाटून त्यांनीं रामा पासून स्वतःस छपवायासच पाहिजे होतें. पण तसें अगदींच झालें नाहीं. याचें कारण रामाच्या प्रेमळपणा परता इतर कांहींहि असणें शक्य नाहीं. अध्यात्मकारास किंवा वाल्मीकीस

हें कळलें नसेल असें चुकून देखील म्हणतां येत नाहीं. मग त्यांनीं रामाच्या प्रेमळपणा संबंधानें इतकें मुग्ध कां असावें ! आमच्या मतानें त्यांचा दृष्टिकोन निराळा असल्या कारणानें त्यांना रामाच्या प्रेमळपणास आणि मनमिळाऊपणास विशेष महत्व देण्याची गरज भासली नाहीं. तुलसीदासांचा दृष्टिकोन स्वानुभवावरून आणि कार्यगौरवावरून निराळा झाल्या कारणानें त्यांना रामाचा प्रेमळ आणि कृतज्ञ स्वभावच* रामचारित्र्याचें प्रधान अंग वाटलें, आणि म्हणून त्यांना भासलेली अध्यात्म आणि वाल्मीकींतली उणीव त्यांनीं त्यांच्या रामायणांत भरून काढिली.

---

* हा स्वभाव स्वामीजींनीं खालील प्रमाणें दर्शविला आहेः— [ म. भा. ४६४ ]

जद्यपि सम नहिं राग न रोषू । गहहि न पाप पुन्य गुन दोषू
करम प्रधान बिस्व करि राखा । जो जस करइ सो तस फल चाखा
तदपि करहिं सम विषम विहारा । भगत अभगत हृदय अनुहारा

अर्थः—राम जरी क्रोध-लोभ, पाप—पुण्य, आणि गुण—दोष यांनीं रहित असून केवळ समदृष्टि आहेत, आणि या विश्वाची सर्व राहटी जरी त्यांनीं केवळ कर्मफळाच्या तत्वावर घालून ठेविलेली आहे, तरी देखील त्यांचे व्यवहार भक्ताभक्तांच्या इच्छेनुरूप होत असतात. या उल्लेखांत स्वामीजींनीं तिघांचा राम, तीन प्रकारचा ठरविलेला दिसतो. पहिला, ज्ञान्यांचा राम तो सर्वसाक्षी पण पूर्ण निष्क्रिय; दुसरा, कर्मठांचा राम तो केवळ निःपक्षपाती न्यायी, म्हणजे बेमुरवती व दक्ष; आणि तिसरा भक्तांचा रम तो मात्र सर्वस्वी प्रेमळ, कृतज्ञ आणि उदार आहे. या क्रमाप्रमाणें अर्थातच पहिला जरी पूर्ण निरुपद्रवी असला तरी जगास मात्र तो अगदींच निरुपयोगी ठरतो, दुसरा खऱ्या सचोटीचा पण पूर्ण काटेतोल व्यवसायी[वनीया] असा ठरतो, आणि तिसराच काय तो जातिवंत दयाळु आणि दिलदार असल्यामुळें सर्वांस सरसहा सहाय करणारा ठरतो.

फिरून आणखी एका स्वतंत्र दृष्टीनें देखील विचार करितां येईल. तुलसीदासांनीं त्यांच्या रामचरितमानसांत अध्यात्म किंवा वाल्मीकि यांच्या रामाची भूमिका वापरली असती तर काय हरकत आली असती ! जर खरोखरच तसें झालें असतें तर तुळसीदासांचा प्रेमळ भरत ज्ञानी किंवा व्यवहारी अशा त्या रुक्ष रामाच्या संगतींत जन्मभर तळमळत राहिला असता असें आह्मांस भासतें, कारण कोठें तो अध्यात्माच वेदान्ती किंवा वाल्मीकीचा ' **पितृपैतामहं राज्यं कस्य नावर्तयेन्मनः ।** ' (वा. रा. यु. का. स. १२५ श्लोक. १६) असा व्यवहारी आणि साशंकवृत्तीचा राम, आणि कोठें हा तुलसीदासांचा ' **एकइ उर बस दुसह दवारी । मोहि लगि भे सियराम दुखारी** ' [ केवळ मजकरितांच सीताराम दुःखी झालें आहेत ही एकच आग माझें काळीज जाळीत आहे.— म. भा. पा. ४३७ ] म्हणून तळमळणारा निव्वळ प्रेमाचा पुतळा भरत ! तो— राम ' **ह्रीर्नाभिभाषते** ' म्हणून आढ्यतेनें जागच्याजागींच तटस्थ राहता आणि विचारा हा भरत आपल्या प्रेमाची होत असलेली विटंबना पाहून डोळ्यांतून टिपेंच पाडीत बसता. तुलसीदासांच्या मनोभूमिकेंत हें दृश्य तेव्हांच भरलें. म्हणूनच —

**चौ०-तात तुमहिँ मैँ जानउँ नीके। करउ काह असमंजस जी के**
**राखेउ राय सत्य मोहि त्यागी । तनु परिहरेउ प्रेमपन लागी**
**तासु वचन मेटत मन सोचू। तेहि ते अधिक तुम्हार सँकोचू**
**ता पर गुरु मोहि आयसु दीन्हा। अवसि जो कहहु चहउँ सोइ कीन्हा**
**दो०--मन प्रसन्न करि सकुच तजि कहहु करउँ सोइ आजु ।**

( म. भा. पा. ५०० )

( अर्थ—[ राम भरतास म्हणतात ] वत्सा ! तुला मी पक्कें ओळखिलें आहे. परंतु काय करूं रे ! माझ्याहि जीवास मोठीच चुटपुट लागली आहे. ज्या महाराजांनीं मजला मोकलून देखील आपलें सत्य संभाळिलें आणि आपल्या प्रेमपणाच्या पायीं आपल्या प्रियप्राणांची देखील आहुति दिली त्यांची आज्ञा ओलांडण्यास मन खरोखरीच कचरतें; परंतु त्याहीपेक्षां तुझ्या बद्दल मन जास्त हुरहुरतें. आतां मात्र गुरुमहाराजांची आज्ञा झालेलीच आहे त्या अर्थी तूं जें

सांगशील तें मी अवश्य करूनंच सोडणार. **तूं मन प्रसन्न ठेव, भीड सोड, आणि एकदां सांगून टाक मात्र,--कीं मी तेंच आतांच्या आतांच केलेंच समज.** )

अशा प्रकारच्या द्विगुणित प्रेमादरानें आळवून भरताची टिपें आपल्या पदरानें पुसणाऱ्या रामाचा स्वामीजींनीं आश्रय घेतला. आतां येथेंच पहा कीं '**द्विर्नाभिभाषते**' म्हणून दुसऱ्याच्या कोंवळ्या आंतडीस जास्त पीळ पाडणारा राम **पुरुषोत्तम** म्हणावयाचा, कीं स्वतःच्या आंतडीस पीळ सोसून दुसऱ्याच्या आंतडीचा पीळ '**द्विश्चाभिभाषते**' ह्मणून उकलण्यास सरसावणारा राम **पुरुषोत्तम** म्हणावयाचा.

अध्यात्म आणि वाल्मीकि यांतल्या रामापेक्षां रामचरितमानसांतला राम लोकांच्या दृष्टीस जास्त सरस वाटतो याचीं कारणें तुलसीदासांनीं सगळ्या रामचरितमानसभर पसरून ठेविलीं आहेत, तीं सगळीं वेंचतां येणें शक्य नाहीं. परंतु तीं सर्वांच्या लक्षांत यावींत या उद्देशानें एक महत्वाची सूचना देऊन ठेवितों. रामास, ज्यास खरें खरें पहावयाचें असेल त्यानें त्यांस उच्च दर्जाच्या व्यक्तीशीं वागतांना न पाहतां अगदीं नीच वर्गाच्या व्यक्तीशीं वागतांना पहावें. उदाहरणार्थ ह्मणून आह्मी दोन प्रकरणें देतों.—एक अयोध्याकांडांतलें **गुहकृत नौकानयन** [ म. भा. पा. ३७५-३७७ ]. आणि दुसरा उत्तर कांडांतला **अंगदप्रसाद** [ म. भा. पा. ८२४-८२६ ].

( १ ) गुह विनोदी विनंति करितां करितां विशेष वाहवून रामाच्या बापापर्यंत '**मोहिराम राउरि आनि दसरथ सपथ**)'=मला रामरायाचीच काय-पण दशरथाची देखील शपथ आहे ) अशा रीतीनें पोहोंचला तरी देखील—

**सो०–सुनि केवट के वैन प्रेम लपेटे अटपटे ।**
**विहँसे करुनाऐन चितइ जानकी-लषन-तन ॥**

प्रेमाचीं पुटें दिलेले असे ते गुहाचे वरील लडिवाळ बोल ऐकून दयेची माउली असा तो राम सीतालक्ष्मणांकडे हंसत हंसत पाहूं लागला. हें रामाचें शब्दचित्र किती प्रेमळ आणि प्रसादोन्मुख आहे तें सांगणें अशक्य आहे.

( २ ) अंगद 'मरती बार नाथ मोहिँ बाली। गयउ तुह्मारे हिँ कोछे घाली' ( प्रभो ! मरते वेळीं मला वाली आपल्याच ओटींत घालून गेला ना ? ) असें बोलून इकडे पायांवर लोटला, तर तिकडे रामाच्या डोळ्यांतून टिपांचे लोट अनावर सुरु झाले. पुढें जरा सांवरल्या नंतर आणि अंगदास बरेंच गोंजरल्या नंतरः-

दो०-निज उर-माला वसन मनि वालितनय पहिराइ।
विदा कीन्ह भगवान तव बहु प्रकार समुझाइ॥

भगवान् रामानें आपल्या हातानें अंगदास वैजयंति, पीतांवर आणि रत्नहार लव-विले आणि परोपरीनें त्याची समजूत घालून ( मनधरणी करून ) त्यास निरोप दिला. ( रामाची श्रीवत्स आणि भृगुपद इतकीच काय ती संपत्ति उरली. तीहि त्यांनीं दिलीच असती. परंतु अंगलग्न ह्मणून त्यांचा नाइलाज झाला असावा. आणि ह्मणूनच त्यांना अंगदाची मनधरणी करावी लागली असावी. ) हा राम आतां कोणींहि पाहून घ्यावा. याची सर कोणता राम करूं शकणार ?

तुलसीदासांच्या रामाचा इतका वरचष्मा होण्यास कारण तुलसीदासांनीं त्यास एक गुरुकिल्ली देऊन ठेविलेली दिसते. **अत्यंत कोमळ आणि प्रेमळ हृदय** ही ती किल्ली असून **भरभक्कम कृतज्ञता** आणि **सरसकट औदार्य** हे त्या किल्लीचे कांटे होत. या किल्लीनें तुलसीदासांच्या रामास कोणाच्याहि अत्यंत गुप्त मनोधनाची चोरी अगदीं अकल्पित रीतीनें सहज आणि अचुक करितां येते. आमच्या मतानें ही गुरुकिल्ली तुलसीदासांनीं श्रीशुकयोगींद्रापासून मिळविलेली असावी. असें वाटण्यास कारण दोघांच्याहि किल्ल्या अगदीं एकसार-ख्या दिसतात. कोणास फरक वाटतो तो किल्ली चालविण्याच्या हातोटीच्या फर-कामुळें, बाकी किल्ली मात्र खास एकच असें कोणासहि ह्मणावें लागेल. यास प्रमाण आमच्या लोकशिक्षणांतल्या '**भक्ति**' या विषयावरील व्याख्यानांत [ पान १३२ वर* ] दिलें आहे. तें वाचकांस स्मरत असेलच:

---

* श्लो. ६३, ६४, ६५ अनुक्रमानें परमेश्वराचा प्रेमळपणा, औदार्य, आणि कृतज्ञता दाखवितात. ]

येथें एक महत्वाचें म्हणून सांगावयाचें तें हें कीं तुलसीदासांच्या रामायणांतला भरत वाल्मीकींच्या भरताची सुधारलेली आवृत्ति झाल्याकारणानें रामाची देखील सुधारलेली* आवृत्ति काढणें अपरिहार्य झालें. वाल्मीकींतला भरत रामास परतविण्यासाठीं प्रायोपवेशास सिद्ध झाला तरी देखील तेथला राम यथापूर्व करारीच राहिला तो असा:—

लक्ष्मीश्चंद्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत्।
अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः॥

परंतु तुलसीदासांचा भरत रामास परतण्याबद्दल एक चकारशब्दहि काढीत नाहीं तरी देखील त्यांचा राम ' अवसि जो कहहु चहउँ सोइ कीन्हा ' [ तूं जें म्हणशील तें मला अवश्य केलेंच पाहिजे. ] असें भरतास बोलून प्रतिज्ञाभंगास देखील उद्युक्त होतो. खरेंच आहे वाल्मीकीचा राम आमच्या या कलिकालास काय कामाचा ! तो आहे सांगून सवरूनच ' राजाराम ' म्हणजे विशेषच न्यायी आणि दक्ष, आज कलिकालास पाहिजे ' पतितपावन ' राम जो कलिकालीन हीनदीन जनांचे दोष आपल्या दयालुत्वामुळें चित्तावर न धरितां उलट त्यास त्यांनीं एकवार आठविलें असतां तो स्वतःच्या उदारस्वभावामुळें त्यांची शभरदां आठवण करितो ( करत सुरत सयवार हियेकी । ). लोक शिक्षणाच्या कार्यास

---

* या सुधारणेस बीजभूत आधार स्वामीजींनीं वाल्मीकीच्याच खालील श्लोकांवरून घेतलेला दिसतो:—

वाल्मी. रामा. अर. कां स. १६—

निश्चितैवहि मे बुद्धिर्वनवासे दृढव्रता । भरतस्नेहसंतप्ता बालिशी क्रियते पुनः ॥ ३८ ॥
संस्मराम्यस्य वाक्यानि प्रियाणि मधुराणिच । हृद्यान्यमृतकल्पानि मनःप्रल्हादनानिच ॥ ३९ ॥
कदाह्यहं समेष्यामि भरतेन महात्मना । शत्रुघ्नेनच वीरेण त्वयाच रघुनंदन ॥ ४० ॥

करारीपणा पेक्षां दयाळूपणाचीच जास्त अपेक्षा असते हें तत्व अगदीं निर्विवाद आहे.

स्वामीजींच्या या रामाचा परिचय होण्याचा सुप्रसंग जर कदाचित् कालीदासांना आला असता तर स्वतःचें 'त्वयि हि परिसमाप्तं बंधुकृत्यं प्रजानाम्' हें एकच वाक्य वारंवार उच्चारून स्वतःच्या वाक्साफल्याच्या आनंदानें तें कदाचित् देहभान देखील विसरले असते असें ह्मणण्या इतका हा राम लोकांचा चाहता झाला आहे. खुद्द स्वामीजी तर आपल्या रामासंबंधानें अशी प्रतिज्ञा करितात कीं तो केवळ एका प्रेमाचाच भुकेला आहे. 'रामहिँ केवल प्रेम पियारा' एवढ्यांतच आपल्या रामाची सर्व भूमिका संपवून आत्मविश्वासाच्या पूर्ण आवेशांत ते असेंहि आव्हान देतात कीं 'जानि लेहु जो जाननिहारा' म्हणजे ज्या कोणास त्यांचें प्रतिज्ञावाक्य अजमावून घ्यावयाचें असेल त्यानें ते बेलाशक अजमावून घेण्यास समोर यावें.

## सुमित्रा.

आमच्या मतानें सुमित्रे इतकी स्थितधी स्त्री सगळ्या रामायणांत दुसरी कोणतीहि नाहीं. सेवकभावाचें खरें हृदय इच्यांतच अवतीर्ण झालें आहे. प्रत्यक्ष पोटचा गोळा वनांत जाण्यापूर्वीं आईस निरोप विचारीत असतां त्यास तिनें एकदमच मूर्ख ठरवून 'तात तुम्हार मात बैदेही। पिता राम सब भाँति सनेही' [ मुला ! तुझी आई सीता आणि बाप राम ] येथपासूनच त्याचा खर्पूस समाचार घेण्यास सुरवात करावी काय ! केवढें हें तिचें रामावरील अलोट प्रेम ! किती तरी हें तिचें खंबीर काळीज आणि केवढा सजावटीचा आणि कसदार हा तिचा सेवकभाव ! अशा माउलीच्या स्तन्यानें पुष्ट बनलेला लक्ष्मण 'देह गेह सब सन तृन तोरे' [ देहगेहादि सगळ्याशींच ज्यानें रामासाठीं काडी तोडून दिली ] इतका कट्टर रामसेवक कां न होणार !

सुमित्रेनें लक्ष्मणास दिलेला निरोप रामायणांतल्या अत्यंत ऊर्जित प्रसंगा पैकीं एक प्रसंग आहे. त्यांतला उपदेश नुसता ओजस्वीच म्हणून चालणार नाहीं. तो पारमार्थिकतत्वांच्या गर्भास देखील हात घालणारा आहे.

सुमित्रेनें लक्ष्मणास अनुलक्षून केलेलें भाषण समाप्त होतांच मनाची वृत्ति जी काय होते ती ज्याची त्यानेंच पाहून घ्यावी. आम्हास तर हीच कल्पना येते कीं भरतभूमीची अब्रू राखण्यासाठीं जेव्हां परमेश्वरास अवतार घ्यावयाचा असतो तेव्हांच तो हा असा उच्च कोटीचा स्त्रीवर्ग निर्माण करितो. अशा वर्गाचा प्रपंच तोच परमार्थ, सहज भाषण तेंच शास्त्ररहस्य, आणि सहज लौकिक आचार तीच वैदिकाचारपद्धति होय. [ जास्त परिचयासाठीं ही भूमिका आमच्या काव्यसमालोचनेंत संदर नं. १२ वर पहावी. ]

ही सुमित्रेची भूमिका तुलसीदासांनीं किती अचुक आणि संगतवार ठेविली आहे तें उत्तर कांडांत दिसतें. वनांतून परत अयोध्येस आल्यावर राम कौसल्ये नंतर सुमित्रेस भेटले. त्यानंतर सुमित्रा लक्ष्मणास स्वाभाविकच एकदम भेटण्यास उत्सुक झाली पाहिजे होती. परंतु तसें न होतां अगदींच निराळा प्रकार झाला तो असाः—

**‘ भेँटी तनय सुमित्रा रामचरण-रत जानि ’**

येथें शद्ब ‘ **मानि** ’ [ म्हणजे **गृहीत धरून** ] नाहीं, तो ‘ **जानि** ’ [ म्हणजे **जाणून** ] आहे. या वरून स्पष्टच दिसतें की सुमित्रेनें प्रत्यक्ष रामास विचारून स्वतःच्या उपदेशानुरूप लक्ष्मणाच्या वागण्याची खात्री करून घेतली आणि मग ती लक्ष्मणास भेटली. केवढा बाणेदार हा रामप्रेम !

आतां मात्र सुमित्रेच्या उपदेशाचा वियोग वाचकांस कदाचित् असह्य होईल या भीतीनें त्यांस तो खालील प्रमाणें सादर करण्यांत येत आहे-—

[ म. भा. पा. ३५६—३५७ ]

**दो०-भूरि भागभाजन भयउ मोहि समेत बलि जाउँ ।**
**जौँ तुम्हरे मन छाँडि छल कीन्ह रामपद ठाउँ ॥**

**अर्थः**—जर तुझ्या मनानें कपट सोडून रामपदीं आश्रय घेतला असेल तर तूं माझ्यासुद्धां महद्भाग्यास पात्र झालास; आणि म्हणूच मी स्वतःस तुजवरून ओंवाळून टाकिलें.

चौ०--पुत्रवती जुबती जग सोई। रघुपतिभगत जासु सुत होई
नतरु बाँझ भलि बादि बिआनी। राम बिमुख सुतते हित हानी

अर्थः---जी रामभक्ताची माता तीच खरी जगांत पुत्रवती होय. तदितर स्त्री प्रसवूनहि व्यर्थच. तिजपेक्षां वांझ स्त्री पत्करेल. कारण अभक्त पुत्रामुळें मातेच्याहि हितास हानीच पोंचते.

चौ०-तुम्हरेहि भाग राम बन जाहीँ। दूसर हेतु तात कछु नाहीँ
सकल सुकृत कर बडफल एहू। रामसीयपद सहज सनेहू

अर्थः-बाळ! सीतारामपदीं सहज प्रेम असणें हें एकच सर्व सुकृतांचें सर्वश्रेष्ठ फल होय. केवळ तें फल तुझ्या वांट्यास येण्यासाठींच राम वनवास पत्करीत आहेत. नाहीं तर त्यांना तसें करण्यास एरव्ही कांहीं देखील कारण नाहीं.

चौं०-राग रोष इरिषा मद मोहू। जनि सपनेहुँ इन्ह के बस होहू
सकल प्रकार विकार विहाई। मन क्रम वचन करहु सेवकाई

अर्थः-राग, रोष, ईर्षा, मद, मोह यांच्या सांपळयांत स्वप्नांतहि सांपडूं नकोस. सर्वच प्रकारच्या मनोविकारांना दडपून टाकून कायावाचामनानें तूं रामसेवाच करीत रहा.

चौ०-तुम्ह कहँ वन सब भाँति सुपासू। सँग पितु मातु रामु सिय जासू
जेहि न रामबन लहहिँ कलेसू। सुत सोइ करेहु इहइ उपदेसू

अर्थः-सीताराम या तुझ्या आईबापांच्या छत्राखालीं तुला अरण्य सर्वस्वी सुखावहच होईल. बाळा! माझा उपदेश ह्मणून तुला हा इतकाच कीं जेणें करून रामाला वनांत क्लेश होणार नाहींत तेंच तूं करीत असावें.

छंद-उपदेस यह जेहि जात तुह्मरे रामसिय सुख पावहीँ।
पितु मातु प्रिय परिवारु पुर सुख सुरति बन बिसरावहीँ॥
तुलसी सुतहि सिख देइ आयसु दीन्ह पुनि आसिष दई।

रति होउ अविरल अमल सिय-रघुवीर-पद नित नित नई ॥

अर्थः—उपदेश हाच कीं तुझ्या जाण्यानें सीतारामचंद्रांना सुख होत असावें, आणि पिता, माता प्रिय, परिवार, अयोध्या, वगैरे ह्यांच्या सुखांच्या स्मृतीची देखील त्यांस विस्मृति व्हावी. ( तुलसीदास ह्मणतात ) अशाप्रकारें लक्ष्मणास उपदेश करून तिनें ( सुमित्रेनें ) त्यास निरोप दिला, आणि फिरून त्यास आशीर्वाद दिला कीं सीताराम-पदीं तुझें प्रेम विमल, अविरल आणि उत्तरोत्तर अभिनव असें वाढत राहो.

वरील भागावरून आमचे पूर्वोक्त विचार किती सप्रमाण सिद्ध होतात तें आतां निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

अध्यात्मांतली आणि वाल्मीकींतली सुमित्रा कोठेंहि विसंगत झालेली नाहीं ही गोष्ट सर्वांप्रमाणें आम्हांसहि कबूल आहे. परंतु तुलसीदासांची ही सुमित्रा समोर ठेविली म्हणजे ती सुमित्रा पुष्कळच मागें पडते. असें होण्याचें कारण तुलसीदासांची सुमित्रा तत्वज्ञानास मूलभूत अशा प्रेमप्रचुर रामोपासनेंत फारच निष्णात झाली आहे.

या सुमित्रेची भूमिका पाहून आमची अशीहि कल्पना होते कीं लक्ष्मणासारख्या तेजस्वी, विरक्त आणि रामभक्त पुत्रास अनुरूप अशीच त्याची माता असावयास पाहिजे होती. म्हणूनच तुलसीदासांची सुमित्रा लक्ष्मणापेक्षां देखील कांकणभर जास्तच तेजस्वी, विरक्त आणि रामरक्त झालेली आहे.

तुलसीदासांस एका सुमित्रेचीच इतकी जबरदस्त आठवण होऊन त्यांनीं तिजबद्दल 'जानि' या एका विविक्षित शब्दानें पराकाष्ठेचा आदर दर्शविला हाच या भूमिकेचा खरा 'जान' म्हणजे प्राण ( विशेष ) होय इतकें सांगून आम्ही ही भूमिका संपवितों.

## सीता आणि लक्ष्मण.

तुलसीदासांनीं सीता आणि लक्ष्मण यांची कोटी सारखीच ठरविलेली दिसते. रामविषयक प्रेमासंबंधानें दोन्हीहि भूमिका अगदीं हातांतहात घालून

चालूं शकणाऱ्या आहेत. एक ( सीता ) 'बचनावियोग न सकी सँभारी' (पतिवियोग हा शब्द देखील जीस असह्य होतो ) अशी, तर दुसरी ( लक्ष्मण ) 'देह गेह सब सन तृन तोरे' ( देहगेहादि संबंधास ज्यानें काडी तोडून दिली ) इतक्या थरास पोहोंचून दोन्हीहि रामावरून प्राण देखील ओवाळून टाकणाऱ्या आहेत. परंतु भरताची 'आज्ञा सम न सुसाहिब सेवा' [ आज्ञापालना खेरीज दुसरी स्वामीसेवाच नाहीं. ) हें स्वामिसेवेचें मुख्य प्रमेय प्रेमांध्यामुळें दोघांच्याहि नजरेंतून अचानक निसटलें आणि त्यामुळें रामास दोघांचेहि प्रेम आगळीकीचें वाटलें. परंतु त्यास दोघांचीहि कींव आली, आणि जरी सीतेस त्यांनीं 'हठि राखे नहिँ राखहिँ प्राना' [ जबरीनें ठेविल्यास ही प्राणच ठेवणार नाहीं ] ह्मणजे हट्टी-प्रेम किंवा मानी-प्रेम असें ह्मटलें, आणि लक्ष्मणास 'जानि सनेह सभीत' प्रेमामुळें भ्यालेला ह्मणजे कातर-प्रेम असें ह्मटलें तरी त्या उभयतांसहि त्यांनीं वनवासांत समागमें घेण्याचें स्वतःच्या मताविरुद्ध ठरविलें.

अन्य कोणत्याहि रीतीनें पाहतां या दोन्हीहि भूमिका वर्तविण्याची हातोटी सर्वच कवींची सारखीच आहे, कारण सीता आणि लक्ष्मण या दोघांचे स्वभाव ठरूनच गेलेले आहेत. हट्टी-प्रेम आणि कातर-प्रेम होण्याचें कारण तरी 'स्वभावमन्यथा कर्तुं कः शक्तो देवनिर्मितम्' हेंच आहे. परंतु त्यांच्या रामप्रेमास मात्र कोणीहि गालबोट लावूं पाहिल्यास उलट स्वतःसच तसें करवून घेण्याची पाळी आल्यावांचून राहणार नाहीं.

वास्तविक रीतीनें पाहूं गेल्यास सीता आणि लक्ष्मण या प्रत्येकाचा रामाशीं जो सेव्यसेवकसंबंध दिसतो तो तत्वतः अंगांगीभाव आहे असाच स्वामीजींचा आशय त्यांच्या खालील भाषेवरून निदर्शनास येतोः—

| लक्ष्मण | सीता |
|---|---|
| **चौ०-रघुपतिकीरति विमल पताका । दंडसमान भएउ जस जाका ।** | **चौ०--प्रभा जाइ कहँ भानु बिहाई । कहँ चंद्रिका चंद तजि जाई ।** |
| अर्थः—रामाच्या कीर्तिरूप विमल पताकेस ज्याचें ( लक्ष्मणाचें )यश दंडा समान झालें आहे. [ म. भा. पा.२३ ] | अर्थः-सूर्यास सोडून सूर्यप्रभा कोठें जाणार ? किंवा चंद्रास टाकून चंद्रिका कोठें जाणार ? [ म. भा. पा. ३७३ ] |

हा अंगांगीभाव गृहीत केल्यावर सीता आणि लक्ष्मण यांना रामापासून पृथक पाहतांच येत नाहीं. म्हणून त्यांच्या भूमिका रामाच्या भूमिकेंत समाविष्ट समजल्या पाहिजेत. भक्तीच्या भावनेस हेंच योग्य होय.

मग स्वामीजींनीं सीतालक्ष्मणाच्या प्रेमाचें वर्गीकरण कां करावें ? या प्रश्नाचें उत्तर अगदींच सोपें आहे. लोकशिक्षण हेंच जर त्यांच्या रामायणाचें ध्येय आहे तर त्यांस प्रत्येक भूमिका पृथक् घेऊन तिच्या संबंधानें स्वतंत्र विचार केलाच पाहिजे. तें त्यांना टाळतां येणें शक्यच नव्हतें. कारण तसे तात्विक विचार टाळणें म्हणजे स्वतःस एक तर सांप्रदायिकपणा चिकटवून घेणें होय, किंवा कर्तव्यविमुखतादोष तरी स्वतःवर लादून घेणें होय.

## वसिष्ठ—जनक

अध्यात्मांत आणि वाल्मिकींत भरता बरोबर वसिष्ठ चित्रकूटावर गेल्याचें वर्णन आहे, पण जनक तेथें गेल्याचें वर्णन मात्र दोहों पैकीं एकांतहि नाहीं. वसिष्ठा सारख्या ब्रम्हर्षींस व्यवहारोन्मुख आणि जनकासारख्या अधिराजास व्यवहारविमुख पाहणें तुलसीदासांस खपलें नाहीं. त्यांस तें एक असह्य वैगुण्य वांटून त्यांनीं जनका कडून चित्रकूटप्रवेश करविला.

वसिष्ट-जनक ही जोडी चित्रकूटा-वरील रंगभूमीवर प्रविष्ट झाल्यानें भरताच्या भूमिकेस अतोनात रंगविण्यास तुलसीदासांस फावलें हें अगदीं यथार्थ आहे. परंतु नुसत्या कविकलेच्याच दृष्टीनें आम्ही या जोडींचा प्रवेश पाहत नाहीं. त्यांत आम्हांस लोकशिक्षणाचा एक अत्यंत महत्वाचा भाग दिसतो. तो भाग हा कीं **ब्रम्हज्ञ देखील व्यवहारज्ञ प्रेमळ, आणि निःपक्षपाती असल्याखेरीज त्याच्या ब्रम्हज्ञानाची खरी शोभा नाहीं.** आमच्या मतानें या भूमिकांचा **विशेष** तो हाच होय.

फळ पिकलें म्हणजे तें जसें आपलें सर्व गुण दाखवितें तसेंच या वृद्धर्षिद्वया संबंधानें तुलसीदासांनीं दाखविलें आहे. अधिकार व वार्धक्य यांची शोभा कशांत आहे तें या भूमिकांवरून शिकण्या सारखें आहे. म्हणून ही वर्णनें सावंत पाहण्याची वाचकांस आमची कळकळीची शिफारस आहे.

वसिष्ठ आणि जनक यांच्या भूमिकांचें रहस्य '**सोह न रामप्रेम बिनु ग्याना**' रामभक्ती खेरीज ब्रम्हज्ञान अगदींच निरस म्हणजे '**नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनं**' [ भागवत ] हेंच स्वामीजींनीं दाखविलें आहे.

## मारुति.

अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या मारुतीपेक्षां तुलसीदासांचा मारुति पुष्कळच सरस झालेला आहे. कारण लंकेंत शिरतांच प्रथम त्यानें केवळ स्वतःच्या बुद्धिबळानें तेथील घरेंदारें, वाडेराजवाडे, कोटकिल्ले, रस्तेगल्ल्या, मैदानेंआखाडे वगैरे सगळ्या शहराच्या कोनाकोपऱ्याची करून टेहळणी केली, आणि बिभीषणास भेटून अगदीं गोडीगुलाबीनें त्यास सहज फितविलें. तेथून तो बिभीषणापासून मिळविलेल्या गुप्त माहितीप्रमाणें अशोकवनिकेंत शिरला आणि तेथें त्यानें रावणाच्या दंडेलीचें व द्वाडपणाचें, आणि सीतेच्या सत्य आणि सचोटीचें प्रत्यक्ष दृश्य पाहिलें. नंतर सीतेचें लक्ष स्वतःकडेस फारच कुशलतेनें आकर्षित करून तीस आपली ओळख पटविली; आणि योग्य मर्यादेनें तीस रामाचा निरोप स्वतःच्या जबाबदारीवर इतक्या खुबीनें सांगितला कीं त्या योगानें सीतेस त्यानें अगदीं बालोबाल खुष करून '**अजर अमर गुननिधि सुत होहू। करहिँ सदा रघुनायक छोहू**' ( पुत्रा ! तूं अजर, अमर आणि गुणनिधि होशील. रघुनाथ तुजवर सदा प्रसन्न राहतील. ) हें दुर्मिळ वरदान तिजकडून वदविलें. पुढें क्षुच्छांतीच्या मिषानें त्यानें मुद्दामच कुरापत काढिली व निव्वळ दांडगाईनें राजसभेंत आपला शिरकाव करून घेऊन रावणासुद्धां सर्व दरबाराच्या मंत्राची व बलाची मार्मिकतेनें चांचणी पाहून स्वतःची पूर्ण खात्री करून घेतली; आणि रावणी दरबाराकडून मिळालेल्या बहुमानाची फेड '**शुभस्य शीघ्रं**' या न्यायानें रावणाच्या लंकेची राखरांगोळी करून रावण आणि त्याचें राक्षसवीर यांजवर जबर जरब बसविली. एकंदरीनें पाहतां रामाच्या या दूतानें स्वतःच्या सामदामादि नीतिनैपुण्याची आणि बलाची कसोटी लावण्यासाठींच कीं काय लंका ही प्रयोगशाळाच ठरविलेली दिसते.

वरील सर्व कामगिरी संपवून सीतेस भेटून तो रामास भेटला, आणि त्यांसहि त्यानें अशा सिताबीनें सीतेचा निरोप सांगितला कीं, एवढे धीर आणि

गंभीर राम पण ते देखील एकदम ' काय वचन मन मम गति जाही। सपनेहु विपति कि चाहिय ताही ' [ वाक्कायमनानें जिला मजपरता दुसरी गतिच नाहीं. तीस स्वप्नांत तरी विपत्ति असावी काय ? ] असें म्हणतच उसळले. लगेच मारुतीनें विचार केला कीं रामाचा कोप विकोपास जाऊं पहात आहे. म्हणून पुढें सरसावून त्यानें अगदीं झोंकानें रामास इतकें शांत केलें कीं, रामास मारुतीच्या उपकाराखालीं स्वतःची मान वांकवावी लागली, आणि अखेर मारुतीच आपल्या मालकाचा कायमचा चालक होऊन बसला.

सर्वच तऱ्हेनें असा विलंदर सेवक सगळ्या रामायणांत अन्य कोणीहि नाहीं, अशा पूर्ण जाणीवेनेंच मारुतीची भूमिका तुलसीदासांनीं दर्शविलेली दिसते. त्या योगानें तुलसीदासांच्या मारुतीचा हात अन्य कोणताहि मारुति धरूं शकेनासा झाला आहे.

राम--मारुति--संवादावर तुलसीदासांनीं हा विशेष छाप मारिला आहेः—
' यह संबाद जासु उर आवा । रघुपतिचरनभगति सोइ पावा '
( हा संवाद ज्याच्या हृदयांत उतरला त्यास रामचरणभक्ति मिळून चुकली ). असा छाप रामायणांतल्या अन्य कोणत्याहि संवादास तुलसीदासांकडून मिळालेला नाहीं. आमच्या मतानें हा छापच मारुतीच्या भूमिकेचा **असामान्य विशेष** होय.

रामाची ओजस्विता आणि विवेक, भरताचें वैराग्य आणि रामभक्ति, लक्ष्मणाचें शौर्य आणि रामसेवा, रावणाचें पौरुष आणि चिकाटी, कुंभकर्णाचें धैर्य आणि धडाडी, आणि स्वतःचें बुद्धिचातुर्य, अतुलबल आणि मनोजव, या गुणांचें समीकरण म्हणजेच स्वामीजींचे मारुतिराय होत. म्हणूनच तुलसीदासांनीं त्यांची भूमिका अशा विशिष्ट प्रकारानें वर्णिली आहेः-( म. भा. पा. २३ )

महावीर बिनवउँ हनुमाना । राम जासु जस आपु बखाना

अर्थः—खुद्द राम देखील ज्याच्या यशाचीं पारायणें करितात त्या महावीर हनुमंतासमोर मी विशेष नम्र होतों.

सो० —प्रनवउँ पवनकुमार खल-बन-पावक ज्ञानघन ।
जासु हृदयआगार बसहिं राम सरचापधर ॥

त्या खलवनपावक ज्ञानघन पवनकुमारासमोर मी विशेषच नम्र होतों याचें कारण हें कीं त्यानें आपल्या हृत्पंजरांत शस्त्रपाणि अशा रामास देखील कायमचें हलेनासें बंद करून ठेविलें आहे.

## अंगद-गुह-सुग्रीव-बिभीषण.

या सर्वच भूमिकांना तुलसीदासांनीं आपल्या रामप्रेमाची दीक्षा दिली असल्यामुळें त्या जास्त सोज्वळ झाल्या आहेत. यांच्या गुणविशेषांवरून **अंगद** आणि **गुह** ही एक जोडी बनतें आणि **बिभीषण-सुग्रीव** ही दुसरी जोडी ठरते. पहिल्या जोडीचा **विशेष निष्कपट स्वामीप्रेम** ठरतो, पण दुसरीचा मात्र **स्वार्थीप्रेमच** ठरवावा लागतो. यांच्या विशेषासंबंधानें काव्यसमालोचनेंत योग्य स्थळीं आमचे विचार आलेले आहेतच. म्हणून त्यांची द्विरावृत्ति आम्ही येथें करीत नाहीं.

## कुंभकर्ण.

या भूमिकेची तुलना आमच्या मतानें सुमित्रेच्या भूमिकेशी चांगलचि जमते, फक्त फरक इतकाच कीं सुमित्रा आपल्या हितोपदेशानें पुत्रास स्वकर्तव्यास उत्साहित करिते, आणि कुंभकर्ण आपल्या उपदेशानें भावाच्या दुष्टाव्याबद्दल त्याची जोरानें कानउघाडणी करितो. परंतु या दोन्हीहि भूमिकांचा **सामन्यविशेष निरपेक्ष, निःसीम,** आणि **नितांत रामप्रेमच** होय.

तुलनात्मक दृष्टीनें आमचें असें मत आहे कीं हा रामायणीय कुंभकर्ण जणुं काय भागवतीय वृत्रासुराची दुसरी आवृत्तिच दिसतो. इतिहासास पौनःपुन्य असतें असें म्हणतात तेंच कदाचित खरें असेल.

कुंभकर्ण शारीरिक आणि मानसिक दोन्हीहि बलानें भयंकरच संपन्न असल्यामुळें रावणावर त्याचा फारच दाब असे. या वरून अशीहि कल्पना होऊं शकते कीं, तो जर वेळीं जागा असता तर कदाचित् सीताहरणच झालें नसतें, आणि त्यामुळें रामास रावणवधार्थ निराळीच युक्ति शोधावी लागून रामायणास कांहीं निराळेंच स्वरूप आलें असतें.

## मंदोदरी.

ही भूमिका जितकी मनोहर तितकीच मननीय आहे. मंदोदरीनें रावणास एकंदर चार उपदेश केले, आणि तिच्या प्रत्येक उपदेशानें त्यास खालींच पाहण्यास लाविलें. परंतु या पतिव्रतेचें तेज असें जबरदस्त कीं मनाविरुद्ध कोणाचा भ्र-देखील सहन न करणारा रावण, पण त्याच्यानें इच्या कडेस वर डोळा करून पाहवेंल देखील नाहीं. सगळ्या रामायणांत रावणास निष्कलंक चारित्र्यानें दावणारी ही एकच भूमिका आहे.

मंदोदरीचे उपदेश उत्तरोत्तर कसकसे सत्यान्वित आणि सणसणीत होत गेले तें लक्षांत आलें ह्मणजे खरोखरच तिच्या चातुर्याबद्दल, कळकळीबद्दल, आणि राम-प्रेमा-बद्दल आश्चर्य आणि आदर जास्तच वाढत जातात. मंदोदरीनें आपल्या अधिकाराचा अतिक्रम केला असें तिच्या शेवटच्या उपदेशा वरून वाटण्याचा संभव आहे. पण पतिपत्निभाव नुसत्या सेव्यसेवक-भावाचाच द्योतक नाहीं. त्यांत मित्रभावाचा पुष्कळच अंतर्भाव होतो. ह्मणून तिचे उपदेश अधिकाराचा आतिक्रम ह्मणवूं शकत नाहींत. वेणी धरून फरफर ओढवून घेण्यापर्यंत माकडांच्या निर्भर्त्सना अध्यात्मादिकांच्या मंदोदरीप्रमाणें पतिपराक्रमाची किंवा पुत्रपराक्रमाची यत्किंचित् देखील आठवण न करितां जी केवळ पतिविजयासाठीं अगदीं निमूटपणानें सोसण्यास रेसभरीहि कचरली नाहीं, ती पतीचा आतिक्रम क्रशी करणार ! तुलसीदासांच्या मतानें रामानें रावणास सायुज्य दिलें तें मंदोदरीच्या संगतीचेंच आणि आदराचेंच फल होय, असें जर कोणीं ह्मटलें तर खरोखर त्यांत अश्रद्धेस कांहींच कारण नाहीं. सतीसाठीं परमेश्वरास काय करावें लागलें नाहीं ?

.... .... .... .... ....

छंद०–आजन्मतेँ परद्रोहरत पापौघमय तव तनु इयं ।
तुमहूँ दियो निजधाम राम नमामि ब्रह्म निरामयं ।।

[ स. भा. पा. ७८२-७८४ ]

तूं जन्मभर परपीडेस इतका सोकावलेला होतास कीं तुझा हा देहच प्रत्यक्ष पापांचा कोथळा बनून गेलेला होता, त्या तुला या रामानें निजधाम दिलें ह्मणून त्या

निरामय ब्रह्मास माझा नमस्कार असो, असा वरील छंदाचा अर्थ होतो. वरील अवतरणाच्या पहिल्या ओळींत रावणाची कमालीची निंदा भरली आहे, आणि ती मंदोदरीकडून करविल्यानें स्वामीजींच्या लोकशिक्षणव्रतास धक्का बसावयास पाहतो अशी कोणी शंका घेतात. शंका सफळ कीं निष्फळ तें आतां पाहूं.

मंदोदरी ह्मणजे एक मोठ्या दर्जाची विवेकशालीनी स्त्री ह्मणवितें. अर्थात् तिच्या विलापांत देखील विवेकच असावयाचा. पण खऱ्या विवेकांत असद्धेतु असूंच शकत नाहीं. इतक्या गोष्टी ग्राह्य झाल्या ह्मणजे मंदोदरीच्या वरील उद्गारास पतिनिंदा ह्मणतां येणार नाहीं. कारण असद्धेतु खेरीज निंदा घडूंच शकत नाहीं. नाहींतर पुराण, इतिहास इत्यादि ग्रंथ निंदात्मकच ठरवावे लागणार.

आतां विधायक दृष्टीनें पाहूं. रावणाच्या दुष्टाव्याच्या दृष्टीनें पाहिल्यास त्यास रामाकडून परंधाम मिळालें ह्मणजे रामानें उत्तर आणि दक्षिण ध्रुवांची मिळणीच केल्याप्रमाणें केलें असें कोणासहि वाटलेंच पाहिजे. मग मंदोदरी सारख्या विवेकवती स्त्रीस तसें वाटणें किती तरी स्वाभाविक होतें ? पतीचा रामाकडून पराकाष्ठेचा आदर झाला अशी तिची भावना होणें जर अगदीं साहाजिक होतें तर अर्थातच पतीबद्दल प्रेम आणि रामाबद्दल कृतज्ञता तिच्या मनांत उचंबळून रामाचे आभार मानण्याच्या सद्धेतूनें तिनें रावणाकडेस आणि रामाकडेस तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यानें तिजवर निंदेचा आरोप कसा करितां येईल ? जाणून बुजून [ ह्मणजे सहेतुक ] पतिनिंदा करून रामास खुष करण्याचा हेतु मंदोदरीचा होता असें जोपर्यंत दाखवितां येणार नाहीं तोंपर्यंत वरील शंकेस जागाच नाहीं.

**रामानें रावणावर केलेल्या उपकाराबद्दल स्वतःची कृतज्ञता दाखविणें हेंच मंदोदरीच्या पतिनिधनविलापाचें तात्पर्य होय,** आणि ह्मणून स्वामीजींच्या लोकशिक्षणास मुळींच बट्टा लागूं शकत नाहीं असें आमचें मत आहे. मुद्दामच जर वरील आक्षेप कोणीं लादिला तर त्यास स्वामीजीहि ह्मणूं शकतील कीं '**वृद्धा नोपासितास्त्वया**'.

## रावण.

रावण विरोधीभक्त होता असें ह्मणण्याचा जनप्रचार आहे. तें खरेंहि असेल, परंतु तुलसीदासांचा रावण तसा नव्हता हें मात्र आह्मी निश्चित सांगूं शकतों.

शूर्पणखा रामाचा सूड उगविण्यासाठीं रावणापाशीं पोहोंचली आणि त्यास ती सीताहरणाच्या भरीस घालूं शकली. तिचा हा यत्न रावण जर विषयी नसता तर खात्रीनें विफल झाला असता. हाच रावणाच्या दुर्भर विषयलालसेचा आह्मी पहिला पुरावा धरितों.

रावण पुढें विचार करूं लागला कीं राम जर मनुष्य असेल तर सीता स्वतःस पचेलच, परंतु जर तो देव असेल तर मात्र सीताहरणानें आपल्या प्राणांवर बेतणार. या दुसऱ्या विचारानें त्यास एक तिसराच विचार सुचला कीं प्राणहानी देखील चांगलीच, कारण त्याच्या '**तामसदेहांत**' त्यास ईश्वरभक्ति न घडल्यामुळें भवसागर अनायासें तरण्यास रामाच्याच हातानें मरणें बरें.

वरील विचारांत भक्तीचा गंध देखील कोठेंहि नाहीं. मूळ विषयवासनेनें प्रेरित होऊन रावण नुसत्या परिणामाकडे साधकबाधक रीतीनें पाहूं लागला. परंतु त्याचा दुष्ट विचार चालू असतां त्याच्या अनंत घोर कृत्यांची त्यास आठवण झाली, आणि त्या योगानें त्याच्या हृदयांत कालवाकालव झाली. ज्यास पश्चात्ताप ह्मणतात तो हा नव्हे. हे ईश्वरदत्त बुद्धीचे डंख होत. खरा पश्चात्ताप जर त्यास असता तर इंद्रियलौल्य हें मूळ कायम राखून तो सीताहरणास कदापिहि प्रवृत्त झाला नसता.

वरील विचार आह्मीं खालील आधारावरून केला आहे:—(म भा. पा. ५७८)

**चौ०-सुररंजन भंजन महिभारा। जौं भगवंत लीन्हु अवतारा**
**तौ मैं जाइ बैर हठि करऊँ। प्रभुसर प्रान तजे भव तरऊँ**
**होइहि भजन न तामस देहा। मनक्रमबचन मंत्र दृढ एहा**
**जौं नररूप भूपसुत कोऊ। हरिहउँ नारि जीति नर दोऊ**

**अर्थः**—देवांचें रक्षण आणि पृथ्वीच्या भाराचें हरण करणाऱ्या जगदीशानेंच जर अवतार घेतला असेल तर मी जाऊन त्याच्याशीं हट्टानें शत्रुत्व करीन, आणि प्रभुशरानें मरून भवसागर तरीन. या तामस देहानें भगवद्भजन होत नाहीं. (यासच आह्मी पूर्वपापांच्या आठवणीमुळें मनांत उठलेलें

काहूर समजतों. ) कायावाचामनानें माझा आतां हाच निश्चय ठाम आहे. जर ते दोघे, कोणी साधारण मनुष्यजातीचे राजपुत्र असतील तर त्यांना रणांत जिंकून त्यांच्या स्त्रीचें मी हरण करीन. )

वरील अखेरच्या चौपाईंतला विचार तोच रावणाचा अखेरचा निश्चय होय. भक्तीचें किंवा पश्चात्तापाचें असलें अश्लील पर्यवसान कधींच संभवत नाहीं.

पुढें रावणाच्या सीताहरणाच्या उपक्रमाचें वर्णन तुलसीदासांनीं खालील-प्रमाणें दिलें आहे:—( म. भा. पा. ५८३ )

चौ०-सूनवीच दसकंधर देखा। आवा निकट जतीके भेखा

अर्थः-सीता अगदीं एकटीच आहे असें पाहून रावण यतिवेषानें तिज-जवळ आला.

नाना विधि कहि कथा सुहाई। राजनीति भय प्रीति दिखाई

अर्थः—प्रथम त्यानें पुष्कळश्या गोष्टी खूप वनवून सांगितल्या, आणि नंतर [ हताश होऊन ] राजनीति सांगितली, आणि पुढें भय आणि प्रेमहि दाखविलें.

कह सीता सुनु जती गोसाईं। बोलेहु बचन दुष्ट की नाईं

अर्थः—तेव्हां सीता ह्मणाली, अरे जोगड्या गोसावड्या! ऐक. तूं दुष्टासारखें बोलतोस ना!

तब रावण निजरूप दिखावा। भई सभय जब नाम सुनावा

अर्थ-नंतर रावणानें आपलें स्वरूप प्रगट केलें, आणि त्यानें जेव्हां आपलें नांव सांगितलें तेव्हां सीता भ्याली.

कह सीता धरि धीरज गाढा। आइ गयउ प्रभु खल रहु ठाढा
जिमि हरिबधुहि छुद्र सस चाहा। भयासि कालबस निसिचर-नाहा

( अर्थः—नंतर ती पूर्ण धैर्य धरून म्हणाली, खला ! प्रभु आलेच समज, मात्र तूं पळूं नकोस. अरे राक्षसपते ! ज्याप्रमाणें क्षुद्र जंबुकानें सिंहिणीची इच्छा धरावी तद्वतच ही तुझी इच्छा आहे. मृत्यूचा तुजवर पूर्ण पगडा बसला.)

सुनत बचन दससीस लजाना। मन महँ चरण बंदि सुख माना

अर्थः—सीतेचे ते शब्द ऐकतांच रावण खजील झाला. त्यानें तीस मानसिक वंदन करूनच सुख मानिलें. )

वरील वर्णनावरून अगदीं स्पष्ट दिसतें की जेव्हां रावणाच्या उच्छृंखल-पणामुळें सीता त्याजवर चवताळली तेव्हां तिच्या तेजाच्या [ पातिव्रत्याच्या ] प्रभावानें रावण वचकला आणि त्यानें तीस मानसिक नमस्कार केला. हा नम-स्कार देखील मानसिक शुद्धीचा म्हणवत नाहीं. ' डाँटेहि पै नव नीच '[ नीच नमविण्यानेंच नमतो ] अशांतला हा नमस्कार होता. हा नमस्कार जर सत्वशु-द्धीमुळें असता तर ती सत्वशुद्धि दुसऱ्याच श्वासांत पार निचरली नसती. हा नमस्कार मानभंगाच्या लाजेनें केलेला होय, भक्तीनें किंवा पश्चात्तापानें केलेला नव्हे.

वरील नमस्कार जर खऱ्या पश्चात्तापाचा असता तर रावण त्या नंतर अगदीं निराळ्याच रीतीनें वागलेला दिसता. त्यास मानभंगाची लाज न वाटतां त्याच्या पूर्वपापांची लाज वाटली असती, आणि तो सीतेस शरण जाऊन तिची उघड उघड क्षमा मागता. परंतु तुलसीदास म्हणतातः – ( म. भा. पा. ५८३ )

दो०—क्रोधवंत तब रावन लीन्हेसि रथ बैठाइ।
चला गगनपथ आतुर भय रथ हाँकि न जाइ॥

अर्थः- नंतर रावणास क्रोध भरून त्यानें सीतेस उचलून आपल्या रथांत घातलें, आणि आकाशमार्गानें तो चालता झाला. परंतु त्यास भीतीच्या धडकी मुळें रथ हांकवेना.

वरील दोह्यांत रावणाची मनोभूमिका इतकी स्पष्ट झाली आहे कीं, शंकेस कारणच उरत नाहीं. या दोह्यांतले ' क्रोध ' आणि ' भय ' हे शब्द विशेष महत्वाचे आहेत. हे विकार मन सकाम असल्या खेरीज कदापिहि

उद्भवत नाहींत हा अगदीं सिद्धांत आहे. अर्थात् रावणाच्या मनावर पश्चात्ताप आणि भक्ति यांची छाया देखील नव्हती हें निर्विवाद ठरतें.

उलट रीतीनें देखील पाहूं गेल्यास रावणाची बाजू कच्चीच पडते. सीताहरण त्यानें भक्तिपुरःसर केलें असें गृहीत धरिलें तरी **क्रोध** आणि **भय** यांची उपपत्ति लागत नाहीं. भक्तीच्या भावनेनें जर तो प्रेरित असता तर सीताहरणानें रावणाचें मन उलट अगदीं शांत राहतें, याचें कारण भक्तीच्या पोटांत उद्वेग जन्मूंच शकत नाहीं.

पुढें लंकेंत देखील त्यानें सीतेचें मन वळविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. या प्रयत्नाची मजल अखेर येथवर गेली:—[ म. भा. पा. ६४० ]

**सीता तैं मम कृत अपमाना। कटिहउँ तव सिर कठिन कृपाना**
**नाहिं त सपदि मानु मम वानी। सुमुखि होत न त जीवनहानी**

[ अर्थः—सीते ! तूं माझा अपमान केला आहेस. म्हणून या तीक्ष्ण खड्गानें मी तुझें शिर उडविणार. माझें म्हणणें तूं एकदम कबूल कर. नाहीं तर, हे सुमुखी ! तूं आपल्या जीवितास खास मुकणार. ]

पश्चात्ताप आणि भक्ति यांचा लवलेश जरी रावणाच्या मनांत असता तर ही खाटिकी वृत्ति याच्या मनास शिवूं तरी शकती काय ?

अखेर मरेपर्यंत देखील पश्चात्तापाची झुळुक रावणास शिवूं शकली नाहीं. त्याचा मृत्यु केवळ सूडाच्या भावनेंतच झाला. हें ‘ **कहाँ राम रन हतउँ प्रचारी** ’[ कोठें आहे तो राम ? त्यास जाणवून मी त्याचा युद्धांत प्राण घेणार ) या त्याच्या शेवटच्या उद्गारावरूनच सिद्ध होतें.

तुलसीदासांचा रावण हा असा आहे. तो रज आणि तम या दोन गुणांचा पुतळा आहे. सत्वगुणाचा त्यास यत्किंचित्हि स्पर्श नाहीं. आमच्या मतानें तो बेसुमार विषयी, मानी, खुनशी, आणि निर्लज्ज दिसतो. [ मंदोदरीचा शोक म. भा. पा. ७८२-७८४ पहा. ]

पूर्वोक्त विचारांवरून असेंच म्हणावें लागतें कीं तुलसीदासांनीं कोठलाहि रावण घेतलेला नाहीं. त्यांचा रावण कधीं कामी, कधीं क्रोधी, कधीं पड घेणारा, कधीं स्त्रियांना भिवविणारा आणि कधीं त्यांना भिणारा अशांतला झालेला आहे. ह्मणूनच अध्यात्म आणि वाल्मीकि यांच्या किंवा इतर कोणत्याहि रावणापेक्षां या रावणासच जास्त भ्यालें पाहिजे असें तुलसीदासांनीं मुद्दाम फारच खुबीनें पण जोरानें सांगून ठेविलें आहेः–[ म. भा. पा. ५७९ ]

**चौ०-नवनि नीचकै अति दुखदाई। जिमि अंकुस धनु उरग बिलाई**
**भयदायक खलकैं प्रियबानी। जिमि अकालके कुसुम भवानी**

[ **अर्थः**–नीचांचा नम्रीभाव अंकुश, धनुष्य, सर्प आणि मांजर यांच्याप्रमाणें अत्यंत दुःखावह होतो. पार्वती ! अकाळीं आलेल्या फुलाप्रमाणें खलांचे प्रेमाचे बोल देखील भयावह असतात. )

या सर्व कारणांवरून आणि **कविपरिचयांतल्या** पहिल्या दोन लेखांवरून तुलसीदासांनीं आपल्या रावणाची भूमिका **अकबराशीं** जुळविली आहे असेंच दिसतें.

असें गृहीत केल्यास स्वामीजींना आपल्या रावणास सायुज्य कसें देववितां आलें हा प्रश्न सहजच उद्भवूं शकतो. परंतु त्याचें अगदींच सरळ आणि सोपें उत्तर असें देतां येतें कीं त्यांनीं आपल्या रावणास सायुज्य देवविलें तें त्याच्या हक्कामुळें किंवा अधिकारामुळें नसून तें त्यांनीं आपल्या परम उदार लोकशिक्षक आणि लोकनायक रामाचें ब्रीद ह्मणून देवविलें आहे. कारण त्यांनीं आपला राम अगदीं प्रारंभापासूनच असा दाखविलेला आहेः—[ म. भा. पा. ३५ ].

**प्रभु तरुतर कपि डार पर ते किय आपुसमान।**
**तुलसी कहूँ न राम से साहिब सीलनिधान॥**

**अर्थः**–माझा मालक [ राम ] ज्या झाडाखालीं बसत होता त्याच झाडावर [ ह्मणजे मालकाच्या डोक्यावर ] या माकडांनीं बसावें. परंतु अशा उच्छृंखल

माकडांना देखील माझ्या प्रभु रामानें स्वसदृशच ( वैकुंठपीठाधिकारीच ) करून सोडिलें. यावरूनच पहा कीं या तुलसीच्या रामासारखा दिलदर्यांव मालक कदापि देखील ' न भूतो न भविष्यति.'

आह्मांस तर असेंच वाटतें कीं स्वामीजींनीं आपल्या रावणाची भूमिका विरोधी भक्तासारखी न रेखाटतां केवळ स्वतःच्या समोरचें विकट दृश्य घेऊनच त्यांनीं ती अगदीं मोकळेपणानें खालील छंदास अनुसरून वठविली आहे:—

**बुद्धि वडी चतराइ वडी मानों अंगमें ललता लिपटी है।**
**नाम वडो धन धाम वडो जागमांह वडी कीरत प्रगटी है॥**
**अवलोक दुआर कै मनुप हजार इंद्र कुबेर से घडी न घटी है।**
**इक राम के भगति विना तुलसी जैसे सुंदर नारकि नाक कटी है॥**

# उपसंहार.

ईश्वरी नेमानेम अतर्क्य असतात. ते त्याचे तोच जाणे. सोळावें शतक, आणि त्याच्या मागून तसें नाहीं तरी साधारण त्याच्या सारखेंच सतरावें शतक, हीं दोन शतकें वाङ्मयाच्या दृष्टीनें 'न भूतो न भविष्यति' अशींच झालीं. या शतकांत बहुतेक सर्व जगांत वाग्देवतेचें अनुनुभूत तांडव झालेलें दिसून येतें. तिचा हा मनसोक्त विलास स्वतंत्र देशांत झाल्याचें विशेष आश्चर्य नाहीं. परंतु मोंगल बादशहांच्या भ्रूविक्षेपावर सारखी नजर ठेविण्यांत दंग असलेल्या हिंदुस्थानांत देखील तो उचंबळून आला हेंच मोठें नवल. आधींच हिंदुस्थान उष्ण कटिबंधातलें, आणि त्यांत मोंगलांच्या मध्यान्हाच्या प्रखर सुर्याच्या उष्णतेची भर. अशा स्थितींत वाग्देवीचा घसा किती तरी कोरडा ठणठणीत पडावयास पाहिजे होता. परंतु इकडे पहावें तर तिच्या घशास वाग्रसाचा सारखा जींवंत पाझर फुटलेला, आणि तोहि असा असामान्य मधुर आणि अप्रतिम शालीन कीं त्या वेळेस हिंदुस्थानांत त्याचा जो रसप्रवाह प्रगट झाला त्याची फिरून दुसरी आवृत्ति अजून देखील निघूं शकली नाहीं.

**सामान्य निरीक्षण.**

२ हिंदुस्थानांतलें सोळाव्या शतकांतलें कविमंडळ बरेंच विस्तृत झालें. त्यांत प्रामुख्यानें दक्षिणेंत **एकनाथ माहाराज**, उत्तरेस **गोसांईजी तुलसीदास व सूरदास महाराज**, आणि पश्चिमेस **नाभाजी महाराज** हे होत. ज्यांचीं नांवें पृथ्वीच्या पाठीवर **आचंद्रार्क** राहणार अशाच कोटीचे हे कवि समजले जातात. परंतु अत्यंत खेदाची गोष्ट कीं ह्या सगळ्या कवींच्या काव्योत्कर्षाचें श्रेय संपादन करण्याची दिव्य संधि परमेश्वराच्या दयेनें अकबरास अनायास प्राप्त झाली असूनहि त्यां पैकीं एकाचा देखील गौरव करण्याचें भाग्य त्याला साध्य झालें नाहीं. जेतृत्वाची, परकीयत्वाची आणि ऐश्वर्याची जेथें उद्दाम जाणीव तेथें स्वामीजींनीं म्हटल्याप्रमाणें ' **श्रीमद बक्र न कीन्ह केहि प्रभुता बधिर न काह** ' [ श्रीमदानें कोणास

वक्र केलें नाहीं ! प्रभुता कोणास बधिरता आणूं शकली नाहीं ! ] हा परिणाम झाल्यास आश्चर्य काय ! आपण मात्र आज देखील मोंगलांचे उपकार आपल्या शीलास स्मरून एवढ्याच करितां मानिले पाहिजेत कीं त्यांनीं जशा देव-देवळांवर स्वाऱ्या, गो-ब्राम्हणांवर जुलुम, आणि साधुसंतांवर अतिक्रम गाजविले तशी आमच्या कवींवर आणि त्यांच्या ग्रंथांवर गदा आणून घाला घालण्याचा मोह त्यांस उत्पन्न झाला नाहीं.

**कविचरित्राचा अभाव.**

३ असो. वरील कविमंडळा पैकीं आपणास तूर्त तुलसीदासांचाच विचार कर्तव्य आहे. शके १८३५ [ इ. स. १९१३ ] त तुलसीदासांच्या रामचरितमानसाचें आमचें मराठी भाषांतर प्रसिद्ध झालें. त्यांत तुलसीदासांचें चरित्र साधारण विस्तृत नाहीं तरी अगदीं संकुचितहि नाहीं अशा बेतानें आलें आहे. त्याचीच द्विरावृत्ति करून हा भाग व्यर्थ स्थूल करण्याची आमची इच्छा नाहीं. ह्मणून कविचरित्र येथें न दिल्या- बद्दल आश्चर्य करण्याची जरूर नाहीं.

**स्वामीजींचें प्रमुख काव्य.**

४ त्या चरित्रांतील तुलसीदासांच्या ग्रंथांची यादी पाहतां तुलसीदासांचें मुख्य, समग्र, आणि प्रचलित असे दोनच ग्रंथ दिसतात. ' ते **रामचरितमानस** ' आणि ' **विनयपत्रिका** ' हे होत. ( या नांवांचें इंग्रजी रूपांतर आह्मी असें करितों '**The heart of the history of Rama** आणि ' **Appeal for mercy.** ' या दोहोंपैकीं **रामचरितमानसाचाच** प्रचार जास्त आहे. गीतेच्या खालोखाल इतका लोकप्रिय ग्रंथ पृथ्वीच्या पाठीवर आज दुसरा कोणताहि नाहीं येथवर देखील या ग्रंथासंबंधानें कदाचित् ह्मणतां येईल. ही अतिशयोक्ति आहे असें ज्यास भासत असेल त्यांनीं खालीं दिलेला पाश्चात्य चष्मा वापरून पाहावा.—

The Ramayan of Tulsidas is more popular and more honoured by the people of the north western provinces than Bible is by the correspond- ing classes in England.

India here reveals all the opulence and even the terrific excess of her imagination '

( Griffiths )

( सारांशः—इंग्लंडांत बायबलास जी लोकमान्यता आणि लोकप्रियता आहे त्याहून जास्त वायव्यप्रांतांत तुलसीदासांच्या रामायणास आहे. भारतवर्ष या रामायणाच्या रूपानें आपल्या कल्पकतेच्या वैभवाचें आणि भीषण उत्कर्षाचें प्रदर्शनच करीत आहे. )

इतकें होऊन देखील जर आमचें ह्मणणें अतिशयोक्ति ठरलेंच तर झाली ही कबूली तरी काय थोडी-थोडकी समजावयाची ?

**हिंदीवाङ्मयांत तुलसीरामायणास अग्रमान कां ?**

५ आतां इतक्या लोकादरास पात्र होण्याचा हक्क या एकाच ग्रंथाकडे कां जावा हा प्रश्न जितका स्वाभाविक आहे तितकाच तो महत्वाचाहि आहे. वस्तुस्थिति पाहूं गेलें असतां त्याच्या प्रचारास भयंकर अडचणी होत्या. शके १४९७ [ इ. स. १५७५ ] त रामचरितमानस प्रकाशित झालें. त्याच वेळेस **सूरदास** आणि **नाभाजी** हें प्रचंड दिप्तिमान् कविद्वय ह्यात असून त्यांचीं काव्यें भरपूर प्रचारांत होतीं. ह्मणजे रामचरितमानसास समकक्ष असे दोन प्रतिस्पर्धी विद्यमान् होते. शिवाय **श्रीएकनाथांचें भागवत** शके १४९६ ( इ. स. १५७४) त त्याच प्रदेशांत [ श्रीक्षेत्र काशींत ] प्रकाश पावलें होतें. त्यांतच आणखी राज्यकर्त्यांच्या परक्या भाषेची जोराची लाट उत्तरेचें आक्रमण करीतच होती. ह्मणजे एकाच वातावरणांत ह्या सर्वच प्रतिस्पर्ध्यांची चढाओढ सारखीच माजलेली होती. अशा परिस्थितींत देखील **रामचरितमानसच** लोकप्रचारांत सरसावलें याचीं कारणें आमच्या दृष्टीनें हीं अशीं आहेत.

( १ ) मूळ रामचरितच फार गोड आणि आबाल वृद्धांच्या परिचयाचें, त्यांतून ग्रंथांत स्त्रीशूद्रादिकांची देशभाषा अगदीं प्राचारिक आणि प्रेमळ अशी वापरलेली, आणि त्यांतहि विशेष हें कीं व्याकरणाची

दरकार विशेष न ठेवलेली; ह्यां सर्व कारणांमुळें अगदीं खाल-च्या समाजांत देखील या ग्रंथांचा शिरकाव होण्यास अडचण पडूं शकली नाहीं.

( २ ) मनुष्यस्वभावाचें निरीक्षण टीकेच्या दृष्टिनें झालेलें असह्य असतें. परंतु तेंच प्रेमदृष्टीनें झालें ह्मणजे उलटें गोंडस वाटतें. तुलसी-दासांची ती दृष्टि शेवट पर्यंत टिकल्यानें ग्रंथास रखरखीतपणा कोठेंच न येतां त्यांतलें सर्वच उपदेश परिणामकारक होऊं शकले.

( ३ ) आध्यात्मिक विचार अनअधिकाऱ्यास कंटाळवाणे होतात. ह्मणून त्यांच्या जागा भक्तिभावनांनीं भरून काढल्यानें ग्रंथ कठिण आणि रुक्ष न होतां फार मृदु आणि मधुर झाला.

( ४ ) तुलसीदास सर्व सांप्रदायिक विचारांपासून अगदीं अलिप्त राहिले. ह्मणून निःपक्षपात त्यांच्या विचारांत विशेष वाढला. परंतु प्रेमळ बोलणें हा त्यांचा स्वभावच. त्यामुळें निर्भीड सत्य जें बहुथा अप्रिय असतें तें त्यांच्या जिव्हागुणानें प्रिय आणि आदरणीय झालें.

( ५ ) कविकला आणि शिक्षणकला ह्या दोन्हीहि ईश्वरी देणग्या तुलसी-दासांत एकवटल्यामुळें कठिण विषय देखील त्यांच्या आंदोलनानें फार सोपे आणि मनोरंजक झाले.

( ६ ) काव्यकलेच्या दृष्टीखेरीज अमानुष किंवा दैवी प्रकारांची भेसळ करण्याची त्यांची प्रवृत्ति बहुधा दिसत नाहीं. ह्मणून त्यांच्या कथा-नकाचे दोर विस्कळीत दिसत नाहींत. त्यामुळें त्यांचें विचार लक्षांत भरण्यास बुद्धीवर ताण पडत नाहीं.

( ७ ) बीभत्स प्रकार किंवा अश्लील भाषा यांचा वारा देखील त्यांच्या कवितेस असह्य होतो.

( ८ ) तद्देशीय भाषेंतला समग्र भगवच्चरित्रपर ग्रंथ असा हा पहिलाच ( आणि दैववशांत अजूनहि तो पहिलाच राहिला आहे.. )

(९) यवनांचें राज्य, त्यांची भाषा, आणि त्यांच्या चालीरीति यांच्या अति निकट संसर्गामुळें सनातन वैदिक धर्माचा उत्तर प्रांतांत बहुतेक लोप झाला होता. त्या धर्माच्या पुनर्धटनेस देशस्थिति अगदींच प्रतिकूल होती. अशा विकट परिस्थितींत वैदिक धर्माची जागृति तर नाहींच पण निदान स्वधर्म, स्वजाति, आणि स्वदेश यांचा अभिमान तरी अवशिष्ट रहावा या उद्देशानें सर्वसाधारण सुगम, आणि सुकर अशा भक्तिमार्गाची योजना स्वामीजींनीं केली आणि त्या मार्गाचें शिक्षण ह्मणून रामचरितमानस त्यांनीं रचिलें. मार्ग आणि शिक्षण दोन्हीहि साधे आणि सरळ असल्यामुळें जनतेचें समाधान होण्यास आणि त्यांच्या भावना उल्लसित राहण्यास अडचण पडूं शकली नाहीं.

(१०) व्यवहारपटुता, नीतिशिक्षण, विचारगांभीर्य, विद्याभिरुचि, शास्त्रदृष्टि, इत्यादिकांचा यथोचित परामर्श ग्रंथांत झालेला असल्यामुळें ग्रंथ नुसता लोकमान्यच न होतां विद्वन्मान्यहि होऊं लागला.

**स्वामजींची कविकोटी कोणती ?**

६ आतां तुलसीदासांची **कविकोटी** पहावयाची. आमच्या मतानें ते श्रीएकनाथासारखेच **पंडित-संत-कवि** होते. या गोष्टीचा आतां विचार करूं.

**स्वामीजींचा विद्याव्यासंग.**

७ आमचें '**समालोचन**' उघड उघड दाखवितें कीं तुलसीदासांचा साहित्यव्यासंग फारच दांडगा होता. अध्यात्म आणि वाल्मीकि रामायणांचें त्यांचें परिशीलन फारच मार्मिक होते हें आमच्या '**भूमिकापरिचया**' नें निर्विवाद सिद्ध केलें आहे. श्रीमद्भागवत तर त्यांचा केवळ प्राण होता. ही एकच गोष्ट त्यांची विद्वत्ता सिद्ध करण्यास पुरेशी आहे, कारण '**विद्यावतां भागवते परीक्षा**' हें अगदीं ठरूनच गेलेलें आहे. इतक्या सर्व गोष्टी समुच्चयानें पाहिल्या ह्मणजे तुलसीदासांच्या विद्वत्ते संबंधानें आणि चतुरस्रतेसंबंधानें जास्त सांगण्याचा

खटाटोप निरर्थक ठरतो. सारांश ' **नानापुराणनिगमागम** ' हें स्वतः विषयीं जाहीर करण्याचा अधिकार त्यांच्यांत निःसंशय वसत होता.*

**स्वामीजींची साधुकोटी.**

८ तुलसीदासांच्या काय किंवा कोणाच्याहि काय संतपणाचा निश्चय दुसऱ्याकरितां करणें कठिण आहे, कारण तें प्रत्येक व्यक्तीच्या भावनेचें आणि मनोमयसाक्षीचें कार्य आहे. ह्मणून या बाबतींत आमचें मत आमच्या पुरतेंच आह्मी धरून चालतों. तुलसीदासास संत समजण्याची आमची मुख्य कारणें हीं अशीं आहेतः—

[ १ ] कविपरिचयांत ( लेख १ पहा. ) ठरल्याप्रमाणें त्यांना आह्मी वाल्मीकीचा अवतार समजतों. [ २ ] त्यांचे ग्रंथ त्यांच्या भगवत्प्रेमाची भरभक्कम साक्ष देतात. [ ३ ] इतर कवि साणि संत देखील त्यांस निःसीम

---

* स्वतःच्या कोणत्याहि उक्तीस वेदशास्त्रादिकांचा आधार सांगण्याची तुलसीदासांची जी सवय आहे तिच्यांत कांहींच तथ्य नाहीं असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे. त्यांचें तें मत आपणहि एकदां खरेंच समजूं या. पण आतां हा प्रश्न उद्भवतो कीं तुलसीदासांनीं जाणून बुजून असें कां करावें ? या प्रश्नाची वासलात लावणें कोणासहि जडच जाईल.

या प्रश्नाच्या बाबतींत आह्मास आज फक्त इतकेंच वाटतें कीं तुलसीदास वेदशास्त्रादिकांचे आणि स्वधर्माचाराचे कट्टर अभिमानी असल्याकारणानें त्यांच्या काळीं वेदशास्त्रादि विद्येचा होत असलेला अनादर आणि स्वधर्माची होत असलेली पायमल्ली त्यांना असह्य झालीच असली पाहिजे. अशा स्थितींत वेदादि विद्येचा अभ्यास आणि वैदिक धर्माचा आचार नाहीं तर निदान ती विद्या आणि तो आचार यांच्या संबंधानें योग्य आदर कायम राहिल्यास देखील बरेंच कार्य भागलें असें त्यावेळेच्या कोणाही देशाभिमान्यास वाटणें स्वाभाविक होतें. ह्मणून तितकें तरी कार्य व्हावें या हेतूनें वेदशास्त्रादिकांचा नामनिर्देश त्यांचेकडून वारंवार होत जाणें संभवनीय दिसतें. वेदशास्त्रादि विद्येबद्दल आणि स्वधर्माचाराबद्दल आदर उत्पन्न करणें हें देखील त्यावेळच्या समाजशिक्षणाचा एक आवश्यक भाग होता याबद्दल कोणाचाहि वाद नाहीं.

भगवद्भक्त ठरवितात. [ ४ ] केवळ ' **जे कां रंजले गांजले । त्यांसी ह्मणे जो आपुले** ' ह्या वाक्यास अनुसरूनच त्यांनीं हें रामचरितमानस रचिलें आहे ( कविपरिचय लेख ३ पहा ). [ ५ ] अशी व्यक्ति ' **तोचि साधु ओळखावा** ' आणि ' **देव तेथेंचि जाणावा** ' हा सिद्धांत आहे.

**तुलसीदासांची महनीयता.**

९ इतक्यावरूनहि ज्यांची स्वसंस्कारानुसार तुलसीदासांच्या संतपणाविषयीं खात्री होत नसेल त्यांस तुलसीदास ही एक अत्यंत चारित्र्यवान् आणि महनीय विभूति होती इतकें तर खालील पुराव्यावरून खास कबूल करावेंच लागेलः—

' It is a relief to turn from the triviality and impurity of most of the versifiers in Persian to the virile pure work of a great Hindu the tallest tree in the ' Magic garden ' of mediaeval Hindu poesy ..
..................(yet) that Hindu was the greatest man of his age in India greater even than Akbar himself, in-as-much as the conquest of the hearts and minds of millions of men and women effected by the poet was an achievement infinitely more lasting and important than any or all of the victories gained by the monarch..............

Tulsidas was the name of the Hindu for whom such pre-eminence is claimed.'

Smith's Akbar ( 2 nd Ed. P. 417—418.)

( सारांशः–बहुतेक सर्वच फारशी शाहिरांच्या क्षुद्रपणांतून आणि घाणींतून निघून मध्यकालीन हिंदीकाव्यरूप नंदनवनांतला जणु कल्पवृक्षच

अशा एका श्रेष्ठ हिंदूच्या चारित्र्यपूर्ण आणि पवित्र काव्यरचनेकडेस वळण्यानें मनास स्वस्थता तरी वाटते. ..........हा हिंदु गृहस्थ स्वतःच्या काळीं अवघ्या हिंदुस्थानांत, अद्वितीय—खुद्द **अकबरापेक्षां** देखील श्रेष्ठ-असा झाला. कारण **अकबरानें** मिळविलेल्या एकून एक युद्धजयापेक्षां या कवीनें लाखो स्त्रीपुरुषांच्या मनांवर आणि हृदयांवर मिळविलेला विजय बेसुमार जास्त महत्वाचा आणि कायमचा होता. ... ... ... ....

इतकें श्रेष्ठत्व हक्कपूर्वक सांगतां येण्या सारख्या त्या हिंदु व्यक्तीचें नांव **तुलसीदास** होतें. )

**१० स्वामीजींचा संतवर्ग.** तुलसीदास संत कोटींत गणिले जातात हें सांगितलें खरें, परंतु तेवढ्यानेंच संपत नाहीं. संतांचे देखील वर्गीकरण आहेच.

> **ब्राह्मणः समदृक् शांतो दीनानां समुपेक्षकः ।**
> **स्रवते ब्रह्म तस्यापि भिन्नभाण्डात् पयो यथा ॥**
>
> भाग. स्कं. ४ अ. १४ श्लो. ४२.

या श्लोकावरून संतांच्या दोन कोट्या सिद्ध होतात. या श्लोकाचा भावार्थ असा कीं ब्रह्मज्ञानी समदर्शी होऊन शांत जरी झाला, तरी तो जर दीनांची उपेक्षाच करणारा राहिला तर फुटक्या भांड्यांतलें पाणी गळून जसें वायां जातें त्याप्रमाणें त्याचें ब्रह्मज्ञान देखील वायांच गेलें म्हणावयाचें. हाच अभिप्राय तुकारामानीं '**आपण जेवी जेववी लोकां । संतर्पण करी तुका**' या उक्तींत दाखविला आहे. यावरून **एक नुसताच ब्रह्मज्ञानी** आणि **एक परोपकारी** म्हणजे **लोकसंग्रहकर्ता ब्रह्मज्ञानी** अशा दोन कोट्या संतांच्या ठरतात. तुलसीदास आपल्या संतपणाचें संतर्पण करणारे होते ही गोष्ट आरंभींच कविपरिचयांत ठरून चुकली आहे. म्हणून **रामदासादिकां** प्रमाणेंच परोपकारी संतांची त्यांची कोटी ठरते.

०

**११ तुलसीदासांची** कवीच्या कोटीचा विचार करावयाचा म्हणजे त्याचा कविगुण ( **poetic gifts & their cultivation** )

कविकोटी. आणि त्याचें काव्य ( poetry ) या दोहोंचाहि विचार करणें प्राप्त असतें. वास्तविक पाहिलें असतां काव्यसमालोचन इत्यादि द्वारा तुलसीदासांच्या कविगुणांचें आणि त्यांच्या काव्याचें ( रामायणाचें ) निरीक्षण इतकें झालें आहे कीं त्याच्या शतांशानें देखील आमच्यानें तें येथें होऊं शकणार नाहीं. ह्मणून त्यांच्या कविकोटीसंबंधानें ज्यास सविस्तर विचार पहावयाचा असेल त्यास आमच्या या कृतीच्या पूर्वभागांतून निघाल्या खेरीज दुसरा मार्गच नाहीं. येथें आह्मी त्या विषयास आमच्या ग्रंथसमालोचनादिकांच्या निष्कर्षरूपानेंच हात घालणार.

१२ काव्यप्रकाश कविगुणांचें निदर्शन असें करितोः —

स्वामीजींची कविगुणसंपन्नता | शक्तिर्निपुणता लोक शास्त्रकाव्याद्यवेक्षणात् ।
काव्यज्ञ-शिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे ॥

अर्थः- काव्यशक्ति ( 'कवित्वबीजरूपः संस्कारविशेषः' ) कवित्वप्रयोजक पूर्वजन्मसंस्कार, लोकनिरीक्षण आणि शास्त्रकाव्यादिकांचा परिचय यांपासून येणारें नैपुण्य, आणि काव्यज्ञ गुरूच्या शिक्षेप्रमाणें अभ्यास हे कवित्वास कारणगुण होत. कविपरिचयांतल्या '**तुलसीदास हे कोण**' या पहिल्याच लेखांत तुलसीदास पूर्वजन्माचे वाल्मीकि होते असें निश्चित झालें आहे. ह्मणून '**शक्ति**'–गुण त्यांच्यांत होता हें सिद्ध आहे. कविपरिचयांतला दुसरा आणि तिसरा लेख ( तुलसीरामायणकालीन देशस्थिति आणि तुलसीरामायणाचा उद्देश ) · त्यांच्या लोक-निरीक्षणाची भरपूर साक्ष पटवितात. त्यांचें शास्त्रकाव्यादिकांचें अवेक्षण आमच्या काव्यपरिचयावरून निर्विवाद सिद्ध आहे. राहिला तिसरा गुण ह्मणजे '**काव्यज्ञशिक्षयाभ्यास.**' यास भक्कम पुरावा या—[ म. भा. पा. ३६ )

दोहा–मैं पुनि निजगुरु सन सुनी कथा सो सूकरखेत ॥
समुझी नहिं तसि बालपन तब अति रहेउँ अचेत ॥

.... .... .... ....

चौ.-तदपि कही गुरु बारहिं बारा । समुझि परी कछु मति अनुसारा

( अर्थः-मी आपल्या गुरूपासून ही कथा वराहक्षेत्रांत श्रवण केली होती. परंतु त्या काळीं मी फारच अज्ञ होतों. ह्मणून बाळपणीं माझ्या लक्षांत ती तशी भरली नाहीं. तथापि ती गुरुजींनीं अनेकवार सांगितली, ह्मणूनच ती माझ्या बुध्यनुसार मला समजली. )

तुलसीदासांच्याच वाक्याचा आहे. यावरून काव्यप्रकाशकाराच्या मतास अनुसरून तुलसीदास **कविगुणमंडित** होते हें निश्चित झालें.

१३ काव्यगुणा-संबंधानें काव्यप्रकाशाची कारिका अशी आहे:—

**तुलसीरामायणाची काव्यकोटी.** { **'माधुर्यौजः प्रसादाख्यास्त्रयस्ते न पुनर्दश॥'**

याप्रमाणें काव्याचे गुण तीन-[ १ ] **माधुर्य**, [ २ ] **ओज** आणि [ ३ ] **प्रसाद**. या तीन गुणांची तीन कार्यें आहेत-**माधुर्यानें** आल्हाद होणें, **ओजानें** चित्त उद्दीपित होणें, आणि **प्रसादानें** रसप्रवाह होऊन चित्त एकदम प्रफुल्लित होणें. या गुणसमुच्चयाचा प्रवाह तुलसीदासांच्या काव्यांत अथपासून इतिपर्यंत अस्खलित भरलेला आहे. ज्यास हा प्रवाह विशेषच उत्कर्षानें वाहत असलेला पहावयाचा असेल त्यानें विशेषतः अयोध्याकांड पहावें. कौसल्याशोक, रामसीतासंवाद, सुमित्रेचा उपदेश, रामगुहसंवाद, भरद्वाजाश्रम सोडल्यानंतरचा रामाचा वनप्रवास, चित्रकूटावरील भरतचरित्राचा भाग वगैरे प्रसंग तर या गुणप्रवाहामुळें वाचकांस मंत्रमुग्ध करून सोडतात. आमचें काव्यसमालोचन या प्रसंगांच्या अवलोकनास पुष्कळच सहायक होईल अशी आमची खात्री आहे.

१४ आतां रामचरितमानसाच्या दोषांचा विचार करूं. काव्यप्रकाशाच्या कारिकेप्रमाणें विशेष असा फक्त एकच दोष बहुधा काव्यभर दिसतो. तो दोष ह्मणजे **'च्युतसंस्कृति'** ( व्याकरणलक्षणहीनत्व ). कविपरिचयांतल्या **'रामचरितमानसाचें खरें स्वरूप काय?'** या लेखांत या दोषाबद्दल उल्लेख आलेलाच आहे. त्याची पुनरुक्ति करण्याची आतां गरज नाहीं. हा दोष तुलसीदासांनीं कां राहूं दिला याचें नक्की कारण सांगतां येणें शक्य नाहीं. अगदीं

खालच्या दर्जाच्या लोकांस देखील ग्रंथपरिचय व्हावा आणि त्यांचें देखील शिक्षण सरसहा व्हावें या उद्देशानें या दोषाकडेस गोसांईजींनी मुद्दाम डोळेझांक केली असावी असें आमचें मत आहे.

१५ शेवटीं थोडक्यांत सर्व सांगावयाचें ह्मणजे **कालीदासांची** उपमा **भारवीचें** अर्थगौरव, आणि अल्प प्रमाणानें **दंडीचें** पदलालित्य या तिन्हीहि गुणांचा परिपोष रामचरितमानसांत झालेला स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतो.

१६ शास्त्रदृष्टीनें काव्यनिरीक्षण येथेंच संपलें. सामान्य दृष्टीनें या काव्याचें, विशेष गुण मागें ( प्या० ५ मध्यें ) दिले आहेत. त्यांतच खालील भर घालून हें सामान्य दृष्टीचें काव्यनिरीक्षण संपावितों: —

( १ ) '**आकारैरिङ्गितैर्गत्या चेष्टया भाषणेनच । नेत्रवक्त्रविकारेण लक्ष्यतेऽन्तरगतं मनः**' या कारिकेच्या धर्तीवर बहुशः तुलसीदासांची वर्णनें आढळतात. त्यामुळें वर्णनें जरी फार संक्षिप्त तरी तीं इतकीं समर्पक आणि वेधक झालेली आहेत कीं वाचकांच्या बुद्धिवैकल्याची तीं कसोटीच पाहतात. [ विशेषतः अयोध्याकांड पहा. )

( २ ) अध्यात्माच्या आणि वाल्मीकीच्या भूमिकांतले आणि प्रसंगवर्णनांतले पूर्वापरविरोधी धर्म तुलसीदासांनीं सपशेल सुधारून काढले. यामुळें त्यांचें एकंदर काव्य आदर्शभूत आणि स्पृहणीय झालें आहे. ( विशेषतः भूमिकापरिचय पहा. )

( ३ ) स्वतःच्या काव्यासाठीं कोणत्याहि एका विशिष्ट ग्रंथाचा किंवा मताचा स्वामीजींनीं बुद्धिपुरःसर अभिमान बाळगलेला नाहीं. त्यांच्या विचारानें जेवढें सशास्त्र, सयुक्तिक, आणि सरळ वाटलें तेवढ्या पुरतेंच त्या त्या ग्रंथाचें किंवा मताचें त्यांनीं अवलंबन केलें आहे. यावरून **मतस्वातंत्र्य** त्यांचा बाणा आहे हें स्पष्ट दिसतें. [ विशेषतः लोकशिक्षण आणि भूमिका–परिचय पहा. ]